सुदर्शनचरित्र नाटक.

५ जोशी (अनंत दीक्षित) चिपळोणकर.
(सन १८८१.)

(मार्कंडेय कथानक, कबरी आख्याना या श्रीकाशीची भूपाळी आणि श्रीनृसिंहा-ची प्राकृत अर्थासहित संस्कृत काढून आली.)

पान ३ ते २२४ पर्यंत आहे.
(२४० पानापर्यंत पाहिजे.)



विलें; नंतर तो दुर्दर्शनामक भिल्लनायकास पुढें करून तेथें प्राप्त होतांच भारद्वाजानें धुडकाविला असतां भिऊन परत गेला. पुढें कांहीं एका प्रसंगीं सुदर्शनास देवीच्या मंत्रविशेषाचें एक बीज प्राप्त झालें, नंतर त्या बीजाच्या ध्यासानें प्रसन्न झालेल्या जगदंबेनें सुदर्शनास धनुष्य, बाण, कवच, खड्ग इत्यादि युद्धसाधनें दिलीं, तेणेंकरून त्याची कीर्ति चहूंकडे पसरूं लागली असतां सदर भिल्लनायकानें त्यास रथ वगैरे नदर दिली, तसाच भारद्वाजप्रमुख तापसांनीं, "तू सार्वभौम राजा होशील" असा आशीर्वाद दिला आणि अकराव्या वर्षी त्याचा व्रतबंध केला; नंतर क्षात्रविद्याभ्यास पूर्ण होई तों पर्यंत सुदर्शनाचें वय वीस वर्षांचें झालें, त्या समयीं काशीनगरीचा राजा सुबाहु याची कन्या शशिकला उपवर झाली होती, तिणें पुष्कळ संभावित लोकांच्या मुखांनीं सुदर्शनाचें अनुपम गुणवैभव ऐकिल्यामुळें तिला त्याचाच ध्यास लागला असतां, "तूं सुदर्शनालाच वरावेंस" असें जगदंबेनें स्वप्नांत उपदेशिलें. पुढें शशिकलेनें स्वप्नांत सुदर्शनाचें लावण्य वगैरे पाहून जागृत होतांच मनानें त्यास वरिलें. इकडे तिच्या पित्यानें तिचा इच्छास्वयंवर निश्चित करून देशोदेशच्या राजकुमारांस पत्रें पाठविलीं असतां शशिकला फारच बावरली; नंतर तिचा सुदर्शनालाच वरण्याचा आग्रह सुबाहूस कळतांच तो तिजपाशीं येऊन तिला झिटकारून गेला ! पुढें शशिकलेनें एका ब्राह्मणाबरोबर स्वतःचें पत्र सुदर्शनास पाठविलें असतां सुदर्शन साऱ्या राजकुमारांबरोबरच येऊन पोहोंचला, नंतर युधाजित्प्रमुख

दुष्ट राजांनीं, "सुदर्शनास न वरावें" अशा विषयीं पुष्कळ आपटाधोपट केली, परंतु शशिकलेनें आपला मतलब न सोडितां भुलथापीनें सर्व राजांस आपआपल्या बिऱ्हाडीं लाऊन देऊन सुदर्शनाशीं लग्न लाविलें आणि हें समजतांच ते दुष्ट राजे युद्धाची तयारी करून भारद्वाजाश्रमाच्या मार्गावर राहिले. इकडे विवाहसमारंभ झाल्यानंतर सुदर्शन भारद्वाजाश्रमीं जाण्याकारितां क्षेत्राच्या बाहेर येतांच त्याजवर त्या दुष्टांनीं मोठी गर्दी केली. त्या काळीं सुदर्शनानें देवीचा धांवा केला, तो ऐकतांच दुर्गादेवी अवतरली आणि तिणें त्या सर्व दुष्टांचा संहार केला असतां बाकीचे कांहीं राजे सुदर्शनास शरण आले. नंतर सुदर्शनानें भारद्वाजाच्या आश्रमीं जाऊन त्याच्या समागमें अयोध्येस पोहोंचतांच वसिष्ठऋषीस झालेला सर्व वृत्तांत सांगितला आणि एक मोठा प्रासाद बांधून त्यांत दुर्गादेवीची स्थापना करण्याचा संकल्प सोडून वसिष्ठानें त्यास राज्याभिषेक केला असतां तो शशिकलेसहवर्तमान आनंदानें राज्य करूं लागला.

तात्पर्य, न्यायाच्या अवलंबनानें कांहीं काळ जरी हाल झाले तरी शेवटीं कल्याणच होतें. आणि अन्यायानें आरंभीं सुखाचा भास होतो परंतु अखेरीस इच्छा पूर्ण न होतां पाहिलें असेल तेंही लयास जाऊन दुष्कीर्ति मात्र मिळत्ये. यास्तव कल्याणेच्छूनें सर्वदा न्याय्य वर्तणूक करावी.

---

# सुदर्शनचरित्र नाटक.

—o—

## अंक १ ला.

---

### पात्रें १३.

१ सूत्रधार.......... नाटकाध्यक्ष.
२ विदूषक .......... हास्यरसकारी.
३ ध्रुवसंधि.......... अयोध्येचा राजा.
४ कंचुकी .......... त्याचा भालदार.
५ विदल्ल............ ,, मुख्य प्रधान.
६ समरसिंह.... ... ,, सेनापति.
७ वसिष्ठ............ ,, कुलगुरु.
८ समयज्ञ .......... वसिष्ठाचा थोरला शिष्य.
९ सुमति............ ,, धाकटा ,,
१० शिक्षक .......... पंतोजी.
११ सुदर्शन.......... राजाचे थोरल्या स्त्रीचा पुत्र.
१२ शत्रुजित्......... ,, धाकट्या ,, ,,
१३ शीघ्रबुद्धि......... प्रधानाचा पुत्र.

## स्थळ– अयोध्येंतील राजमंदिर.

( सूत्रधार आरंभीं प्रवेश करून )

**श्लोक**– (शार्दूलविक्रीडित)

**मायानिर्मितचित्रकर्[1]णवदनाकायाधरूनीभति ॥**
**च्छायाभक्तिकरावयाप्रकटलाद्यायातयासन्मती ॥**
**बायालाभजतांसदासु[2]खअसेजायाँ[3]दिकप्राप्तिही ॥**
**गायातद्गुणसिद्धजेनृजं[4]नुहेंवायानकेलेंतिहीं ॥ १ ॥**

( आणिक कांहीं गद्यपद्यें ह्मणून मंगलाचरण केल्या-नंतर ) अहो, कृतांतो[5]लाही लत्ताप्रहार करून मार्कंडेयास उदंड आयुष्य देणारा, शास्त्राज्ञापालक अशा सज्ञान, ऋषींच्या यज्ञादि कर्मांस प्रतिबंध करणाऱ्या, अंधकप्रमुख असुरांच्या समुदायास आयासावांचून यमालयास पाठ-विणारा भक्तजनसुखदायक, असा जो गिरिजानायक याच्या वसंतोत्साहांतील चमत्कार अनुभवावे एतदर्थ नानादे-शांतून प्राप्त झालेल्या विद्वज्जनांच्या या समाजापुढें त्याच्या प्रेरणेप्रमाणें कांहीं एक सच्च[6]रित्र हुबेहूब करून दाखवावें असें मी इच्छितों आहें; परंतु शृंगारादि रस प्रकट करण्याविषयीं पटाइत असा एखादा नट अथवा विदू-षक तरी या समयीं मला भेटता ह्मणजे नीट होतें.

(इतक्यांत विदूषक प्रवेशानंतर वेडेंवांकडें किंचित् नृत्य करून सूत्रधारापुढें येतो).

**सूत्रधार**–( त्याजकडे ) अरे, तुझी ही हालचाल पा-हूनच समजलें कीं, तू विदूषक आहेस! परंतु कोणाशीं

---

१ गजानन. २ मोक्ष. ३ ऐहिक सुखाचीं साधनें. ४ मनुष्यजन्म. ५ यमाला. ६ चांगलें कथानक.

कांहीं न बोलतां आपल्याच तोऱ्यांत आहेस, तो इतका कसला धूर तुझ्या डोळ्यांवर आला आहे?

**विदूषक**—(विस्मित होऊन) अहो, तुह्मां संभावितांची देखील हालचाल दर्शनाबरोबर "तुह्मी सूत्रधार" असें कळविते आहे, मग माझी तर काय; मुलखाची बोलभांड! असो, आतां धुराविषयीं विचारितां; तर, मजसारख्या गुडाकूची विडी ओढणाराच्या डोळ्यांखेरीज कोणीकडेस तिचा धूर जाईल? पण या भगवद्भजनाच्या वेळेस तें कांहीं नसून तुह्मांला धूर दिसला; याचें कारण,—तुह्मीं आपल्या विद्या व कलाकौशल्यांचा गर्वाग्नीवर धूप योजिल्यामुळें, तुमचे बुद्धीच्या डोळ्यांवर निरंतर धूर असावा असें वाटतें!

**सूत्र०**—(किंचित् गुप्त हांसून) अरे, "विकृतांगवचोवेषै र्हास्यकारी[१] विदूषकः" या अन्वयेंच तुझा बाळसंतोषागत वेष, उंटाप्रमाणें शरीराकार, आणि अलंकारयुक्त कानाच्या पाळीसारखा भाषणप्रकार, असा पूर्ण सरंजाम असल्यामुळें तूं केलेला स्तुतिगर्भनिंदेप्रमाणें विनोदच कां होईना, पण तो आरोग्य करणाऱ्या औषधाच्या कडूपणासारखा पुष्कळ अंशीं संतोषकारकच होतो! असो; मला स्वेच्छेप्रमाणें तू सहाय मिळालास, तर आतां सभासदांच्या प्रेरणेवरून आरंभिलेलें माझें कृत्य सांग होईल असा मला भरंवसा आला!

**विदू०**—हां हां, एकूण आरंभ झालाच आहे! बरें बरें, पण कोणतें चरित्र करणार?

---

१ वांकडें तिकडें चालणें, तसेंच बोलणें, लोकविरुद्ध वेष धरणें, यांणीं लोकांस हासविणारा.

सूत्र०—(आनंदानें) अरे, तें काय विचारतोस, सद्धया दहीं घुसळून काढिलेलें लोणींच! तें कोठलें ह्मणशील तर एक—

श्लोक.

जेथेंअसेनिर्मळस त्काव्यालंकारपद्धती।
साताराशिवराजाची राजधानीप्रसिद्धती ॥२॥
तत्सन्निवासिदैवज्ञ दीक्षितानंतसत्कृती।
आहेसुदर्शनचरि त्राख्यनाटकतत्कृती ॥ ३ ॥

विदू०—ठीक! अहो पण सूत्रधार, याविषयीं तुह्मी झालां अहां माहितगार, आणि मी आहें गैरमाहित, ह्मणून विचारितों. हें आख्यान कोणत्या पुराणांतील आहे किंवा कसें?

सूत्र०—अरे, देवीभागवताच्या तृतीयस्कंधांत, अध्याय तेरा पासून पंचवीस पर्यंत "सुदर्शनोपाख्यान" ह्मणून सांगितलें आहे!

विदू०—ठीक ठीक! तर मग चालूद्या आतां.

सूत्र०—बरें आहे.

झूला.

सूर्यवंशोद्भवभूप[१]। पुष्यनामास्मररूप[२] ॥
तयाह्मणतितच्चमूप[३]। अमृतकूप[४]कायहा ॥ ४ ॥

विदू०—(मान डोलवून) वाहवा! चालूद्या.

---

१ राजा. २ मदनासारखा रूपवान्. ३ सेनापति. ४ अमृताचा आड (विहीर).

सूत्र०—तयाहोयएकतनयं[1] । मूर्तिमंतजेविविनय ॥
ध्रुव[2]संधीकरीसनयं[3] । घनयेंशोच्छभूमिही ॥५॥

विदू०—भले भले ! चालूद्या.

सूत्र०—स्त्रियादोनतयाथोर । मनोरमाचंद्रकोर ॥
खगां[5]मधींअणिकमोर । रसींगोरसोपमा ॥६॥

विदू०—ठीक ! चालूद्या.

सूत्र०—दुजीलीलावतिनाम । [6]सदृशशोभविनृपधामं ॥
दोघिंचाहिहाचिकाम । सदासामं[9]असावें ॥७॥

विदू०—अच्छा अच्छा ! चालूद्या पुढें.

सूत्र०—मनींत्यांच्यारिपुभाव । शिरावयानसेवाव ॥
तेणेंध्रुवसंधिराव । नसेबावराकधीं ॥ ८ ॥

विदू०—अहाहा, जीते रहो कविराज ! (सूत्रधाराकडे) पुढें चालूद्या.

सूत्र०—आर्या.

आधींदुसऱ्यास्त्रीला झालासुतशत्रुजिज्जयानाम ॥
मगमासेंपहिलीला सुदर्शनादिसेजसादुजाकामं[10] ॥९॥

विदू०—ठीक ठीक. आतां मीही माहितगार झालों. सूत्रधार ! पाहिजे तर परीक्षा घ्या. सूर्यवंशांतील पुष्यराजाचा पुत्र ध्रुवसंधिराजा ; त्याची धाकटी स्त्री लीलावती इला शत्रुजित् या नांवाचा पुत्र झाल्यानंतर एका महिन्यानें थोरली स्त्री मनोरमा इला झाला, त्याचें नांव सुदर्शन ! कां, तुमच्या ह्मणण्यांतील दरोबस्त ऐवज उचलला कीं नाहीं ?

---

१ पुत्र. २ या नांवाचा. ३ नीतियुक्त. ४ दाट, अशा यशानें निर्दोष. ५ ग्रहांमध्यें, आणि पक्ष्यांमध्येंही. ६ आपल्या नांवाप्रमाणें. ७ राजाचें मंदिर. ८ इच्छा. ९ एकविचार. १० मदन.

सूत्र०—खरें तें. आतां ऐक पुढें.

## आर्या.

पावुनिसद्गुणपुत्रां त्यांचेसंस्कारकरुनिचौलांत[1] ॥
राजामानीअपणा धन्यतरद्युमणिच्या[2]हिकौलांत[3]॥१०॥

अरे, फार काय सांगावें!

ध्रुवसंधीप्रतियेतां मित्रसदाक्रांतिरहितहोतोतो ॥
जोंजोंतदुत्तराधरि संपादुनिघनवसुप्रदहितोंतों ॥११॥

( इतक्यांत पडद्यापलीकडे ) कोण रे आहे? हें कोणीं काय ह्मटलें?

सूत्र०—( चकित होऊन पडद्याकडे पाहतो ).

(पुन्हा पडद्यापलीकडे) राजाधिराज भूमंडलाखंडल[4] ध्रुवसंधिराज महाराज,आस्ते कदम् मुलाजा (असा शब्द होतो).

सूत्र०— अरे विदूषका, ध्रुवसंधिमहाराज कचेरींत येताहेत, आणि त्यांस माझ्या भाषणेंकरून तोष झाला कीं रोष आला, हें कळत नाहीं; यास्तव आपण आतां त्यांच्या दृष्टीस पडूं नये, असें मला वाटतें! ( निघून जातो ).

( ही नाटकाची प्रस्तावना झाली ).

( तदनंतर राजाधिराज इत्यादि पूर्ववत् ललकारीत भालदार प्रवेश करितो, नंतर विद्वत्प्रधान येऊन मध्यें उभा राहतो तोंच दोघां शिष्यांसह वसिष्ठ आला असतां प्रधान, राजासनापुढें उजव्या तर्फेस मध्यें त्यास व त्याच्या उजव्याकडे समयज्ञास आणि डाव्याकडे सुमतीस बसवितो, नंतर समरसिंहसेनापतीसह ध्रुवसंधि-

---

१ चौलापर्यंत. २ सूर्याच्या. ३ कुलसंबंधि पुरुषांत. ४ भूमंडळावरचा इंद्र.

राजा प्रवेश आणि गुरुचरणांस वंदन करून आसनारूढ झाला असतां डाव्या तर्फेस विदल्ल, समरसिंह आणि विदूषक हे बसतात ).

**कंचुकी**– ( पूर्ववत् ललकारून मंडळीकडे ) अदब्से.

**राजा**– एथें कोण होता रे? मघांशीं कोणीं काय ह्मटलें?

**सुमति**– " ध्रुवसंधीप्रति०–तोंतों " ( ही आर्या ह्मणून ) अशी कोणीं स्तुतिपाठकानें आर्या ह्मटली.

**राजा**– ( वसिष्ठाकडे हात जोडून ) गुरुमहाराज, यांतील सारें तात्पर्य लक्षांत आलें नाहीं, असें वाटतें.

**वसिष्ठ**– ( सुमतीकडे पाहून ) काय रे सुमति, भूपतीचें भाषण ऐकिलें कां?

**सुमति**– होय गुरुवर्या. या आर्येंत अर्थ बराच आहे, परंतु आपल्या यजमानांस–( इतकें बोलतो तोंच)–

**वसिष्ठ**– अरे, सांग. तुला कितीं समजतें तें तर पाहूं.

**सुम०**–आज्ञा. कोणी मित्रभावानें या ध्रुवसंधिराजापाशीं आला असतां त्याचें धनादिपदार्थांसाठीं हिंडणें, अथवा थोरांची अमर्यादा करणें, कमीं होतें इतकेंच केवळ नाहीं, तर जों जों राजाचीं[१] नीतियुक्त उत्तरें लक्षांत धरील तों तों तोच अतिधन मिळवून मोठा दाताही होतो! तात्पर्य, असा यशस्वी हा राजा आहे.

**राजा**–गुरुमहाराज, फार आश्चर्य वाटतें! अशी कविताशक्ति खर्चून स्तव करणें तर परमेश्वराचाच करावा. अशा सरस वाणीनें मानवाला काय वर्णावें?

**वसिष्ठ**–भूपते, केवळ तसेंच नाहीं ( समयज्ञाकडे )

---

१ राजाचें.

अरे समयज्ञा, या आर्यैंतील अर्थ तू कसा लावितोस पाहूं.

**समयज्ञ**—( आनंदानें ) गुरुमहाराज, या आर्यैंत बहुत गंभीर अर्थ आहे! आणि राजस्तुतीचा भास होतो, हें त्यांतल्या त्यांत रचनाचातुर्य होय. परंतु अभीष्ट अर्थ असा कीं, प्रस्तुत वसंत ऋतु चालू आहे यांत दिनरात्रिमानें प्राय: समान असतात. याचें कारण ज्योतिर्ग्रंथोक्त खगोलांत दोन ध्रुव आणि त्यांपासून समांतरावर विषुववृत्त आहे तो ध्रुवसंधि, तेथें, ह्मणजे क्रांतिवृत्तविषुववृत्तांच्या संपातावर सूर्य आला असतां क्रांतिशून्य होतो, कारण क्रांति ह्मणजे ज्या याम्योत्तरवृत्तावर ग्रह असतो त्याणें छेदिलेल्या क्रांतिवृत्तविषुववृत्त प्रदेशांचें अंतर. आतां जों जों विषुववृत्ताच्या उत्तरदिशेचें तो आक्रमण करितो, तों तों मेघ उत्पन्न करून पर्जन्यदाताही होतो; यामध्यें ग्रीष्म आणि प्रावृट् यांची सूचना. तात्पर्य,—अर्धें उत्तरायण आणि अर्धें दक्षिणायन मिळून साऱ्या उत्तरगोलामध्यें सूर्याच्या संचारापासून उत्पन्न होणाऱ्या तिन्ही ऋतूंचें बीजरूप वर्णन झालें, यावरून स्पष्ट दिसतें कीं, हा वक्ता वहुदर्शी आणि वाक्यरचना कुशल आहे!

**वसिष्ठ**—( आनंदानें ) शाबास शाबास! अरे, तू खरा समयज्ञ[१] आहेस. ( राजाकडे ) हे क्षितिपते, जरी पुष्कळ शास्त्राभ्यास केला तरी अशी वर्णनीय समयज्ञता असणें बहुत दुर्लभ! अस्तु, ही उक्ति फारच सुरस आहे.

**राजा**—( प्रीतीनें ) गुरुमहाराज, आपलें सर्व राष्ट्र अशा सुगर मनुष्यांनीं परिपूर्ण आहे, आणि आमचे

१ प्रसंग जाणणारा.

पूर्वज हरिश्चंद्र, रोहिताश्व इत्यादिकांची शास्त्रश्रद्धा, सत्य-निष्ठा अच्छिद्र शेवटास जाऊन तिन्ही लोकांत निष्कलंक कीर्ति झाली, त्यांतूनही रामचंद्र महाराजांनीं तर ब्रह्मांडांत झेंडे लाविले! तसेंच प्रस्तुतही त्या अन्वयेंच सर्व आहे! असो, अशा या सर्वप्रकारक ऐश्वर्याचें निदान, (त्याजकडे हात जोडून) या चरणांची करुणा!

**समरसिंह**—(राजाकडे हात जोडून) सरकार, या गादीची सलामत काय वर्णावी! आपल्या राजधानींतील, आणि आठही दिशांस ठिकाणोठिकाणीं योजिलेले लक्षावधि शिपाई, सरदार यांतून प्रत्येकाचा, तापलेल्या पंचानना[1]प्रमाणें आवेश, प्रळयमेघांसारखी गर्जना, ढाण्या वाघासारखा भयंकर देखावा, क्षणांत पाणीच पाणी करून देणाऱ्या वळीव पावसाच्या गर्द धारांप्रमाणें बाणवर्षाव! असा रोजच्या कवाइतींतील जो दर्दराट, त्याणेंच साऱ्या राज्यांत "शत्रु" या पदार्थाचा नांवाखेरीज बिलकूल मुद्दाच नाहीं! असा सरकारच्या प्रतापाचा प्रभाव!

**विदल्ल**—(आनंदानें) समरसिंहजी, तुमचें भाषण यथार्थ आहे. आतां राजेसाहेबांचें ह्मणणें, "असें असण्याचें मुख्य कारण, गुरुमहाराजांची कृपादृष्टि" तर हेंही खरेंच आहे. अहो, चांदणें हा चंद्राचा प्रकाश खरा, पण तो सूर्यप्रभेच्या योगानें उत्पन्न होतो.

**समयज्ञ**—शाबास शाबास! विदल्लप्रधानजी, तुमची ही अलंकारयुक्त भाषणाची शैली मोठमोठ्या काव्यज्ञांसही स्तुत्य आहे.

---

१ सिंहाप्रमाणें.

(इतक्यांत शिक्षक प्रवेश आणि राजास मुजराही करितो).

**कंचुकी** (पूर्ववत् लल्कारून) निगा रखे मेहेर्बान्, सलामर्फा.

**शिक्षक**–(हात जोडून नम्रतेनें) स्वामिचरणापाशीं इतकीच विनंती करितो कीं, सरकारी शाळांमध्यें अनेक वर्षें अभ्यास केलेले, त्यांतही कोणी वयस्कर असे हजारों विद्यार्थी आहेत, परंतु दोघे राजकुमार आणि तिसरा प्रधानपुत्र यांचा पुरतीं दोन वर्षें देखील अभ्यास झाला नसतां यांची बरोबरी करणारा शाळाखात्यांत एकही विद्यार्थी नाहीं, अशी खावंदांची सलामत! तिचें वर्णन मजसारख्यानें काय करावें? परंतु इतकीच इच्छा आहे कीं, (वसिष्ठाकडे हात जोडून) गुरुमहाराजांसमक्ष स्वामींनीं सदर त्रिवर्गांची परीक्षा घ्यावी. यांत ते कुमार तेजबुद्धीच आहेत, परंतु या योगानें निमित्तीभूत शिक्षक मंडळीस सहज कीर्तिलाभ! इतकेंच.

**राजा**–(वसिष्ठाकडे पाहतो).

**वसिष्ठ**–बरें आहे.

**राजा**–(प्रधानाकडे पाहतो).

**प्रधान**–(भालदाराकडे)– अरे कंचुकी, तूं जाऊन सुदर्शनराज, शत्रुजित्राज आणि शीघ्रबुद्धि यांस त्वरित घेऊन ये.

**कंचुकी**–(हात जोडून) हुकूम. (निघून जातो).

**प्रधान**–(शिक्षकास विदूषकाजवळ बसायास सांगतो).

**शिक्षक**–(तेथें बसतो).

(इतक्यांत तिघे कुमार आणि कंचुकी प्रवेश तसाच राजास मुजरा करितात).

**कंचु०**—(आपल्या जागीं उभा राहतो).

**प्रधान**—(उठून, राजासमोर मध्यें सुदर्शनास, त्याच्या उजव्याकडे शत्रुजितास आणि डाव्याकडे शीघ्रबुद्धीस बसवून आपण आपल्या जागीं बसतो).

**समरसिंह** आणि **विदू०**—(त्यांस ताजीम घेऊन पुन्हा बसतात).

**राजा**—(अनुक्रमानें कुमारांकडे पाहून) काय रे मुलांनों, तुमचा अभ्यास कितीं झाला आहे?

**शीघ्रबुद्धि**—आतांच्या परीक्षेपुरता.

**शत्रुजित्**—सुमारें एकवीस महिने.

**सुदर्शन**—परीक्षा झाल्यानंतर सर्वांच्या लक्षांत येईल तें खरें. आधींच आह्मीं पुष्कळ सांगितल्याचा काय उपयोग!

**वसिष्ठ**—(आश्चर्य करून) राजन्, (सुदर्शनाकडे हात करून) हें फारच कडवें पाणी दिसतें!

**समयज्ञ**—अरे कुमार हो, बारा आणि पंधरा यांचा योग कितीं रे? परंतु ते एक, दोन, तीन, चार, अशा अंकक्रमांतील बारा पंधरा नव्हेत. कोणतें एक गणित करितां करितां ते दोन राशी सिद्ध झाले आहेत, त्यांची बेरीज.

**शत्रु०**—(डोळे फिरवून) हें हो काय? मिळवणी शिकणारास घालायाचें उदाहरण आह्मांस!

**विदू०**—शत्रुजित्राज, थोरांच्या अशा भाषणास विनोद ह्मणावें, बेअदबी मानूं नये. आणि उत्तर सांगून टाका ह्मणजे झालें; आहे काय त्यांत! अहो, बारा आणि पंधरा; सत्तावीस झाले.

**सुदर्शन**—( विदूषकाकडे ) भले रे रानवटा! वनचरा, कधीं शाळा पाहिली होतीस काय? का धनगर वाड्यांत तयार झालास कोण जाणें! अरे, तुला वनांतलि मनुष्य किंवा गांवांतलि सिंह ह्मटलें पाहिजे.

**विदू०**—( मोठ्यानें हांसून ) वाहवा! ह्मणजे धनगर किंवा कुतरें!

**सर्व**—( हांसतात ).

**शीघ्र०**—हें कठिणच आहे.

**राजा**—वाहवारे हरामी! ( सर्वांकडे ) हा आपला थोडक्यांतच सारतो.

**सुदर्शन**—( समयज्ञाकडे ) समयज्ञमहाराज, याचें निश्चित उत्तर पाहिजे असल्यास, इतक्याच प्रश्नावर देतां येणार नाहीं, यास्तव आधीं आपणांस एक प्रश्न करून त्याचें उत्तर आपणांकडून समजलें ह्मणजे प्रश्न पूर्ण होईल. आणि संदिग्ध उत्तर कामास येईल, तर आतांच सांगतो.

**राजा**—( गहिंवरून ) भले वाघ! बरें आहे. आधीं संदिग्धच सांगा, पाहूं बरें.

**सुद०**—बारा आणि पंधरा मिळून तीन[1] अथवा सत्तावीस.

**वसिष्ठ**—शाबास शाबास, भले सुदर्शनराज.

**सुमति**—सुदर्शनराज, निश्चित उत्तर सांगण्यास काय समजलें पाहिजे?

**समयज्ञ**—आतां त्यांत काय आहे!

---

१ बीजगणितांत दोहों अंकांतून एक धन आणि दुसरा ऋण असेल तर त्यांच्या वजाबाकीसच बेरीज ह्मणतात.

**सुदर्श०**—कां होईना. त्या दोहों अंकांचें धनर्णधर्म.

**समयज्ञ**—भले पटायीत! (किंचित् अवकाशानें) आतां हें पुरे, दुसरेंच विचारितों. एखादें पुस्तक लिहितांनां प्रमादानें चुकलेलें अक्षरादिक बाहेर समासावर लिहितात, आणि त्याचा समावेश कोठें करावा हें समजण्याकरितां, ज्या ठिकाणीं चुकल्यामुळें अशुद्ध झालें असेल त्या ठिकाणीं एक खूण करितात, ती खूण पाखराच्या पायासारखी असते ह्मणून तिला कोणी काकपद ह्मणतात, परंतु सप्तशती, गीता इत्यादि पवित्रग्रंथांत अपवित्र अशा कावळ्याचें पद असणें अयोग्य, ह्मणून मानससरोवरादि पवित्रस्थानीं संचार करणारे हंस पवित्रपक्षी आहेत, अशा कारणानें कोणी हंसपद ह्मणतात, तर या दोहोंतून चांगलें कोणतें?

**शत्रु**—हंसपद ह्मणणें नीट; हें स्पष्टच दिसतें.

**शीघ्र०**—माझेंही मत असेंच आहे.

**सुद०**—काकपद ह्मणावें; हें नीट.

**सुमति**—तें आधीं सांगितलेल्या उपपत्तीस विरुद्ध आहे.

**सुद०**—ती उपपत्तीच मुळीं अनुपपन्न आहे. कारण, हंसपद अशुद्ध स्थळाचें दर्शक नव्हेच, अशी ती उपपत्ति सांगतांनांच तिची अनुपपत्ति सांगितली जाते!

**सर्व**—शाबास सुदर्शनराज!

**वसिष्ठ**—भले शाबास सुदर्शना! (राजाकडे) हे विश्वंभराधीश्वर, सिंहाचा शिशु मोठ्याही गजास अजय्य आहे; मग अल्पाची कथा काय! आतां एकपितृकांत कांहीं न्यूनाधिक असणें, हें मातृकुल जन्मांतरीय कर्म इत्यादिकांच्या अन्वयें संभाव्य आहे. अस्तु,

आज या सप्तद्वीप वसुमतीवर तूं सुभगशेखर आहेस!

**समयज्ञ**— हे महीपते, आजचें सभाकृत्य आनंदोत्पादक झालें! असो, आतां निद्रेच्या योग्य काळीं तिचा भंग करणें आणि रसिक श्रोते वक्ते यांणीं तल्लीन होऊन चालविलेल्या सुरस गोष्टींचा खंड करणें, हीं ब्रह्महत्येसमान गणिलीं आहेत; तेव्हां तसलीं कर्में करणारा निष्ठुरांचा शिरोमणि हें उघड असूनही गुरुमहाराजांचे आन्हिकक्रमास उशीर होईल, यास्तव प्रस्तुत ती निंद्य पदवी स्वीकारण्यास मी इच्छितों आहें.

**राजा**—ठीकच, "अपवित्र ओढ्याला मी पोटांत कशी घेऊं" अशी शंका गंगेस कधीं तरी येईल काय? (प्रधानाकडे) प्रधानजी, शिक्षकास योग्य बक्षीस द्या.

**प्रधान**—(शिक्षकास शेला पागोटें वगैरे देतो).

**शिक्षक**—(तें घेऊन नंतर वसिष्ठास वंदून राजास मुजरा करितो).

**कंचुकी**—(पूर्ववत् ललकारून) अदबसें.

**शिक्षक**—(निघून जातो).

**विदू०**—(हात जोडून राजाकडे) सरकार, मला कांहीं बक्षीस!

**सुदर्शन**—वाहवा रे निर्लज्जा. बारा आणि पंधरा सत्तावीस! नाहीं का? (प्रधानाकडे) अहो प्रधानजी, तुह्मीं यास बक्षीस दिलें तर हा लाच्या खुश्शाल घेईल, ही विडंबना असें मनांत आणणार नाहीं. अहो, लोळतां लोळतां अंगावरील खवूदांचें रक्त निघून थोडेंसें चुर्चुरलें ह्मणजे काम झालें, परंतु ज्यावर लोळण घेतली तो ढीग कापुराचा असो कीं राखेचा असो, त्याला आपला सारखाच!

**विदू०**—वाहवा ! मघां गांवांतील सिंह ह्मटलें आणि आतां तर त्याचाही अजोबा लंबकर्ण !

**सर्व**—( हांसतात ).

**प्रधान**—(भालदाराकडे) अरे, या कुमारांस महालांत घेऊन जा आणि तत्क्षणीं त्यांची दृष्टि काढा असें सांग.

**कंचुकी**—(पूर्ववत् लल्कारून कुमारांसह सर्वांस यथायोग्य वंदन आणि मुजरा करून निघून जातो).

**राजा**—( वसिष्ठाकडे हात जोडून ) गुरुमहाराज, आज मृगयेस जावें, असें योजिलें आहे.

**वसिष्ठ**—राजन्, अकाल आहे याकरितां विचार करूनच. (शिष्यांसह उठतो).

**सर्व**—( उठून शिष्यांसह वसिष्ठास वंदितात ).

**वसिष्ठ**—(शिष्यांसह) कल्याणमस्तु. ( निघून जातो ).

**कंचुकी**—(आपल्या ठिकाणीं येऊन पूर्ववत् लल्कारितो)

**राजा**—प्रधानजी, मागील व्यवस्था ठेवण्याविषयीं तुह्मांस सांगणें नकोच.

**प्रधान**—( हात जोडून ) आज्ञा.

**राजा**—समरसिंहजी, मी अंतःपुराकडेस जाऊन येतों. स्वारीची निखालस तयारी असूद्या.

**सेनापति**—( हात जोडून ) हुकूम.

**राजा**—अरे वनचरा, महालांत जा आणि उशीर झाला आहे याकरितां दोनी स्वाऱ्या एकत्र असाव्या ह्मणून सांग.

**विदू०**—( हात जोडून ) हुकूम. ( निघून जातो ).

**राजा**—( पूर्ववत् लल्कारणाऱ्या कंचुकीस पुढें करून प्रधान आणि सेनापति यांसह निघून जातो ).

# अंक दुसरा.

---

## पात्रें १७.

| | | |
|---|---|---|
| १ | मनोरमा.......... | ध्रुवसंधिराजाची थोरली स्त्री. |
| २ | कंचुकी.... ...... | तिचा भालदार. |
| ३ | कलावती.... ..... | विदल्लप्रधानाची स्त्री. |
| ४ | लीलावती........ | ध्रुवसंधिराजाची धाकटी स्त्री. |
| ५ | वीरसू........... | समरसिंहसेनापतीची स्त्री. |
| ६ | विदूषक..... .. .. | एक हास्यकारी. |
| ७ | ध्रुवसंधिराजा..... | अयोध्याधिपति. |
| ८ | कंचुकी.......... | त्याचा भालदार. |
| ९ | सुदर्शन.......... | मनोरमेचा पुत्र. |
| १० | शत्रुजित्.......... | लीलावतीचा ,, |
| ११ | जासूद........... | सरकारी बातमीदार. |
| १२ | विदल्ल............ | मुख्य प्रधान. |
| १३ | समरसिंह........ | सेनापति. |
| १४ | चित्रलेख.......... | त्याचा कारभारी. |
| १५ | वसिष्ठ.... ........ | उपाध्याय. |
| १६ | समयज्ञ........... | त्याचा थोरला शिष्य. |
| १७ | सुमति........... | ,, धाकटा ,, |

## स्थळ-तेंच अयोध्येंतील राजमंदिर.

( तदनंतर भालदारास पुढें करून आणि प्रधानाची स्त्री कलावती इला बरोबर घेऊन, मनोरमा प्रवेश करिते ).

**भालदार**— आस्ते ३. कदम् मुलाजा ३. तफावत्सें.

**मनोरमा**— ( आसनारूढ होऊन, नंतर कलावतीस आपल्या उजव्याकडे हात दाखवून ) अशा बसा कलावती बाई.

**कलावती**—आज्ञा. ( तेथेंच किंचित् दूर बसते ).

**मनोरमा**—कलावती बाई, या; तुह्मी अम्मळ आली-कडेस बसलां तरी चिंता नाहीं. अहो, आह्मी दौलत-दार दौलतदार! दौलत दौलत ती काय, लहान अथ-वा मोठें जेथें राज्य ह्मणून आहे तेथें मुख्य प्रधान पंत-अमात्य इत्यादि अष्टप्रधान, तसेच जामदारखाना वगैरे अठरा कारखाने हा सांचा लोकांस दाखवायाला आहे-च. परंतु मला वाटतें, आमच्या पदरीं तुह्मांसारखीं चार सुगर मनुष्यें आहेत ही खरी दौलत!

( इतक्यांत पडद्यापलीकडे ) निगारखे मेहेर्बान् आस्ते कदम मुलाजा ३.

**मनो०**—लीलावतीबाईची स्वारी आली, तिचा मिर्धा पुकारितो हा.

**कला०**— ( उठून दूर उभी राहते ).

( नंतर सेनापतीची स्त्री वीरसू इला बरोबर घेऊन आणि भालदारास पडद्याच्या आंतच ठेवून लीलावती प्र-वेश तसाच मनोरमेला नमस्कार करून आसनारूढ होते).

**लीलावती**— ( कलावतीकडे ) कलावतीबाई, बसा.

( आपल्या डाव्या बाजूस हात दाखवून ) वीरसूबाई, तुह्मी अशा बसा.

**कला० आणि वीरसू**—( बसतात ).

( इतक्यांत विदूषक प्रवेश आणि आनंदानें सर्वांस मुजरा करितो ).

**कंचुकी**—निगा रखे मेहेर्बान, सलामफां, तफावतूसे.

**विदूषक**—( हांसत हांसत ) अहो, मला आज घरांतून बाहेर निघण्यास खास अमृतवेळा लागली ! जेथें जातों तेथें नबोलतां नचालतां कार्यसिद्धि !

**कलावती**—वाः काय चमत्कार आहे ! असे कोणते तुह्मी एथें येऊन झेंडे लाविले ?

**विदू०**—( नम्रतेनें ) अहो महाराज, हेच आमचे झेंडे. कोणाचा निरोप घेऊन जावें तितक्यापुरतेंच काम मारबीर न खातां झालें ह्मणजे बस्स.

**कला०**—मोठा गत्काळा, शिंगें मोडून वासरांत शिरणार ! कोण रे तुला उगीच मारील ? आणि तसेंच कांहीं गुण उधळले ह्मणजे त्याचा उताराच तो ! असो, पण प्रस्तुत कोणतें कार्य सिद्ध झाल्याबद्दल तुला इतका आनंद झाला ?

**विदू०**— ठीक आहे, सांगतों. मग त्यावरून तुह्मीच ह्मणाल कीं खरा आनंद आहे. अहो, गंगा आणि यमुना या दोघींस एकत्र करण्याकरितां भगीरथानें प्रयत्न केला; तितका जरी मी केला असता तरी, (मनोरमा आणि लीलावती यांजकडे ) या दोन्ही स्वाऱ्या एकत्र झाल्या नसत्या ! आणि राजेसाहेबांनीं तर मला सांगितलें, “तू महालांत जाऊन सांग कीं, आम्ही

महालांत येणार आहों आणि त्वरा तर बहुत आहे, याकरितां दोनी स्वाऱ्या एकत्र असाव्या." त्याप्रमाणें मी येतों तों आधींच आपलें तें कार्य सिद्ध !

**मनो०**— ( घाईनें ) अरे काय बोललास ? सरकार इकडेस येणार आहेत ?

**विदू०**—(हात जोडून) होय महाराज. हे आले ह्मणा. ( पडद्यापलीकडे ) भूमंडलाखंडल ध्रुवसंधिराज महाराज. आस्ते, कदम् मुलाजा.

**सर्व**— ( उठून किंचित् दूर उभे राहतात ).

( नंतर ध्रुवसंधिराजा प्रवेश करितो आणि मनोरमा तशीच लीलावती त्याला सामोऱ्या जाऊन आणितात ).

**राजा**— ( आसनारूढ होतो ).

**सर्व**— ( यथायोग्य त्याला नमस्कार, पायापडणें आणि मुजरे करितात ).

**कंचुकी**— ( पूर्ववत् ललकारितो ).

**राजा**— ( मनोरमेस आपल्या उजव्याकडे आणि डाव्याकडे लीलावतीस हातानें बसवून, नंतर कलावती आणि वीरसू यांजला बसावयास सांगतो ).

**कला० आणि वीरसू**—(पहिल्या जागीं बसतात ).

**राजा**—( मनोरमेकडे ) प्रिये महिषि, (लीलावतीकडे) अगे प्राणवल्लभे कनिष्ठे, आज मृगयेस जाण्याचा बेत केला आहे, परंतु वारंवार आपली हजेरी घेणारांस कळवावें आणि निघावें; इतकाच काय तो अवकाश.

**मनो०**— आतां आतां ? दिवस किती आला, आणि या वेळेस मृगयेला जायाचें ? असा कसा विलक्षण बेत झाला हा ? कां मृगया कधीं झाल्या नाहींत ?

**लीला०**—( किंचित् आवेशानें ) हा असला बाले-घाटी बेत कांहीं उपयोगी नाहीं. हें हो काय आपलें! निरंतर मृगया मृगया! "ऊठ रे नंदा आणि तोच धंदा" सदासर्वकाळ आपला छंद छंद छंद ह्मणजे काय! कोणताही नाद बेताचा असावा.

**राजा**—( दचकलेंसें करीत किंचित् आंग चोरून लीलावतीकडे ) अलालालाला! इकडून कोणी बोललें काय? मीं ह्मटलें का वीज कडकडली, का एखादा डोंगराचा कडा कोसळला! दुसऱ्याचा मात्र छंद आणि यांचा हा नव्हेका लाड!

**लीला०**—( डोळे मोडून ) लाडाविषयीं तरी दुसऱ्याला बोलून काय उपयोग! सर्वांचें मूळ कोठें आहे, हें आधीं मनांत आणावें. ( कलावतीकडे ) अहो, कोणी आपलें ऐकेल अशी आशा धरून मनुष्य बोलत असतें. खरेंच कीं नाहीं, सांगा बरें कलावतीबाई.

**मनो०**—फार कशाला, पण सर्वांचा मनोभंग करणें नीट नव्हे!

**राजा**—( असूयेनें ) अरेच्चा! ही महिषी आह्मांला एक पंतोजीच झाला!

**मनो०**—( मुर्वतीनें ) असें काय बोलावें!

**लीला०**—आणि असला एखादा पंतोजी तरी, आधीं श्रीमंत आणि त्यांत हेकेखोर असा शिष्य मिळाला ह्मणजे त्या मेल्या पंतोजीनें तेथें काय बाजा करावा? त्याची अक्कल त्याजपाशीं!

**कला०**—( राजाकडे ) राजेसाहेब, सरकारांला कोणी ठोसरे देईल असें कधीं कोणाच्या मनांत सुद्धां येणार

नाहीं, परंतु ही तरी महाराजांच्या दौलतीस उणीवच होती.

राजा— ठीक ! ह्मणूनच (लीलावतीकडे हात करून) हें लचंड गळ्यांत बांधून घेतलें ह्मणतां ?

मनो०— तें असो, पण आजचा बेत राहता केला तर नाहींच कां कामाचा ?

राजा— ( आश्चर्य करून ) आतां काय सांगावें ! आधीं गुरुमहाराजांपाशीं बोललों, नंतर स्वारीची तयारी होऊन कचेरीची मंडळी आपापल्या ठिकाणीं गेली, तेव्हां शहरांत तमाम पुकार झाली असेल; मग कसें ? अप्रामाणिकपणा पदरीं घ्यावा हेंच बरें ह्मणतां ?

विदू०— पण गुरुमहाराजांस विचारलें तेव्हां त्यांणीं "अकाळ आहे" असें उत्तर केलें !

लीला०— ( खेदानें ) सरकार, हें काय बरें ? गुरुमहाराजांनीं "अकाळ आहे" असें उत्तर केलें असतां तयारी कशी केली ?

राजा— ( किंचित् त्रासून ) आतां बोलण्याखालीं वेळ घालवून तुह्मी मला खास अप्रामाणिक ठरवितां ! ( विदूषकाकडे ) तुला रे कोणी विचारिलें होतें, गुरुमहाराजांनीं काय उत्तर केलें तें ?

मनो०— ( आर्जवानें ) प्राणनाथ, आम्ही आपणांस अप्रामाणिक ठरवितों ?. आमचें बोलणें तरी पुरतें ऐकून घ्यावें— श्लोक—( केकावली ).

तुह्मीप्रियतमासदैवमृगयेसठींघाबरे ॥
असापणअह्मींतरीकधिंनिषेधकेलाबरें ॥
परंतुअमुच्यामनींवानेंनआजिजावेंअसें ॥
असेहिऌपणार्थनासहजमोडितांहोकसे ॥१२॥

२

**राजा**— ( त्रासून ) उगीच असा खुळेपणानें निषेध केला तर कोणी ऐकणार नाहीं.

**मनो०**— ( गरीबीनें ) मग काय, उपायच नाहीं.

**लीला०**— ( खिन्न होऊन ) पण परत येण्याचें तरी लवकर झालें ह्मणजे बरें.

**राजा**— ( हर्षानें ) हां हां; असें ह्मणा, चिंता नाहीं ! तुमच्या मर्जीकरितां वायुवेगानें जाऊन तिसऱ्या दिवशीं परत; त्यांत काय आहे, पण बोलल्याप्रमाणें गेलेंच पाहिजे ! ( उठतो ).

**सर्व**— ( उठून यथायोग्य राजाच्या पायां पडतात व त्यास मुजरा करितात ).

**कंचुकी**— तफावतूसे. ( पूर्ववत् ललकारितो ).

**राजा**— ( भालदारास पुढें करून निघून जातो ).

**सर्व**— ( पूर्ववत् आपापल्या ठिकाणीं बसतात ).

( इतक्यांत सुदर्शन आणि शत्रुजित् प्रवेश केल्यानंतर यथायोग्य मुजरे करून सापत्नमातांपाशीं बसतात).

**दोघी**— आयुष्मंत व्हा.

**कंचुकी**— निगारखे मेहेर्बान सलामफां, तफावतूसे.

**मनो०**— ( काकुलतीनें ) मुलांनो, सरकार मृगयेस गेले तेव्हां तुमच्या शाळेकडे आले होते काय रे ?

**शत्रु०**— नाहीं नाहीं आईसाहेब, तसें झालें नाहीं. सरकार दिल्लीदरवाज्यांतून आणि शिंगें डंका ऐकूं आल्यामुळें आम्ही शाळेंतून एकदांच बाहेर पडल्यावर मग काय, आयतीच गाठ !

**सुदर्शन**— पण आईसाहेब, ते आह्मां दोघांचे मुके घेऊन लगबगीनें पुढें चालते झाले तेव्हां त्यांच्या डोळ्यांस पु-

ष्कळ पाणी आलें, आणि लांब जाईत तोंपर्यंत आह्मां-
कडे वरच्यावर मुर्डून मुर्डून पहात, त्यावरून जाणो का
कोठें फार फार दूर जायास निघाले आहेत अशी त्यांची
चर्या दिसली!

**सर्व**—( गहिंवरतात ).

**शत्रु०**—पण आईसाहेब, आह्मांला चैन पडत नाहीं हो!

**मनो०**—( काकुलतीनें ) कसें चैन पडेल? आणि
त्यांतही तुमच्या भुकेची वेळ झाली आहे, तर तुह्मी जे-
ऊन या.

**सुद०**—( दोघींकडे ) महाराज मातुश्री, आमच्या
दोन आवृत्ती होऊन ही तिसरी, यास्तव आपण चलाल
तर आह्मी जेऊं!

**मनो०**—बरें आहे बाळा, चला. ( विदूषकाकडे )
वनचरा, जारे जेवणाची तयारी झाली कां पाहून ये.

**विदू०**—महाराज, तयारी केव्हांच झाली आहे!
वाकनीस मघांपासून तीनदां डोंकाऊन गेला.

**लीला०**—( मनोरमेकडे ) चलावें तर.

**मनो०**—ठीक आहे. ( विदूषकाखेरीज सर्व निघून
जातात ).

( इतक्यांत विदल्लप्रधान प्रवेश करितो ).

**प्रधान**—( हिरमुशी होऊन ) वनचरा, राजेसाहेब
मृगयेस गेले आहेत, आणि इकडे मला रात्रीं एक दुष्ट
स्वप्न पडलें, त्याणें अगदीं वेड लागल्यासारिखें झालें
आहे! असो, संकेताप्रमाणें उद्यां स्वारी परत आली
ह्मणजे झालें. ( निघून जातो, इतक्यांत सुदर्शन आणि
शत्रुजित् हे दोघे येतात ).

सुद०— वनचरा, काल प्रधानजी आले होते ते महाराजांची स्वारी आज खास येणार असें बोलले काय रे ?

विदू०— नाहीं साहेब, काल संध्याकाळची डाक आली तिजवरून तसें कांहीं समजलें नाहीं, पण आजची आली ह्मणजे खास समजेल. आणि स्वारी आजच यायची असल्यास आतां इतक्यांत डाक येईल.

शत्रु०— ( सुदर्शनाकडे ) चला आपण डाकेचा शोध करूं.

सुद०— चला. ( दोघे निघून जातात, इतक्यांत प्रधान प्रवेश करितो ).

प्रधान—( हिरमुशी होऊन ) वनचरा, राजेसाहेबांचा परत येण्याचा आज तिसरा दिवस, ह्मणून दोघी राण्या तसेंच दोघे राजपुत्र यांचे डोळे राजेसाहेबांच्या वाटेकडे सर्वांहून अधिक लागले असतील! शिव शिव शिव!!

विदू०— ( घाबरून ) हें काय प्रधानजी; तुमचीं नेत्रांतील गुप्त आंसवें, दिलगीर मुखमुद्रेचीं चिन्हें पाहून, तशींच उदास वाक्यें ऐकून आणि छातींतील हुंदक्याचीं लक्षणें जाणून माझी तर बोबडीच वळली!

प्रधान—( धुसकारा टाकून ) छे रे बाबा, सांगवत नाहीं पण काय करूं? स्वारींतील आतांची ताजी आलेली खबर मोठी विपरीत आहे! ( हातांतील कागद भुईवर आपटून धडपडत खालीं बसतो ).

विदू०—( उकीडवा बसून आणि खालीं पहात पहात दोहों हातांनीं आपलें डोचकें धरून ) राम राम राम! ( किंचित् अवकाशानें पूर्ववत् वर पाहून ) प्रधानजी, पुढें?

प्रधान— पुढें काय! या खबरीचा शेवट फार

भयंकर दिसतो! (थुसकारे टाकीत निघून जातो).

(इतक्यांत मनोरमा, लीलावती, कलावती आणि चीरसू या येऊन पूर्ववत् बसतात).

**मनो०**—(कलावतीकडे) काय हो कलावतीबाई, आज चहूंकडे मोठ्या उदाशीची धांदल दिसत्ये! हें आहे तरी काय? "दुकाळांत तेरावा महिंना".

**कला०**—महाराज, आपलें चित्त पतिवियोगाच्या खेदानें अधिकच नाजूक झालें असल्यामुळें नानाप्रकारच्या संशयांनीं विरस होण्याचा संभव आहे, पण साहेब, जसजसा प्रसंगाचा कठिणपणा दिसून येत जाईल, तसतसा आपणही वाढता गंभीरपणा धरिला पाहिजे.

**लीला०**—कलावतीबाई, कसेंही ह्मणा, परंतु चित्त आज कांहीं ठाव देत नाहीं!

(इतक्यांत पडद्यांतून एक जासूद येतो).

**जासूद**—(घाबऱ्या घाबऱ्या वारंवार चहूंकडे पाहून) अहो, एथें कोठें नाहींत! (लगबगीनें परत जातो).

**मनो०**—(चकित होऊन) कोठला हा जासूद! आणि तो घाबरेपणानें कोणास पाहून गेला बरें?

**लीला०**—(खिन्न होऊन) चिन्ह नीटसें दिसत नाहीं.

(नंतर पडद्यांत). अहो, मोठें आश्चर्य वाटतें, पण असें झालें तरी कसें! वेळ आली ह्मणजे कांहीं उपाय चालत नाहीं. शिव शिव शिव! (असे भयंकर शब्द होतात).

**मनो०**—(घाबरून) अरे कंचुक्या, जा जा लवकर धूम ठोक; आणि प्रधानजीस घेऊन ये, धांव!

**कंचु०**—(हात जोडून) हुकूम. (आंत जाऊन प्रधानासह येतो).

**प्रधान**—( खिन्नवदन होत्साता दूर उभा राहतो ).

**कला०** आणि **वीरसू**—( उठून लांब लांब उभ्या राहतात ).

**मनो०** आणि **लीला०**—( प्रधानाच्या तोंडाकडे पाहतात ).

**प्रधान**—( डोळ्यांस पदर लावून आंतल्या आंत मुसमुसतो ).

**मनो०** आणि **लीला०**— अरे देवा३! ( असा हंबरडा फोडीत घाबऱ्यानें उठून गादीच्या पुढें दोन पावलें प्रधानाकडे जाऊन रडत रडत) काय झालें हो; प्रधानजी?

**प्रधान**—( आंतल्या आंत मुसमुसतो ).

( इतक्यांत ध्रुवसंधिराजाचा भालदार येऊन मनोरमा आणि लीलावती यांच्या समोर उभा राहतो).

**भालदार**—अत्रे त्रिस्सेस्सर, अबे बैकुंठनाथ, तू दयासागर होकर आज कैसारे तूनें आपना दिल् हमारेवास्तें कठण कीया, और सब्लोगन्के नयनन्मो मट्टी डारी! आजरोजलग मेरेपाससें तेडीबाकी कैसीबि नौकरी सरकारनें लायी. ( मोठ्यानें ) अजतल्लख मैं किस्के आगे "ध्रुवसंधिराजमहारा३ज" ऐसा पुकारू रे संकरजी! ( असा हंबरडा फोडून आंग धरणीवर टाकितो ).

**सर्व**—हर हर हर, हे परमेश्वरा३! ( असें ओरडून भूमीवर अस्ताव्यस्त पडतात ).

**प्रधा०**—( त्वरेनें सर्वांस उठवून नंतर मनोरमा आणि लीलावती यांच्या पुढें बसून काकुलतीनें ) महाराज, आपण परम सुज्ञ असून असें कां बरें करितां? अशा

प्रसंगीं चित्त दगडासारखें कठिण केलें पाहिजे! आणि पहा, आतां तीं लेंकरें शाळेंतून येतील; त्यांच्या समक्ष तुह्मीं असा अकांत केला तर अगदींच घाबरतील! याकरितां त्या बालकांकडे पहा.

**सर्व**–( गप्प राहून आंतल्या आंत तळमळतात).

( इतक्यांत सुदर्शन आणि शत्रुजित् आनंदानें उड्या मारीत येऊन सापत्नमातांपाशीं बसतात ).

**मनो० आणि लीला०**–( आंसवांनीं भरलेल्या दृष्टीनें वर पाहतात ).

**शत्रुजित्**–( सर्वांकडे पाहून घाबऱ्यानें ) आईसाहेब, माझें काळीज धडधड करितें!

**सुदर्शन**–( दोघींकडे पाहून काकुलतीनें ) मातुश्री, आपण इतक्या घाबरलां कां बरें? अथवा ठीकच आहे, आज तिसरा दिवस तेव्हां आतां महाराज येतील आणि दोन प्रहर होऊन गेले तरी तुह्मी आजून कां जेवलां नाहीं, ह्मणून खूप रागें भरतील, यासाठीं घाबरलां असाल. असो, पण आतां मी थोरला रथ सोडून त्वरेनें महाराजांस घेऊन येऊं का? नाहीं तर तुह्मी केवढा वेळ उपाशी राहणार?

**सर्व**–( आंतल्या आंत मुसमुसतात ).

**शत्रुजित्**–( चकित होऊन मनोरमेकडे ) आईसाहेब, महाराज केव्हांसे येतील हो?

**लीला०**–( रडतरडत ) बाळांनों, आतां सरकार यायचे नाहींत! ( मोठ्यानें रडते ).

**सुद०**–( घाबरून ) असें कां बरें बोलतां माईसाहेब? महाराज मृगयेकरितां अरण्यांत गेले आहेत, ते

आतां अयोध्येस येत नाहींत? त्यांणीं कां बरें आपला इतका कंटाळा केला? त्यांस इतका राग येण्यासारखें आपण तर कधीं कांहीं केलें नाहीं! आणि तेही आह्मांवर पुष्कळ ममता करितात.

**मनो०**—( तळमळून रडत रडत ) बाबा, "ममता करितात" असें आतां कशाला ह्मणतोस? "करीत होते" असें ह्मण!

**सुद०**—( धाईनें धुसकारा टाकून ) शिव शिव शिव! ( रडत रडत ) आईसाहेब, असें काय भयंकर बोलतां!

**लीला०**—लेंकरांनों, ते आतां अरण्यांत देखील नाहींत! आपलें दैव फिरलें ह्मणून या भूलोकास आणि आपल्या देहासही सोडून लोकांतरास गेले!

**सर्व**—हर हर हर! अरे देवा३ (हंबरडा फोडितात).

**सुद० आणि शत्रु०**—अहो महाराज (असें ओरडत तोंडावर दोन्ही हात ठेवून आयांच्या पोटांत डोचकीं खुपसतात).

**दोघी**—( त्यांस पोटाशीं धरून त्यांच्या पाठीवरून हात फिरवितात ).

**मनो०**—लेंकरांनों, आतां तुह्मी कितीं तरफडलां तरी, या त्रिभुवनांतही याविषयीं तुमची कोणी दया करणार नाहीं!

**सर्व**—( गहिंवरून ) अरे परमेश्वरा३!

**सुदर्शन**—माईसाहेब, त्यांस झालें तरी काय हो?

**लीला०**—बाबा, अजून तें कांहींच समजलें नाहीं; पण सरकारांचा भालदार (भालदाराकडे) तो पहा

"आजपासून मी कोणापुढें पुकारूं" याप्रमाणें ओरडून केवढा वेळ मूर्च्छित पडला होता!

( इतक्यांत आपला कारभारी चित्रलेख या सहवर्तमान मुखास पदर लावून समरसिंह सेनापति येतो आणि समोर उगीच बसतो).

**मनो०**—( रडक्या सुरानें ) कां सेनापति, "तिसऱ्या दिवशीं परत येतों" असा करार करणारे सत्यवक्ते तुमचे यजमान कोठें आहेत? त्यांस घेऊनच तुम्ही आलां असाल!

**सर्व**—( खळखळां रडतात ).

**सेनापति**—( कपाळाला हात लावून ) नशीब फुटलें, आतां काय बोलूं!

**प्रधान**—( रडक्या स्वरानें ) सेनापती, कसें काय झालें हो हें?

**सेना०**—(तोंड पदरानें झांकून चित्रलेखाकडे पाहतो).

**चित्रलेख**—( हात जोडून ) काय सांगावें प्रधानजी? पहिल्या दिवशीं सायंकाळीं मुळीं तेथें पोहोंचलों. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सरकार घोर अरण्यांत शिरले, त्या वेळेस घोड्यांच्या टापा, तसेंच त्यांचे हिसणें, धनुष्यांच्या जीवांचे टणत्कार, आणि या सर्वांचे प्रतिध्वनि, यांणीं सारें अरण्य गर्जायास लागलें; तेंव्हां नानाविध पशू तसेंच पक्षी घाबरून इतस्ततः धावूं लागले, परंतु राजेसाहेबांचें वेधकौशल्यच विचित्र! तशाही त्या दंग्यांत त्यांणीं पराकाष्ठेच्या हातचलाखीनें व्याघ्रादिक कांहीं घातक जीव मारून, तसेच कांहीं घाबरल्यामुळें दुसऱ्याकडे पळून जाणारे यांस धनुष्याच्या भयंकर

ध्वनीनें मूर्च्छित पाडून, हरिणादि जे भक्षणीय यांचें ग्रहणही केलें.

**प्रधान**— ठीकच! तें हस्तलाघव काय विचारावें!

**मनो०**— ( चित्रलेखाकडे ) बरें पुढें?

**चित्र०**— मग काय महाराज, याप्रमाणें दोन प्रहर गुजरले, नंतर स्वारी परत येण्यास निघत्ये तोंच एक जबरदस्त सिंह उठला आणि त्यास पाहतांच धणीसाहेबांचा तो रणोत्साही घोडा, याणें बेफाम होऊन त्याजवर जी चौखुरी धांव घेतली! आणि सरकारही भरीभरल्यासारखे झाले! तशाही वेगांत त्या तेजीला कमची दाखवून उत्तेजन आणीत! तें सारें पाहून कित्येकां वीरांनीं घोडे टांकिले, परंतु क्षणांत महाराज दिसेनात असें झाल्यानंतर उपाय नाहीं ह्मणून वीर परतले! मी मात्र बिनीवरच असल्याकारणानें ही सिंहाची शिकार होई तोंपर्यंत वनांतील कांहीं चमत्कार पहावे, या हेतूनें पुढें लांब गेलों होतों यामुळें हा वृत्तांत त्या समयीं मलाच विदित; असो, तो सिंह कड्यांतून उड्या घाल्लींत चालला आणि त्याच्या मागें राजेसाहेब. त्यांस पाहून वाटलें कीं, पुढें शेष पळतो आणि त्याजवर मागून गरुड झडप घालितो आहे काय?

**प्रधान**— अहाहा! ह्मणून महाराजांचें शौर्य ऐकूनच शत्रूंची उमेद खचून जात होती कां उगीच!

**मनो०**— ( चित्रलेखाकडे ) बरें, पुढें?

**चित्र०**— नंतर महाराजांनीं त्या सिंहास गांठून तो एका बाणाचें काम, असें असतांही पुष्कळ खटपट केली तरी आवरेना! तेव्हां ते आश्चर्य करून बोलले

"अहो, मी क्षणामध्यें अनेक श्वापदें वधून आपला मृगयार्थ साधिला, परंतु या सिंहावर कांहींच उपाय कसा चालेना! असा हा मला अनावर कसा झाला!" ( गप्प राहतो ).

**मनो०**— बरें, पुढें ?

**चित्र०**— ( गहिंवरून ) पुढें काय सांगू महाराज, भर दोन प्रहर होऊन गेले; त्या समयीं तो उन्हाचा ताप, भुकेचा ताप, तृषेचा ताप आणि तो सिंह आवरेना हा ताप, अशा त्या चारप्रकारच्या तापानें सरकार ग्लान झाले; असें दिसून येतांच त्यांजवर त्या दुष्टा पंचाननानें आपल्या मानेवरील केस ताठ उभारून, अक्राळविक्राळ दाढांनीं तशाच बाहेर पसरलेल्या लाल जिव्हेनें अतिभयंकर असा जाबडा पसरून आणि क्रूरदृष्टीनें किरण साधून, तत्क्षणीं मोठ्या वेगानें गर्जतच झडप घातली! मग काय! ( धुसकारा टाकितो).

**सर्व**—( खालीं माना घालून आंतल्या आंत फुंदतात ).

**लीला०**—( कपाळावर हात ठेवून बारीक रडक्या स्वरानें ) अरे, सांग पुढें, आतां काय! पाषाणत्हृदय आह्मी ऐकायास बसलोंच आहों! ( धुसकारा टाकिते ).

**चित्रले०**—( डोळे पुसून ) पुढें काय सांगूं महाराज! परंतु माझ्या वांट्यासच आलें आहे, उपाय नाहीं! असो, कोपलेल्या यमदूतांहूनही अतिक्रूर अशा त्या तापलेल्या मृगेंद्रानें, बाणांच्या अग्रांसारख्या उग्र दांतांनीं राजेसाहेबांचें नरडें फोडून त्यांस त्याच ठिकाणीं मुर्गाळून टाकिलें!

**सुद०** आणि **शत्रु०**—( लोळण घेऊन ) **अहो महा-रा३ज** ! ( हातपाय भुईवर अपटितात ).

**मनो०** आणि **लीला०**—अरे देवारे३ ! ( आंग भुई-वर टांकू पहातात ).

**कला०** आणि **वीर०**—( रडत रडत चटकर त्यांच्या मागें बसून त्या दोघींस आपल्या आंगांवर घेतात ).

**मनो०**—( तळमळून ) हायरे हाय ! अहो प्राणनाथ महाराज, घरांत, दारांत, कचेरींत, असें सर्वत्र आपल्यास या बालकांचा वियोग एक क्षणभरही सहन झाला नाहीं ! रात्रंदिवस, "आमचा शत्रुजित् आपलें नांव ऐक-विण्यानेंच शत्रूंचें दमन करील ! आमचा सुदर्शन कचे-रीच्या मंडळींत, नक्षत्रांमध्यें चंद्र दिसतो त्याप्रमाणें शोभतो ! आमचा शत्रुजित् कसा हरिणासारखा ठिकत धांवतो ! मीं सुदर्शनाचें मुख पाहिलें ह्मणजे माझीं नेत्रें कापुराचें अंजन घातल्यापेक्षांही शीतळ होतात "! असें निरंतर तोंडांत शत्रुजित् शत्रुजित् आणि सुदर्शन सुद-र्शन ! प्राणनाथमहाराज, असा या लेंकरांचा लळा आपण चित्त कठिण करून एकाएकीं कसा तोडला हो ! "मृगया करून तिसऱ्या दिवशीं परत येतों" असा आह्मांला भरंवसा देऊन निघून गेलां ते, सर्व परिवार आणि देवेंद्रासारखें ऐश्वर्य यांजवर लाथ मारून, आह्मांस दोन सुखदुःखाच्या गोष्टी विचारण्या-सही अवकाश न देतां, अल्लड लेंकरें आणि दीन आह्मी यांची माया तोडून, कसें लोकांतरीं प्रयाण केलें ? महाराज, सत्यवक्ते आपण; तर असें करणें आपणांस योग्य काय ? अहो प्राणपती, गुरुमहाराज आणि सर्व

परिवार, "नका जाऊं नका जाऊं" असें ह्मणत असतां कां बरें दुराग्रह करून गेलां? कोणाही पुरुषाला ग्रामांतरीं जाणें असल्यास तो देखील आपल्या बायकामुलांची योग्य व्यवस्था करून जातो, आणि आपण हें कांहींच मनांत न आणितां लोकांतरींही निघून गेलां! आतां आमची गोष्ट असो पण, हीं निरपराध बालकें, "अहो महराज, अहो महाराज" असें घसा फोडून आक्रंदतात आणि जळांतून काढिलेल्या माशाप्रमाणें तरफडतात, यांच्यांशीं तरी कृपा करून एक वेळ बोला! अहो प्राणवल्लभा, आतां आह्मीं दुबळ्यांनीं आपणांस कोठें पहावें बरें? हर हर हर! हे परमेश्वरा३!

**लीला०**–(तळमळून) अहो प्राणवल्लभा, आपण गुरुमहाराजांचें अनुमोदन नसतां, आह्मां सर्वांचाही मनोभंग करून, जसा कांहीं एखादा गांजलेला पुरुष बुद्ध्याच घरादारांचा त्याग करून जातो, तसे निघून गेलां, यास काय ह्मणावें बरें? आणि आपल्या मर्जीस इतका झटका बसावा, असें आह्मीं कधीं कांहीं केलें नसतांही,—

## गोपीगीत.

जाउनीबळेंप्राणवल्लभा। दुष्प्रवृत्तिंहीहृदयिंभल्लभा॥
घातलीकशीफुकटदैन्यहीं। वरितिलेंकरेंसकळसैन्यहीं

शिव शिव शिव! हे विश्वेश्वरा३!

**मनो०**—हर हर हर, हे जगन्नियंत्या सर्वेश्वरा, तुझी मर्जी! असो; प्रधानजी,

१ दुर्वार्ता. २ बाणासारखी.

**प्रधान**–( हात जोडून ) आज्ञा. ( उठून किंचित् पुढें येतो ).

**मनो०**–( त्वरेनें ) प्रधानजी, आतां इहलोकीं आणि परलोकींही बायकांस पतीची अनुवृत्तिच उचित यास्तव आह्मीं गुरुमहाराजांचें अनुमोदन घ्यावें, असें मनांत आणिलें आहे, आणि आजपासून या मुलांस, आई, बाप, देव, धर्म, स्वजन, आप्त, सर्वांच्या ठिकाणीं तेच आहेत! यास्तव ते आणि तुह्मी जसें वाटेल तसें यांस सांभाळा! ( धुसकारा टाकून नंतर किंचित् स्तब्ध राहून मुलांकडे ) लेंकरांनों, इतःपर कोणत्याही गोष्टीविषयीं हट्ट करूं नका आणि अल्लडपणा सोडून द्या बरें! ( मोठ्यानें हुंदका काढून रडक्या स्वरानें ) अरे, आतां तुह्मांला सर्वकाळ परक्या मनुष्यांशीं प्रसंग! त्यांतून कोणी विचारवान् असेल तो मनांत आणील कीं, "हीं बाळकें कोणाचीं, आजपर्यंत होतीं कशीं, आणि आतां यांजवर वक्त कसा आहे!" पण बाळांनों, सारीं मनुष्यें सारखीं नसतात; ह्मणून पोटांत तडा तडा तोडतें कीं, कोणी बेमान खसा खसा तुमच्या आंगावर खेकसतील! कां कोणी घडोघडीं चटाचटा तुह्मांला मारतील! कां नाहीं नाहीं तसल्या शिव्यागाळी देतील आणि अशीं तीं त्यांचीं निर्दय कर्मं तुह्मांला सहन न झालीं ह्मणजे तुह्मी, रडण्याच्या उकळीनें वांकडे होऊन थरथरा कांपते ओठ भयास्तव दाबून धरून, तसेच पोटांतून येणारे हुंदके गिळीतगिळीत, आंसवांनीं डबाबलेल्या दीनदृष्टीनें कोणाकडे पहाल? आमचे महालांच्या दारांकडे? अथवा आपली दाद घेण्याकरितां त्या दारांतून येणारे

आतां कोणी उरलें नाहीं! असें समजून आकाशाकडे पहाल! दुर्दैवानें दुसरी जागा कोठें राहूं दिली आहे! (खालीं मान घालीत किंचित् गुप्त रुदन करून) असो; यासाठीं सांगतें, जरी चाकर तरी इतःपर ते तुह्मां अनाथांला आश्रय देणारे तुमचे धणी आहेत, असें पुर्तेपणीं ध्यानांत धरून, परमेश्वर तुमचे पाय भुईला लावी तोंपर्यंत, त्या सर्वांच्या आर्जवानेंच हे दुःखाचे उदास दिवस काढा; बरें माझ्या बाबांनों! (पदरानें मुलांचे आणि आपले डोळे पुसून प्रधानाकडे) प्रधानजी, या बालकांनां तसेंच राज्याला सांभाळण्याविषयीं तुह्मांस सांगणें नकोच, पण हें शेवटचें सांगणें ह्मणून बोलल्यें इतकेंच.

**प्रधान**—(डोळ्यांस पदर लावीत किंचित् गुप्त रुदन करून) महाराज मातुश्री, आपण अनुमोदन घेण्याचें बोललां, परंतु आतां आह्मांस चहूंकडून उन्हाळा करूं नये! मातुश्रींचें ह्मणणें, "पतीची अनुवृत्तीच स्त्रियांस योग्य," तर तशीच मातेची लेंकरांस, यजमानांची चाकरांस, राजाची प्रजेस, अशा परंपरेनें, "जसा एखाद्या अरण्यास वणवा लावावा तसा" साऱ्या राष्ट्राला शोकाग्नि लाविल्याप्रमाणें होईल! यास्तव त्या अनुमोदनाविषयीं मातुश्रींनीं पुनः मनांत सुद्धां आणूं नये, आणि गुरुमहाराजांस नाहीं अथवा होय ह्मणण्याच्या संकटांत घालूं नये, याकरितां आह्मीं सर्वांनीं हा पदर पसरला आहे! (पुढें जाऊन पदर पसरतो).

**मनो०**—(मान आडवी टाकून) मर्जी जगदीश्वराची! (धुसकारा टाकिते).

(इतक्यांत दोघां शिष्यांसह वसिष्ठ प्रवेश करून मनोरमा

आणि लीलावती यांच्या समोर उजव्या तर्फेस बसतो ).

**वसिष्ठ**—(अनुक्रमानें मनोरमाप्रमुखांकडेस पहात पहात डोळ्यांस आंसवें आणून) हे मनोरमे, अगे लीलावति, अरे राजकुमार हो, कसें रे तुह्मांवर हें आकाश कडकडलें !

**सर्व**—( आंतल्या आंत फुंदतात ).

**वसिष्ठ**—( सर्वांचें सांत्वन करण्याविषयीं मनांत आणितो, परंतु आधीं आपल्यास आलेला हुंदका आवरेना, आणि तो बायकामुलांस तर कळूं नये, यास्तव समयज्ञाकडे ) रे[1] समयज्ञ, चित्रंकिलकालव्यवसितं । विचारशालिनोध्रुवसंधेरपिमनसिताद्दगकालाखेटकदुराग्रहउदियायैतदेवादावसंभाव्यं । तत[2]श्चतदनुकूलमेवतेननरनाथेनापिस्वभार्याद्युदीरितान्निषेधार्थगर्भितान्प्रार्थनाव्याहारानिवस्वसेवापरान्श्चूराचारचतुरानधिज्यशरासनविराजितकराननुचरान्वीरानप्यारात्समुज्झित्यघोरारण्यांतरेतरसाद्दुद्रुवे । अहो[3]भवितव्यानुसारिणीबुद्धिः कथं[4]चान्यथाललाटंतपतपनमयूख

---

१ अरे समयज्ञा, काळाची करणी विचित्र खरी! विचारवंता ध्रुवसंधिराजाच्याही मनांत तसल्या अकालमृगयेविषयीं दुराग्रह उगवला; हेंच मुळीं विपरीत! २ तदनंतर त्याप्रमाणेंच त्या राजानेंही आपल्या भार्यादिकांनीं वदलेल्या निषेधसूचक अशा प्रार्थनारूप भाषणांप्रमाणें, आपल्या सेवेविषयीं तत्पर, वीरधर्मनिपुण, तयार केल्या धनुष्यानें शोभायुक्त आहेत हात ज्यांचे, आपल्या अनुलक्षें करून चालणारे, अशा वीरांलाही दूर टाकून घोर अरण्यांत वेगानें धांव घेतली. ३ आश्चर्य कीं, होणारासारखी बुद्धि! ४ नाहीं तर, कपाळ तापविणाऱ्या सूर्यकिरणांच्या तापानें कढत झालेल्या आणि झपाट्यानें वाहणाऱ्या वायूच्या वेगानें सत्वर मंडळाकार कालविलेल्या धुळीच्या अंधानें धुंद झालेल्या, तसेंच करकरीत दुपार झाल्यामुळें भयंकर दिसणारे आणि उंचसखल शिखरांनीं विक्राळ, अशा पर्वतांचे खोल दऱ्यांच्या पंक्तींनीं वेढलेल्या उग्र अरण्यांत; ते नरपति आणि सिंह, परस्परांचें मरण इच्छिणारांच्या भावाप्रत कसे पावले?

तापसंततप्रबलानिलवेगचपलविरचितमंडलाकृतिविलोडन विलोलधूलिपटलाविले, क्रूरतरमध्यंदिनभयंकरदर्शनदंतुरशिखररौद्रगिरिगंभीरकंदरावलिवलयिते, महारण्योदरेतौ नरमृगेंद्रावन्योन्यनिधनविधित्सुतामगाताम् । तद[१]घटितघटनापटीयान्खलुविधिः द[२]र्शितमपियेनेदंतावत्स्पष्टमद्भुतंस्वकर्म—

**प्र[३]जाहृत्कुमुदानांय चंद्रेणापिधराभृता ॥**
**प्रसह्योत्पाद्यशोकाग्निं तानिनिर्दहितद्रुतं ॥१४॥**

को[४]यंदारुण:प्रसंग: य[५]द्वृत्तांतश्रवणव्याकुलमेतन्नगरंश्रीमद्रामचंद्रविपिनवासावसरइव, प्रलयप्रकंपनप्रकंपितजीमूतमंडलसभीमनिनदनिपतत्तडित्ततिप्रतिभयारावमद्यपुनारुराव। दु[६]र्भेद्योहिहृदयग्रंथि: हर हर हर! असो. हे राजप्रिय हो, झाली ही गोष्ट संसारी लोकांस दु:खदायक खरीच! परंतु तुह्मी असा विचार करा कीं, आजपर्यंत तुह्मांस इतकें सुख झालें, हें तुमच्या इच्छेनें झालें कीं काय? जसें सर्वेश्वराच्या इच्छेनें तें, तसेंच हें. या सृष्टिधर्मांविषयीं राजा आणि रंक सारखेच आहेत! कोणी आनंद मानो किंवा खेद, तो सृष्टिप्रवाह आपला सारखा चाललाच आहे. आणि प्रतिव्य-

---

१ तस्मात् दैव अघटितघटनासमर्थ खरें! २ ज्याणें तितकें आश्चर्यकारक हें आपलें कर्म स्पष्ट दाखविलें देखील. ३ ज्यास्तव प्रजांचीं हृदये हींच जीं चंद्राच्या योगानें प्रफुल्लित होणारीं कमलें, त्यांच्या राजा, या चंद्रानेंच बुद्ध्या शोकाग्नि उत्पादून तीं कुमुदें त्वरेनें जाळिलीं! ४ कोण हा दारुण प्रसंग! ५. ज्याचे वृत्तांताच्या श्रवणानें व्याकुळ हें अयोध्यानगर, श्रीमद्रामचंद्राच्या वनवासास निघण्याचे समयाप्रमाणें, प्रळयकाळच्या मोठ्या वाऱ्यानें हालवून दिलेल्या मेघमंडळापासून कडकडत पडणाऱ्या विजेच्या रांगेप्रमाणें भयंकर घोष होई, असें आज पुन: रडलें! ६ कारण, परस्परांच्या अंत:करणांची "बहुत दिवस वहिवाटींत असल्यामुळें" पक्की बसलेली स्नेहरूप गांठ, प्रयत्नानेंही सुटणें अशक्य!

क्तीस प्राय: भिन्नानुभव, असें हें विषयसुख केवळ कल्पित आहे! पहा बरें, अगदीं नाचाऱ्या मनुष्यांस मौक्तिकादि रत्नें कितीं पण प्रिय वाटतात! जाणो कां ते स्वर्गलोकचेच पदार्थ! आणि ज्यांजपाशीं तीं पुष्कळ आहेत, ते भाग्यशाली लोक त्यांस कंटाळून आंगावर फारसे घालीतही नाहींत. तस्मात् या अशाश्वत पदार्थांच्या दर्शनादिकानें सुखाचा भास मात्र! यास्तव मनुष्यानें वैषयिक सुखाविषयीं चालाचालीची दृष्टि ठेवावी. ईश्वरेच्छेनें जें होणार, तें जीवाच्या हातून न्यूनाधिक होण्याचा संभवच नाहीं! यास्तव मनुजानें असें मनांत आणावें कीं, या सृष्टीमध्यें माझी हानि होण्याची शंका अगदीं नाहीं. जें कांहीं होतें आहे, ही सारी माझी प्राप्तिच होय; कारण कीं, पंच ज्ञानेंद्रियें तशींच कर्मेंद्रियें आणि मन, यांणीं विराजमान अशा या पांचभौतिक देहाच्या रचनेविषयीं ब्रह्मदेवाखेरीज दुसऱ्या कोणाची शक्ति चालेल काय? तस्मात् ब्रह्मदेवानें रचिलेलें हें शरीर मला आयतेंच मिळालें आहे! तर अशा फुकटच्या शरीरास धरून, "जसा लुटारू मनुष्य एखाद्या भाग्यवानाच्या घरांत शिरतो तसा" मी या ऐश्वर्यमय सृष्टींत शिरलों आहे! मला ईंत कदाचित् ज्ञान वैराग्य इत्यादि उत्तम पदार्थांच्या पेठेंतील माल सांपडेल तर, प्राणसंबंधी तहान, भूक, मन:संबंधी शोक, मूढता, आणि देहसंबंधी जरा, मृत्यु, या षडूर्मींस विसरून मी आगंतुक ह्मणजे जीव आहें तो यजमान ह्मणजे शिव देखील होईन!! कारण माझा देहसंबंध सुटेल! मग घटाचा विध्वंस झाला, ह्मणजे घटाकाश आणि

महाकाश एकच आहे! अस्तु; तात्पर्य, या सृष्टींत माझी हानि लेशमात्र नसून सारी प्राप्तिच असल्यामुळें मी सर्वदा सुखरूप आहें!! अशा विचारावरून सिद्ध होतें कीं, अगदीं निर्धनानें सुद्धां दुःखी असूं नये! आणि मनोरमे, तुमच्या हातीं तर सार्वभौमत्वाचा अधिकार, सूर्यचंद्रांसारखे दोघे पुत्र! या पुत्रांची योग्यता पाहूनच राजानें यांजवर राज्यभार ठेविला आणि स्वर्गसुखोपभोगार्थ प्रस्थान केलें. असें सारें संगतवार मनांत आणून गंभीरपणानें मुलांचें नीटनेटकें करणें तुह्मांकडे आहे; याकरितां चला आतां सरयूतीरीं.

**मनोरमा**– ( हात जोडून ) आज्ञा गुरुमहाराज.

**वसिष्ठ**– ( प्रधानाकडे ) प्रधानजी, आतां सरयूतीरीं द्वादशाहांतकृत्य आणि राजमंदिरामध्यें त्रयोदशादिनसंबंधि मंगलकृत्य होई तोंपर्यंत राज्याभिषेकाचा संभार ह्मणजे, नवीं छत्रचामरें, नवा गज, नवा अश्व, नवा रथ, नवा शुभ्र पोषाक, राजाला, आणि इतकें सारें उपाध्यायास देण्याकरितां; खेरीज एक नवा सुवर्णकलश, नवा रौप्यकलश आणि नवा ताम्रकलश; सर्व तीर्थें, तडाग, सरोवरें इत्यादिकांचीं उदकें; अश्वस्थान, गजस्थान, वल्मीक इत्यादिकांच्या मृत्तिका, तशाच औदुंबर समिधा. हें ठोक ठोक सांगितलें. खेरीज पंचगव्य वगैरेची कच्ची याद आयत्या वेळेस देण्यांत येईल. दुसरें शिष्ट ब्राह्मण, अष्टप्रधान, सरदार, शिपाई, मानकरी, अतीत, अभ्यागत इत्यादिकांच्या सत्काराकरितां वस्त्रें, अलंकार वगैरे सर्व तुह्मांस माहीत आहेच.

**प्रधा०**–(हात जोडून) आज्ञा. गुरुमहाराज, आतां हा

सारा वृत्तांत, महाराजांचे उभयतां श्वशुर, मांडलिक राजे, आणि सर्व कामगार, वगैरे लोकांस कळविला पाहिजे.

वसि०— हो हो अवश्य. आणि आमच्या नांवें लिहून थोडीशी अभिषेकसमारंभाचीही कांहीं अवकाशानें सूचना. तिथिनिश्चय मागाहून कळेलच. (सर्वांकडे पाहून) चला आतां.

सर्व—( वसिष्ठाबरोबर निघून जातात ).

## अंक ३ रा.

### पात्रें २९.

१ विदूषक............ एक हास्यकारी.
२ विदग्ध.............. प्रधान.
३ समरसिंह........... सेनापति.
४ दिवाकरभट्ट........ एक भिक्षुक.
५ भास्करभट्ट ........ दुसरा ,,
६ बृहस्पतिभट्ट........ त्याचा पुत्र.
७ वसिष्ठ.............. उपाध्याय.
८ समयज्ञ............. त्याचा थोरला शिष्य.
९ सुमति.............. ,, धाकटा ,,
१० मनोरमा............ राजाची थोरली स्त्री.
११ सुदर्शन............ तिचा पुत्र
१२ लीलावती... ...... राजाची धाकटी स्त्री.
१३ शत्रुजित्........... तिचा पुत्र.
१४ युधाजित् ........... ,, पिता.

१५ **शुक्रपाद**.................. त्याचा उपाध्याय.
१६ **चित्रतंत्र**.................. ,, मंत्री
१७ **व्याघ्रसेन**.................. ,, सेनापति
१८ **वीरसेन**.................. मनोरमेचा पिता.
१९ **स्थिरप्रज्ञ**.................. त्याचा उपाध्याय.
२० **गूढमंत्र**.................. ,, मंत्री.
२१ **गजांतक**.................. ,, सेनापति.
२२ **जरती**.................. मनोरमेची दासी.
२३ **दुर्दर्श**.................. भिल्लनायक.
२४ **भयानक**.................. त्याचा एक हस्तक.
२५ **घोरमुख**.................. ,, दुसरा ,,
२६ **भारद्वाज**.................. प्रसिद्ध मुनि.
२७ **माधव**.................. त्याचा थोरला शिष्य.
२८ **कमलाकर**.................. ,, धाकटा ,,
२९ **दूत**.................. युधाजिताचा बातमीदार.

---

## स्थळ तेंच अयोध्येंतील राजमंदिर.

( तदनंतर विदूषक प्रवेश करितो ).

**विदूषक**—( घाईनें चहूंकडेस पाहून आपणाशीं ) झालें, आपल्या येण्यास तर ठिकाण नाहीं! आणि दुसऱ्यास मात्र सडकून ताकीद, "सहा वाजतां हजर व्हा;" आणि आतां साडेसात वाजण्याचा सुमार झाला; तरी आपण येताहेतच! कठीण बाबा या राजकीय लोकांची ताबेदारी! प्रभुत्व ह्मटलें ह्मणजे कांहीं बोलण्याचा उपाय नाहीं; एवढें खरें! परंतु काय सांगावें, मीं इतक्यांत स्नान करून घेतलें नसतें? तरी बरीच

बुद्धि झाली, धोंडभट्टी करून आलों; नाहीं तर, " आजून स्नान केलें नाहींस ? " ह्मणून वर्तें दर्काटणें ! ( किंचित् घाईनें ) धोंडभट्टी ह्मणजे बाबा एक मोठी चीज आहे. जशी, " धनाश्री आणि पुराणिकांची मातुश्री " तशी, " दांभिकाची चट्टीपट्टी आणि तिची आई धोंडभट्टी " तशांतही अह्मांसारख्या नाजूक संभावितांस इजपासून फारच उपयोग. आमची स्नानसंध्या बहुतकरून तिणेंच सांभाळिली आहे !

( इतक्यांत प्रधान लगबगीनें प्रवेश करितो ).

**प्रधान**—( विदूषकाकडे पाहतांच ) अरे, तूं आला आहेस काय ? बरें बरें झालें ! कालच्या स्वस्तिवाचनानें मागच्या साऱ्या अशुभाची निवृत्ति झालीच. असो, आतां गुरुमहाराज प्रातःकृत्य आटोपून प्रहर वाजतां आश्रमांतून येतील; त्या पूर्वीं साऱ्या सरदारमानकरी वगैरेंस सूचना झाल्याप्रमाणें थाट कचेरी भरण्याविषयीं त्वरा केली पाहिजे.

**विदू०**—खरें आहे. आणि हा राज्याभिषेक होईपर्यंत आपणांस अतिश्रम आहेतच; पण महाराज, हें सारें यजमानांच्या पुण्यानें निभावतें ! यांत कांहीं संशय नाहीं. अहो, रोज दररोज कोण मेहनत आणि काय जाग्रणें ! मला वाटतें, आपणां लक्षावधि लोकांची झोंप जमा करून, महाराजांनीं आपली निद्रा दीर्घ करून घेतली.

**प्रधान**—( किंचित् हांसून ) शाबास !

( इतक्यांत समरसिंह सेनापति प्रवेश, तसाच प्रधानाला सलाम करितो, नंतर प्रधान, त्यास राजासनाच्या पुढें डाव्याकडेस बसायास सांगतो तोंच दिवाकरभट्ट आणि बृहस्पतिभट्टपुत्रासह भास्करभट्ट, यांणीं प्रवेश

केला असतां त्यांस तसेंच विदूषकास सेनापतीच्या तर्फेस बसवून आपण उजव्याकडे बसतो ).

**दिवाकरभट्ट**—( कांहीं वेळ एका हातावर अगदीं उताणा होऊन अंगवस्त्राच्या पदरानें वारा घेत घेत ) हरि हरि हरि! काय हो भास्करभट्टजी, आज पुनर्जन्म झालें बाबा. शिव शिव शिव !

**विदूषक**—काय हो, भट्टजी महाराज, आपणां सर्वांचीं नांवें काय? आणि आपणांस पुनर्जन्म ह्मणण्यासारखें कोणतें संकट आलें होतें?

**दिवाकर०**—( सर्वांचीं नांवें सांगून ) आतां संकट कोणतें ह्मणून विचारितां, परंतु सांगून कांहीं उपयोग नाहीं; त्याचें यथार्थ ज्ञान होण्यास तें अनुभविलेंच पाहिजे. तथापि ऐका; सांगतों. अहो, "एथें राज्याभिषेकसमारंभ आहे" असें, काल अगदीं सायंकाळीं आह्मांस समजलें; तेव्हां मज्जल गांठावी ह्मणून पहाटेच्या प्रहररात्रीं निघालों; तों बाबा काळोख ह्मणजे कोण! त्यांत डोळे उघडले तरी काय, आणि झांकले तरी काय, सारखेच! ह्मणजे पहा. एखादा कंदील मिळवावा, परंतु उशीर होईल या भीतीनें तसेच झडतपडत निघालों, त्याणें मनस्वीच हाल झाले. वाटेनें ठेंचा काय! ठोकरा काय! पडापड काय! एकमेकांस धक्के काय! ढकलाढकली काय! आयुर्मर्यादेनें बचावलों; इतकेंच. असो पण आह्मी वसिष्ठमहाराजांस भेटूं ह्मणतों.

**विदू०**— आजून ते आश्रमांतून आले नाहींत.

**भास्करभट्ट**— बरें तर आह्मी त्यांच्या आश्रमांतच जातों. ( तिघे निघून जातात ).

**विदू०**— ( प्रधानाकडे ) कशी मौज आहे! एकाचें नांव भास्करभट्ट, तसेंच दुसऱ्याचें दिवाकरभट्ट! आणि आंधेरांत कुचंबून " आमचे पुनर्जन्म झाले " ह्मणतात! वा३:! प्रधानजी, हें कसें झालें ह्मणाल तर, प्राय: सर्व लोकांस " आपण मोठ्या किंमतीचें असावें " असें वाटतें, परंतु तसें होणें विरळाच! ह्मणून गुजर वगैरे कांहीं जातीच्या लोकांनीं अशी युक्ति काढिली आहे कीं, माणिकचंद, लालचंद, हिराचंद, कस्तुरचंद, मोतीराम, गुलाबचंद, पीतांबरदास, अशीं आपलीं नांवें ठेऊन घ्यावीं; ह्मणजे झाले मोठ्या किंमतीचे!

**प्रधान**— ( गुर्कावून ) अरे वनचरा, तुला थट्टा कोणाची करावी आणि कोणाची न करावी, याविषयीं तारतम्य अगदीं नाहीं. कोण तुझा हा झोंडपणा?

( इतक्यांत तिघे भट्ट आणि दोघे शिष्य, यांसह वसिष्ठ प्रवेश करून, नंतर डाव्या तर्फेस तिघां भट्टांस बसवून, आपल्या उजव्याकडे समयज्ञास आणि डाव्याकडे सुमतीस घेऊन राजासनापुढें उजव्या तर्फेस बसतो ).

**सर्व**— ( उठून तसेंच वसिष्ठास वंदून आपापल्या जागीं बसतात ).

**वसिष्ठ**— ( अनुक्रमानें मंत्रीप्रमुखांकडे पाहून ) सभासदहो, ईश्वरेच्छेनें या वेळेपर्यंत झालें तें झालेंच. आतां पुढचा विचार. दोघी राजभार्या यांस एक एक पुत्र, ( इतकें बोलतो तोंच )—

**समयज्ञ**—गुरुमहाराज, ही राज्याची व्यवस्था! तेव्हां, " राजास दुसरें आणि शेळीस तिसरें " या अन्वयें कोणाची शंका राहिल्यास ती पुढें अनर्थहेतु होईल.

वास्तव राजभार्या तसेच त्यांचे पुत्र यांचा खरा अभिप्राय, हे मंत्रिवर्ग, सेनापति, सरदार, मानकरी आणि राजधानींतिल प्रख्यात संभावित, यांच्या समक्ष समजला पाहिजे, याकरितां त्यांस कचेरींत आणवावें असें मला वाटतें.

**वसिष्ठ**–शास्त्रास समयज्ञा!

**प्रधान**–( विदूषकाकडे ) वनचरा, महालांत जाऊन त्या सर्वांस घेऊन ये.

**विदू०**–आज्ञा. ( आंत जाऊन किंचित् अवकाशानें त्यांसह प्रवेश करितो ).

**मनोरमा, लीलावती, सुदर्शन** आणि **शत्रुजित्**–( वसिष्ठास वंदन करून पूर्ववत् बसतात ).

**विदू०**–( आपल्या जागीं बसतो ).

**वसिष्ठ**–( अनुक्रमें सर्वांकडेस पाहून ) ऐका आतां, मनोरमा ही महिषी ह्मणजे जिला अभिषेक झाला आहे, अशी ध्रुवसंधिराजाची थोरली भार्या इचा पुत्र सुदर्शन हा, भोगिनी ह्मणजे जिला अभिषेक झाला नाहीं अशी त्याची धाकटी स्त्री लीलावती इचा पुत्र शत्रुजित्, यापेक्षां एका महिन्यानें कमी वयाचा आहे; हें तुह्मां सर्वांस विदितच आहे, आणि तुह्मी यथाधिकार धर्मशास्त्रांत तसेच व्यवहारशास्त्रांत निपुण आहां, तर या दोघांतून राज्याधिकारी कोण; याविषयीं आह्मीं विचार केलाच आहे, परंतु शास्त्री, प्रधान, सेनापति इत्यादिक तुह्मी अनेक प्रसंग, पुष्कळ राज्यांच्या घालमेली, नानाप्रकारच्या भाऊबंधक्या, दत्तकांच्या उलाघाली, एतत्संबंधि वादांचे निर्णय करणारे व्यवहारकुशल आहां, तर सर्व लहान थोर आपापला अभिप्राय स्पष्ट सांगा.

**भास्करभट्ट**— गुरुमहाराज, महिषी[1] आणि भोगिनी[2] यांतच या विचाराचा प्राय: उलगडा आहे.

**दिवाकरभट्ट**—खरें तें. महिषीच्या प्राथम्या अन्वयें राज्याधिकाराविषयीं तिच्या पुत्राचा निकट संबंध असल्यामुळें एथें वयोधिकता अप्रयोजक आहे.

**बृहस्पति**—( त्वरेनें ) गुरुमहाराज, याविषयीं राष्ट्रांतील सहस्रावधि इनामदार, पाटील कुळकर्णी वगैरे हीं, आबालवृद्धप्रसिद्ध उदाहरणें आहेत. एका संपादकाला पांच पुत्र आणि ज्येष्ठपुत्रोद्भव[3] एक पौत्र[4] असून तो संपादक आणि त्याचा ज्येष्ठ पुत्र नष्ट झाला तर, तें उत्पन्न त्या पौत्राच्या स्वामित्वाखालीं चालतें. त्याचे चवघे चुलते संपादकाचे औरस तसेच वयानेंही अधिक, तथापि त्यांस मुख्य मालकीचा अधिकार मिळत नाहीं, यावरून सुदर्शनच राज्याधिकारी हें अगदीं उघड आहे.

**वसिष्ठ**—(मान डोलवून) शाबास मुला ! (अनुक्रमानें सर्वांकडेस पाहून ) आह्मीं असाच सिद्धांत केला आहे, आणि तोच पक्षपातानभिज्ञ[5] अशा या ब्रह्मचाऱ्याच्या मुखानें सर्वांनीं ऐकिला; हेंही दिव्य झाल्यासारखेंच झालें.

**सर्व**—( अनुक्रमानें ) आमचाही अभिप्राय असाच आहे, परंतु आतां कांहीं बोलायासच नको.

(पडद्यापलीकडे) उज्जयिनीदेशसिंधुसुधाकर[6] युधाजिद्राज महारा३ज आस्ते कदम् मुलाजा३ (असा शब्द होतो).

---

१ राजाबरोबर अभिषेक झाल्याकारणानें कुलधर्मादिकाविषयीं अधिकारवती. २ उपभोगार्थ केलेली. ३ थोरल्या पुत्रापासून झालेला. ४ नातू. ५ पक्षपातास न समजणारा. ६ उज्जनी देश (हाच) सिंधु ( समुद्र याचा ) सुधाकर ( चंद्र ) तात्पर्य, पोषण करणारा.

**वसिष्ठ**—बरें बरें झालें, युधाजिद्राजा समयास आला.

**भिक्षुकांखेरीज सर्व**—( खडी ताजीम घेतात ).

( इतक्यांत पुरोहित मंत्री सेनापति यांसह युधाजित् प्रवेश करितो ).

**विदूषक**—( पडद्यापर्यंत सामोरा जाऊन त्यास आणितो, आणि त्या सर्वांनीं वसिष्ठ वगैरेंस वंदन केल्यानंतर राजासनासमोर डाव्या तर्फेस, भास्करभट्ट याच्या समीप शुक्लपाद पुरोहितास, त्याच्या डाव्याकडे चित्रतंत्र मंत्री यास, व त्याच्या जवळ युधाजितास आणि त्याच्या डाव्याकडे व्याघ्रसेन सेनापतीस बसवून आपण आपल्या जागीं बसतो ).

**वसिष्ठ**— युधाजिद्राजा, तुझा जामाता ध्रुवसंधिराजा यास अकाळीं[1] अशी दशा प्राप्त झाली; अस्तु, होणारास उपाय नाहींच, परंतु बाकीचें सर्व नीट आहे कीं?

**युधाजित्**—( लीलावतीकडे पाहतो आणि डोळ्यांस पदर लावून फुंदतो ).

**चित्रतंत्र मंत्री**— ( हात जोडून ) वसिष्ठ महाराज, देवब्राह्मणांच्या कृपेनें बाकीचें क्षेम आहे.

( पडद्यापलीकडे ) कलिंगविषयसारसाहस्कर[2] वीरसेनराज महाराऽज, आस्तें कदम् मुलाजाऽ (असा शब्द होतो).

**वसिष्ठ**—अहो, वीरसेन राजाही आला!

**भिक्षुकांखेरीज सर्व**—( खडी ताजीम घेतात ).

( इतक्यांत पुरोहित मंत्री सेनापति यांसह वीरसेन राजा प्रवेश करितो ).

---

१ तारुण्याच्या भरांत. २ कलिंग देश ( हेंच ) सारस ( कमळ, ग्राज्य ) अहस्कर ( सूर्य ) तात्पर्य, प्रफुल्लित करणारा.

**विदल्ल**—( पडद्यापर्यंत जाऊन त्यास आणून त्यां सर्वांनीं वसिष्ठादिकांस वंदन केल्यानंतर राजासनाच्या समोर उजव्या तर्फेस समयज्ञाच्या उजव्याकडे स्थिरप्रज्ञ-पुरोहितास, त्याच्या जवळ गूढमंत्रमंत्री यास व त्याच्या समीप वीरसेन राजास, आणि त्याच्या उजव्याकडे गजां-तक सेनापतीस बसवून आपण आपल्या जागीं बसतो ).

**वसिष्ठ**—( वीरसेनाकडे ) हे वीरसेनराजा, तुझा जा-माता ध्रुवसंधिराजा यास या वयामध्यें अशी अवस्था प्राप्त झाली, हें फारच वाईट झालें! परंतु खेरीज कुशल आहे कीं?

**वीरसेन**—( मनोरमेकडे पहात पहात डोळ्यांस पदर लावून मुसमुसतो ).

**गूढमंत्रमंत्री**—( हात जोडून ) वसिष्ठमहाराज, आपल्या आशीर्वादेंकरून सर्व सुरक्षित आहे.

**वसिष्ठ**—ऐका आतां. ध्रुवसंधिराजाची थोरली स्त्री मनोरमा इचा पुत्र सुदर्शन, हाच शास्त्र आणि लौकिक अशा दोहोंही आधारांनीं राज्याधिकारी, असा सर्व-संमत विचार झाला आहे; आणि राज्याभिषेकसामग्री-चीही सिद्धता आहे, तसेंच ध्रुवसंधिराजाचे हे उभयतां श्वशुर नव्हते तेही समयास आले, एणेंकरून आतां अभिषेकसमारंभ सांग झाला, म्हणजे ही गोष्ट मागील सर्व दुःखाचें परिमार्जन होईल!

**युधाजित्**—( चकित होऊन शुक्रपादपुरोहिता-कडे पहातो ).

**शुक्रपाद**—वसिष्ठमहाराज, ज्येष्ठाचा त्याग करून कनिष्ठास मान देणें, हा केवळ पक्षपात असें आम्हां-स वाटतें!

**स्थिरप्रज्ञ**— अहो शुक्रपादजी, प्रस्तुत विचारांत अभिषिक्त अशा ज्येष्ठ स्त्रीचा पुत्र वयानें कितीही लहान असला तरी तोच राज्याधिकारी, हें समजण्यास कांहीं शास्त्री पंडितच नकोत; केवळ व्यवहारज्ञही याचा निर्णय सांगतील. आणि मुळींच वसिष्ठमहाराजांच्या भाषणावर तुमची तक्रार! केवढें अज्ञान हें?

**चित्रतंत्र**— अहो स्थिरप्रज्ञजी, आपली बुद्धि अत्यंत गंभीर आणि भाषणरीति सद्विचारयुक्त असावी, असें आपल्या नांवावरून वाटत होतें; परंतु आमच्या पुरोहितांस एकाएकीं अज्ञान ह्मणालां ही उतावळी तुमच्या नामार्थास अगदीं विरुद्ध!

**गूढमंत्र**— चित्रतंत्रप्रधानजी, वसिष्ठमहाराजांवर पक्षपातीपणाचा आरोप करणाराची ही निर्भर्त्सना[1] अगदीं थोडी! परंतु आमचे पुरोहित स्थिरप्रज्ञ, ह्मणून त्यांणीं धिमेपणानें केवळ शब्दांनींच तुमच्या अविचारी पुरोहितास सूचना केली, हें आमच्या पुरोहितांचे नामार्थास अनुरूपच[2] आहे!

**युधा०**— अहो चित्रतंत्रप्रधानजी, इतकी घाई कां? हें न्यायाचें काम; सावकाश कां होईना! आणि तुह्मी किती बोललां तरी, तुह्मांस वसिष्ठांप्रमाणें "पक्षपाती" असेंच त्या पक्षाचे लोक ह्मणणार! हें एक, आणि दुसरें; वसिष्ठांनीं बोलून दाखविलें, त्यास या साऱ्या सभेंत कोणीच सभासद विरुद्ध बोलत नाहीं; यावरून एथें फितुर दिसतो!

**वीरसेन**— (क्रोधानें) युधाजिता, कोणी फितुर

---

१ दुःखकारक निंदा. २ योग्यच.

केला रे? तूं आधीं आलास कीं आह्मी? आणि हें वर्तमान समजल्यास अवकाश तरी कितीसा झाला? उगीच बडबड करायास कांहीं लाज वाटत नाहीं?

**सुमति**— ( क्रोधानें ) युधाजिता, ( इतकें बोलतों तोंच )—

**समयज्ञ**— ( सुमतीशीं आपसांत ) अहो सुमतिपंडित, आपण पडलों वृत्तिवान्! आतां प्रतारकां भविष्यवाद्यांप्रमाणें, " दोहों डगरींवर हात " असें बोलावें तर, व्यर्थ कालक्षेप मात्र! यास्तव ह्मणतों; कसेंही होवो, परंतु आपण स्पष्ट बोलण्याचा समय नव्हे!

**युधा०**— व्याघ्रसेनजी, मला वाटतें, आतां कोणतीही वाटावाट न करितां आपल्या इच्छेप्रमाणें बंदोबस्त करावा, हेंच नीट.

**समरसिंह**— ( क्रोधावेशानें ) अहो युधाजिद्राजे, तुह्मी अयोध्येच्या दर्बारांत आहांत कीं कोठें? एखाद्या दुर्बळाचे घरची लूट सांपडली आहे, असें तुह्मांस वाटलें कीं काय? अरे लोभांधेहो[1], सिंह गेला तरी त्याचे घरांत त्याचा परिवार आहे, एव्हांच एथें कोल्ह्यांनीं किंचाळ्या फोडाव्या असें केवळ झालें नाहीं! यास्तव साफ सांगतों, भाषण करणें असेल तर नीट शुद्धीवर येऊन करा! (आपल्या छातीस हात लावून) समरसिंहाशीं गांठ आहे!

**वसिष्ठ**— ( विदल्लप्रधान आणि समरसिंहसेनापति यांस हातानें खूण करून आपल्या समीप बलावितो ).

**विदल्ल** आणि **समरसिंह**— ( उठून तोंडास पदर लावीत लावीत जाऊन वसिष्ठापुढें बसतात ).

---

१ राज्यलोभानें युक्तायुक्त विचार करण्यास असमर्थ.

**वसिष्ठ**— ( त्यांशीं अपसांत ) वेळ कठीण दिसते ! आतां तुह्मी त्या दुष्टा युधाजिताला शासन कराल; परंतु तोही प्रबळच आहे; यास्तव वाटतें, युद्धप्रसंगानें सैन्याचा, द्रव्याचा आणि लूट वगैरे झाल्यास प्रजेचाही फुकट नाश होईल, इतकेंच केवळ नाहीं; तर तुह्मी परस्पर कढून हलके झालां ह्मणजे तिसराच कोणी पाय घालील कीं काय? अशीही शंका येते! यास्तव सरासरीस कांहीं बाहेर न जावें, इतक्यापुर्तीच तुह्मी दृष्टि ठेवा. यजमानांच्या[1] विरहामुळें[2] तुमचें ऐश्वर्य प्रस्तुत दिपल्यासारखें आहे! ह्मणून ह्मणतों, विषाची परीक्षा तें चाखून करूं नका. आणि मी आतां एथून निघून जातों.

**विदल्ल** आणि **समरसिंह**— आज्ञा. ( उठून जाऊन आपआपल्या ठिकाणीं बसतात ).

**वसिष्ठ**— युधाजिद्राजा, आह्मां भट्टांचें काम आपल्या मतीप्रमाणें शास्त्रार्थाची गोष्ट सांगावी इतकेंच; बाकीची व्यवस्था करणें हें तुह्मां राज्यकर्त्यांचें कर्तव्य आहे. आतां जे तुह्मी अमर्याद होऊन अन्याय करण्यास इच्छितां आहां, त्या तुह्मांला ताळ्यावर आणणें आह्मांस अशक्य नाहीं! परंतु युधाजिता, आह्मी ती रीति प्राय: धरीत नाहीं. तूंच पहा. बरें, आमची तशी वर्तणूक असती तर गाधिनंदनराजा[3] आमच्या कामधेनूला कां इतका त्रास देता? असो, आतां आन्हिककर्मास[4] उशीर होईल, यास्तव मला आपल्या आश्रमीं गेलें पाहिजे. ( उठतो ).

---

१ ध्रुवसंधिराजाच्या. २ वियोगामुळें. ३ विश्वामित्र. ४ स्नानसंध्यादि नित्यक्रमास.

**सर्व**– ( खडी ताजीम घेऊन त्यास वंदितात ).

**वसि०**– कल्याणमस्तु. ( निघून जातो ).

**सर्व**– ( पूर्ववत् बसतात ).

**युधा०**– ( समयज्ञ आणि सुमति यांजकडे ) कां हो वसिष्ठशिष्य, आतां पुढें कसा काय विचार ?

**समयज्ञ**– गुरुमहाराजांनीं सांगितलेंच कीं, व्यवस्था करणें हें तुमचें कर्तव्य.

**युधा०**– तर आमच्या विचारास येईल तसें करावें ना ? हाच सिद्धांत कायम ?

**स्थिरप्रज्ञ**– ( युधाजिताकडे ) हो हो, तुह्मां खलांचा सिद्धांत खास यमाचें काम चालू करणार ! मग, "हाच का यम" असें विचारावें कशास ?

**युधा०**– अहो, हीं क्लिष्ट भाषणें आतां राहूं द्या. एवढा पडदा कशाला ? ( वीरसेनाकडे ) वीरसेना, आम्ही शत्रुजिताला राज्याभिषेक करणार.

**वीरसेन**– ( आवेशानें ) होय ! आपल्या पड्यांतली भाजीच लागली असेल, यथेच्छ खुडायाला ! अरे, हा वीरसेन जिवंत असतां ?

**युधा०**– ( क्रोधानें ) वीरसेना, तूं जिवंत असतांच करावा असें माझ्या मनांत आहे; परंतु तुझी मर्जी नसेल तर तुला लोकांतरास हांकलून देऊन सुद्धां करण्यास हा युधाजित् समर्थ आहे ! समजलास ?

**लीला०**– ( भिऊन युधाजिताकडे ) हे जनका, राज्यसुख कोणास नको ! परंतु तें अन्यायानें आणि विशेषत: वसिष्ठमहाराजांच्या आज्ञेचें उल्लंघन होऊन प्राप्त झालेलें अनर्थमूळ होईल !

**युधा०**—( नाक मोडून ) अं३: अगे लीलावति, मुळीं स्त्रीजातिच अविचारी, त्यांतूनही तू पोरस्वभाव! तर मी साफ सांगतों, तू शत्रुजितास घेऊन आपल्या महालांत जा. (तिला हातास धरून उठवितो, नंतर आपल्या जागीं बसतो)

**शत्रुजित्**—( सुदर्शनाकडे पाहून मोठ्यानें आक्रोश करीत उभा रहातो ).

**सुदर्शन**—( शत्रुजिताकडे पाहून मुसमुसत उठतो, आणि मनोरमेपुढें बसतो ).

**लीला०**—( युधाजितानें डोळे वटारून पाहिल्यामुळें त्याच्या भालदारास पुढें करून शत्रुजितासह निघून जाते).

**वीरसेन**—युधाजिता, तू यथेच्छ अन्याय करण्यास प्रवृत्त होतो आहेस; यावरून वाटतें, ईश्वरानें कृपा करून दिलेल्या राज्यलक्ष्मीस कंटाळलास!

**युधा०**—वीरसेना, तू यथेच्छ ह्मणतोस; यांत तुला आश्चर्य तें कोणतें वाटलें? अरे, जे करारी शूर असतात ते दुसऱ्याच्या हातानें पाणीं पीत नाहींत! आणि याचा अनुभव आतांच तुला दाखवितों पहा!

**वीरसेन**—अरे युधाजिता, मी तुजसारखा पोकळ बडबड करणारा नव्हे! तुझे भुज फार वळवळत असतील तर युद्धास सिद्ध हो, एका मुहूर्तात तुला कृतांत-सदनास[1] पाठवितों पहा!

**युधा०**—अरे वीरसेना, तू कांहीं तरी गुण उधळ-शीलच, हें मी उज्जयिनींतून निघतांनाच मनांत आणून युद्धाच्या तयारीनें आलों आहें! याविषयीं तुला संशय असेल तर ही पहा तलवार (तलवार उपसून दाखवितो).

---

१ यमाच्या घरीं.

**वीरसेन**– (क्रोधातिशयानें दांत खाऊन पाय आपटीत) अरे युधाजिता, तू या सभेंत मला तलवार केवळ दाखविलीसच, परंतु मी तुझा तलवारीसुद्धां भुजच भूमीवर पडलेला तमाम लोकांस दाखवितों पहा! पण एथें स्थळसंकोच आहे याकरितां असा मैदानांत ये! ( आवेशानें आपल्या मंडळीसुद्धां निघून जातो, तसाच त्याच्या मागून युधाजितुही जातो ).

**मनो०**– विदल्लप्रधानजी, आह्मांला प्रस्तुत फारच कष्ट देणारी दशा आली आहे! पहा, पतीनें मृगयेस जाऊन जसें साहस केलें, तसेंच आतां पित्यानेंही! असो, परमेश्वराची मर्जी! ( धुसकारा टांकिते ).

**विदल्ल**– ( हात जोडून ) बाईसाहेब, अशा मत्सरोत्पन्न वादांत तिसऱ्याला बोलण्यासही मोठी अडचण! यास्तव आमचा कांहीं उपाय चालेना! असो, या धांदलींत आपल्या तर्फेचा बंदोबस्त राहिला पाहिजे, याजकरितां सेनापति आणि मी जाऊन त्याची तजवीज ठेवितों. ( समरसिंहासह निघून जातो ).

**मनो०**– अरे वनचरा, वीरसेन महाराज विजयी झाले, तर सारें नीटच; परंतु न जाणों; विपरीत झालें ह्मणजे आह्मांस कांहीं वर्तमान सुद्धां न कळतां आह्मी ढेंकणासारखे फुकट चेंगरले जाऊं! याकरितां तू आह्मांस कच्ची खबर पोहोंचविण्याविषयीं तत्पर आस.

**विदूषक**– आज्ञा. परंतु काय सांगावें महाराज, क्रोधानें अडकल्या अडकल्यासारखें सर्वदा कडक बोलणारा आणि प्रत्यक्ष जावाई नष्ट झाला असतां, भडक पोषाक करून; तसाच मद्यपानानें सडक होऊन राज-

सभेमध्यें फडकणारा, असा केवळ खडक तो युधाजित्; त्याला अन्याय वगैरे नड कशाची! पण असल्याशीं धडक घेण्याकरितां वीरसेनमहाराजही तडक युद्धांगणीं जाऊन थडकले, हें मोठें साहसच झालें आहे! कसें निभावेल कांहीं सांगवत नाहीं. असो, आतां रणांगणीं काय काय होईल तें मी चटकर येऊन आपणांस कळवीन. बातमीविषयीं आपण बिलकूल काळजी करूं नये. ( निघून जातो ).

**समयज्ञ**— मनोरमाबाई, समय मोठा विषम आला! दोघांनींही चिरडीस जाऊन अगदीं अखेरीस आणिलें, हें चांगलें झालें नाहीं!

( कांहीं वेळानें पडद्यांत ) हँ, ह्मणा आतां, "श्रीमन्महागणाधिपतयेनम:"

**सर्व**— ( चकित होतात ).

**समयज्ञ**— ( हळूंच अपसांत ) अहो सुमतिपंडित, अभिषेकानुष्ठानास आरंभ होतो आहे; असें वाटतें, तर तुह्मी आतां तिकडेस असा!

**सुमति** आणि **तिघे भिक्षुक**— ( निघून जातात ).

( इतक्यांत विदूषक मान खालीं घालीत घाईनें येऊन आंतल्या आंत सगद्गद फुंदतो ).

**मनो०**— शिव शिव शिव! अरे परमेश्वरा३! ( मूर्च्छित होऊन पडते ).

**सुदर्शन**— ( घाबरून ) अरे देवा रे ३! ( तोंडावर हात ठेवून खालीं पडतो ).

(इतक्यांत पडद्यांतून एक ह्यातारी दासी येऊन मनोरमेस उठवून पोटाशी धरिते, आणि सुदर्शनास तिजपुढें बसविते)

**जरती**— बाईसाहेब, आतां मात्र दुर्दैवानें शेवटास लाविलें!

**समयज्ञ**— मनोरमाबाई, सावध व्हा. एवढा वेळ भय होतें. आतां कशाचें? अशा येऊन ठेपलेल्या संकटांत मन दगडासारखें घट्ट करून या दुष्टप्रसंगाला मागें सारण्याचा विचार आपला आपणच केला पाहिजे! त्यांतही तुह्मीं सुक्षत्रियांनीं तर विशेषतः गंभीरपणा धरावा, हेंच तुमचें भूषण!

**मनो०**— हर हर हर! खरें आहे महाराज. ( विदूषकाकडे ) वनचरा, कसें झालें तें समजतेंच आहे, तथापि सांग. आतां काय!

**विदू०**—महाराज, काय सांगावें! युधाजितास वीरसेनमहाराजांनीं आरंभापासून असें हस्तलाघव दाखविलें कीं, तेणेंकरून त्याचे वीर उधळून गेले! नंतर वीरसेनमहाराज "आतां क्षणामध्यें युधाजितास पकडूं" असा अजमास करून किंचित् असावध आहेत, असें लक्षांत आणून युधाजितानें महाराजांचे ह्रदयांत एक तीव्र बाण मारिला तेणेंकरून महाराज मूर्च्छित झाले असतांही त्या दुष्टानें वेगेंकरून बाणांची वृष्टि केली! त्या वेळेस त्याच्याच वीरांनीं, "अन्याय अन्याय" असा कोलाहल केला, आणि आपल्या सैन्यांत हाहाकार उडाला; इतकेंच केवळ नाहीं तत्क्षणीं सैन्य उधळलेंही! असें पाहून युधाजितानें राज्याभिषेकाच्या अनुष्ठानास आरंभ करावा ह्मणून वाड्यांत सूचना पाठविली, इतकें होतांच ही खबर आपणांस द्यावी यास्तव मी लगबगीनें निघून आलों! आतां तो अन्यायसिंधु युधाजितूही कचेरींत आला असेल!

**मनो०**—( तळमळून ) हर हर! देवा, कसें रे संकट सोसावें हें? सर्वगुणसंपन्न, सार्वभौम असा पति नष्ट झाला असतां कांहींसा पित्याचा आधार वाटत होता तोही नाहींसा होऊन, माझें सासर आणि माहेर एकदांच बुडालें! हाय हाय! त्यांतही पुच्छावर पाय देऊन चिडविलेला कृष्णसर्पच, असा अतिदुष्ट तो युधाजित् आतां काळासारखा मजपुढें येऊन उभा राहील! हे जगदीश्वरा, अशा संकटांत निराश्रय दीन मी आपलें आणि या बालकाचें संरक्षण कसें रे करूं? अशा समयीं तुजवांचून दुसरा कोण मला आधार देईल? शिव शिव शिव, हे परमेश्वरा! ( मूर्च्छित होऊन निश्चेष्ट पडते ).

( इतक्यांत विदल्ल प्रवेश करितो ).

**विदल्ल**—( समयज्ञाच्या समोर बसून दीन दृष्टीनें चहूंकडेस पाहतो ).

**समयज्ञ**—प्रधानजी, मनोरमाबाईंवर कठीण वेळ गुजरली! पहा त्या शेवटल्या अवस्थेची छाया पडल्याप्रमाणें स्थिरमूर्च्छेंत लीनांतःकरण होऊन पडल्या आहेत! तर आतां तुह्मी त्यांस पित्याच्या स्थानीं होऊन आश्वासन द्या आणि त्यांचा शोक दूर करा.

**विदल्ल**—( दिल्गिरीनें ) समयज्ञमहाराज, ज्यास अतिदारुण शोकाचा प्रसंग येतो, त्यालाच विवेकबलानें दुःख गिळण्याचा कांहीं अभ्यास असल्यास उपयोग. नाहीं तर त्याचें दुसऱ्यानें सांत्वन करून दुःख नाहींसें होणें परम दुर्घटच! पहा बरें,—

## साकी.

शोकटाकहेंकठिणअणिककर निंदाअपणकरावा ॥
तरिअधिकचिनिष्ठुरतामौनें कैसाशोकहरावा ॥१५॥

( नंतर मनोरमेस सावध करून ) समयज्ञमहाराज, काय हो वीरसेन महाराजांचा हीया हा !

**समयज्ञ**— अहो प्रधानजी, दूरदर्शी क्षत्रिय असतात ते युद्धप्रसंग हा मोठा उत्साह समजतात ! त्यांत जय मिळणें हा आनंदहेतु स्पष्टच आहे, आणि कदाचित् युद्धांगणीं देहपात झाला तथापि त्यांस संतोषच ! कारण कीं,—

## मंदाक्रांता.

विद्यातीर्थींजगींविबुधतेसाधुतेसत्यतीर्थीं
गंगातीर्थींमलिनमतितेयोगितेज्ञानतीर्थीं ॥
धारातीर्थींक्षितिपातितसेद्रव्यवान्दानतीर्थीं
लज्जातीर्थींकुलयुवतिहींपातकक्षालिताती ॥१६॥

असें आहे; यास्तव,—

## अनुष्टुप्.

संपत्तारुण्यवद्वर्ष सरित्तुल्येतिभूमिपाः ॥
शुद्धायुद्धानलेप्राणाञ्जुहृत्याक्रमितुंदिवं ॥१७॥

**विदग्ध**— खरें आहे. (मनोरमेकडे) बाईसाहेब, आतां मलाही अशा अन्यायी लोकांत राहण्याची इच्छा नाहीं, तर ते दुष्ट अभिषेकसमारंभाच्या गडबडींत आहेत तोंच,

---

१ तारुण्याप्रमाणेंच (ऐहिक) संपत्तिही, पाऊसकाळांतील नदीसारखी (थोडा काळ भरांत राहणारी) यास्तव विचारवान् राजे, स्वर्ग प्राप्त करून घेण्याकरितां युद्धाग्नींत (आपले) प्राण होमितात !

आपण लीलावतीबाईंकडून कांहीं तरी तजवीज करून घेऊन झटकर एथून निघावें, आणि माझा मातुल काशीक्षेत्रीं राज्य करीत आहे तेथें जाऊन प्रस्तुत त्याच्या पाठीस पडावें असें मी मनांत आणिलें आहे.

**मनो०**— ठीक. कसेंही करून आह्मांला या काळाच्या जाबड्यांतून बाहेर काढा!

( इतक्यांत "आस्तें ३ कदम मुलाजा ३" असें पुकारणाऱ्या भालदारासह मोठा पोषाक करून लीलावती येते आणि मनोरमेच्या शेजारीं डौलानें बसते).

**मनो०**— ( गरीबीनें ) हे लीलावति, आतां तुमच्या हुकमावांचून मला कांहीं एक मिळणार नाहीं यास्तव ह्मणतें; एक रथ द्याल तर मी आणि हा मुलगा, रणांगणीं पडलेल्या तशा तरी पित्याला पाहूं, पहा हुकूम द्याल तर ही वेळ पुन्हा येणार नाहीं!

**लीलावती**— ( ऐश्वर्यास भुलल्यामुळें हर्षानें ) उत्तम आहे. ( प्रधानाकडे ) प्रधानजी, मनोरमाबाई ह्मणतात त्याप्रमाणें तुह्मी स्वतः जाऊन तजवीज करा. तुह्मी नाकेबंदींतून पार व्हाल तों पर्यंत तुह्मांबरोबर हुजऱ्या देतें.

**विदुल**— (हात जोडून) आज्ञा. (मनांत) मला हुकूम व्हावा हीच मी आशा करीत होतों.

**लीला०**— (भालदारास पुढें करून निघून जाते ).

**विदू०**— कां महाराज मनोरमाबाई, "लीलावती केवळ अल्लाची गाय" असें आजपर्यंत ह्मणत आलांना? परंतु आतां पुरतें समजलें? दिवसभर "माझी चिमणी माझी चिमणी," आणि आतां कशी तीच घार ह्या सान्या वाड्यांत भराऱ्या मारिते आहे पहा!

मनो०—प्रधानजी, हा वनचर खरें बोलला! लीलावतीची चर्या लागलीच कितीं बदलली हो?

विदल्ल—महाराज, यांत कांहीं आश्चर्य नाहीं, हा सृष्टिक्रम असाच आहे! राज्यलोभ मोठा दुस्त्यज! त्यांत तुह्मी तर सवतीसवतीच, परंतु काय सांगावें!

केकावळी.

अहेयजगिंराज्यलोभजरिवेळत्यागावली,
तरीनिजशिशूसहीधरुनिकांपित्येमावली ॥
कलीमधिंशिरूनकामजसवेंचलाकाशिला,
नरंगदुसरानिघेजरिहिकोळसाघाशिला ॥१८॥

(इतकें बोलून चटकर पडद्याचे आंत जातो).

समयज्ञ—मनोरमाबाई, या समयीं विदल्ल प्रधानजींची मदत ही देवानें मोठी एक जोड दिली!

(इतक्यांत विदल्ल प्रवेश करितो).

विदल्ल—(हात जोडून) महाराज, वाड्यापुढें रथ तयार आहे.

मनोरमा—(सुदर्शनास हातीं धरून लगबगीनें उठतांच देवांच्या चौकाकडे तोंड करून गाहिंवरत) बया कुलदेवते, देवघरांत येऊन तुझ्या पायां पडण्याविषयीं या समयीं दैवयोगानें मी पंगु झाल्यें आहें, हें तू जाणतच आहेस! आतां कधीं तरी तुला (सुदर्शनाची हनवटी धरून) या बच्च्याची दया येऊन, तूं पुन्हा अयोध्या दाखविलीस तर तुझ्या चरणांचें दर्शन! असो,

---

१ टाकण्यास अशक्य, २ माता, ३ ऐश्वर्याचे भंशाविषयीं कर्तव्य जो कलह, त्यांत.

आतां मी तुझ्या पायां पडल्ये. लवकर कृपा कर ! (पा॰ यां पडून खळखळां रडत निघल्ये).

**जरती**– ( हात जोडून घाईनें ) आईसाहेब, मी आपल्याबरोबर येणार !

**मनो**०– ( काकुलतीनें ) अगे जरति, आतां तू आमची आशा कशाला धरित्येस ?

**जरती**– महाराज, मला जितकी आईसाहेबांची आशा आहे, तितकी आपल्या प्राणांचीही नाहीं !

**मनो**०– पहा, तुझी इच्छा ! (विदूषकाकडे) वनचरा, आह्मी वीरसेन महाराजांच्या कलेवराचा तात्कालिक संस्कार करून पुढें चालते होणार, इतक्यांत आह्मां-विषयीं एथें कांहीं गडबड होईल तर तिकडे लक्ष असूं दे!

**विदूषक**– (हात जोडून) आज्ञा. तसें कांहीं दिसून येईल तर, तत्क्षणीं मी आईसाहिबांस खबर देईन.

**मनो**०– (सुदर्शन, प्रधान, जरती, यांसहवर्तमान दीन दृष्टीनें मागें पुढें पहात पहात रथाच्या समीप आलेंसें करून, घाबऱ्या स्वरानें प्रधानाशीं ) प्रधानजी, आतां या रथांत बसायाचेंच ना ! (धुसकारे टांकीत वाड्याकडे पाहिलेंसें करून ) शिव शिव शिव ! आतां या वाडवडिलांच्या वाड्यांत राहण्याचें असो, पण दुरून उगीच तो पाहण्यापुर्ता देखील आमचा संबंध राहिला नाहीं आं ! राम राम राम ! ( सूर्याकडे हात जोडून ) बाबा सूर्यनारायणा, आह्मी वसिष्ठसंमत निरपराधी असूनही, गव्हां-तून खडे वेचून टांकल्यासारखें आह्मां अनाथांला वाड्यां-तून खडून काढिलें; हें वंशाधिपती तुला चांगलें दिसलें ना ! बरें, कोठेही संरक्षण करणारा तूंच आहेस !

**सर्व**—( त्याला नमस्कार केल्यानंतर रथावर बसलेसें करून विदल्लाच्या सारथ्यानें निघून जातात).

( इतक्यांत चित्रतंत्र प्रधानासह युधाजित् प्रवेश करितो).

**युधाजित्**—( पुत्रासह मनोरमा कोठें नाहीं, असें दिसून येतांच खिन्न होऊन प्रधानाकडे ) चित्रतंत्रजी, मसलत चुकली ! आह्मीं अभिषेकसमारंभाकडेच लक्ष ठेविलें हें नीतिशास्त्रविरुद्ध झालें ! पुत्रासह मनोरमेचा आधीं बंदोबस्त करावयाचा. ( धुसकारा टाकून पुन्हा धैर्यानें ) असो, कांहीं चिंता नाहीं. हा युधाजित् त्यांस पाताळांतून सुद्धां काढून आणील ! मग भूमंडळाची कथा काय ? या कामामध्यें अतिनिपुण असे दूत चहूंकडे पाठवा ह्मणजे झालें. आहे काय त्यांत !

**चित्रतंत्र**—( हात जोडून ) आज्ञा. पाठविले, असेंच महाराजांनीं समजावें !

**युधा०**— ठीक आहे. ( समयज्ञाकडे ) कां. समयज्ञमहाराज, आतां तर सुदर्शनास राज्याभिषेक होईल, अशी आशा उरली नाहीं ना ?

**समयज्ञ**— युधाजिता, असें काय बोलतोस ? दोघेही आमचे यजमानच.

**युधा०**—( हांसून ) चलावें तर याज्ञिकाकडे; तो अधिकार तुमचा आहे. ( विदूषकाकडे ) कां रे वनचरा, तुझी कशी इच्छा आहे ?

**विदू०**—( हात जोडून ) महाराज, मी दरमाहे चित्रकूटच्या रामाची वारी करीत असतों; तिकडेस जाण्याच्या वेधांत आहें. नाहीं तर मी आपल्या मंडळींतलाच !

युधा०— बरें आहे. ( समयज्ञ आणि प्रधान यांसह निघून जातो).

विदू०— (आपल्याशीं ) मीं युधाजिताला सांगितली वारी, पण माझी चित्तवृत्ति आहे सुदर्शनाकडे सारी ! ह्मणून आतां त्वरेनें जाऊन त्यांस गांठितों. (कांहीं गेलेंसें करितो, इतक्यांत सुदर्शन, विदल्ल, जरती, यांसहवर्तमान मनोरमा येते).

विदल्ल— महाराज, बरीच देवानें कृपा केली ! कालचा दिवस निभावला, आणि आजही आपली देव-पूजा, भोजन वगैरे पदरांत पडलेंच ! आतां मीं असें मनांत योजिलें आहे, हा काशीचा थोरला रस्ता सोडा-वा आणि भागीरथी उतरून पलीकडच्या चित्रकूट प्रांतांतील आडरस्त्यानें जावें, ह्मणजे भारद्वाजमुनींचें दर्शन होईल ; तसाच त्यांचा, कंदमूलच परंतु सकल-कल्याणांचें मूल, असा प्रसादही मिळेल. यास्तव आज्ञा झाली ह्मणजे रथ जुपतों.

मनो०— लवकर जुपा. अवकाश करण्याची वेळ नव्हेच. ( आसमंतात् पाहून ) पण प्रधानजी, जसें कालरोजीं अनुभविलेलें युधाजिताचें घोर कृत्य, तसें हें अरण्यही मृत्यूच्या जाबड्याप्रमाणें दारुण दिसतें !

( इतक्यांत पडद्याच्या दारामध्यें एक भयंकर पुरुष येऊन मनोरमा वगैरेकडे रोखून पाहतो ).

मनो०— ( दुरून त्याजकडे पाहतांच घाबऱ्यानें ) अरे देवा ३ ! प्रधानजी, तो कोण एक यमदूतासारखा उग्र, करवंदीच्या जाळींतून निघून वांकत वांकत क्रूर-दृष्टीनें आपणांकडे पाहतो आहे ? ज्याचें तोंड पिंजार-

लेल्या दाढीमिशांच्या भुर्कुलानें अगदीं झांकून गेलें आहे, आणि सारें आंगही काळ्या कांबळयानें गुंडाळलेलें असल्यामुळें, तो मोठा दांडगा आस्वलच उभा राहिला आहे, असें वाटतें !

**विदूल**– ( भिऊन गरीबीनें ) महाराज, ही भिल्लांची बारीच आहे ! ( मनांत ) इजमधून कसे पार पडूं, हें कांहीं सांगवत नाहीं ! ( स्पष्ट ) परंतु साहेब, आतां भारद्वाजमुनींचें रमणीय तपोवन पहाल, तेव्हां सारें दुःख विसराल.

**पुरुष**– ( मागें पाहून मोठयानें ) अबे भयानकजी, ओ देखो, बडी सिकार आयी हय् ! चलो दौडो दौडो.

**मनोरमा वगैरे**– ( चकित होतात ).

**विदू०**–(कोणांची गांठ न घेतां, छपूनच भागीरथी उतरलीसें करून पलीकडे सर्वांची वाट पहात रहातो ).

**मनो०**– ( दिल्गिरीनें ) प्रधानजी, ही आपणांस कंठस्नान घालण्याची गर्दी दिसते. ठीकच ! अहो, भिकेची हंडी शिक्यावर चढणें कठीण ह्मणतात, तें कां खोटें ? असो, हा प्रसंग अयोध्येसच यायाचा, पण ब्रह्मयानें ही जागा नेमिली होती, ह्मणून हें चुलींतून निघून वैलांत पडल्यासारखें झालें ! शिव शिव शिव !

( इतक्यांत ते दोघे पुरुष प्रवेश, आणि त्यां सर्वांस मध्यें, करून तलवारीचे सळ सोडितात ).

**भयानक**–(तलवार उसपून विदल्लाकडे) क्यं बे बुढे, किस्की ओ अव्रत तूनें निकालकर लायी हय् ? सच्चा कहो. नही तो देख ओ तलवार ! ( तलवार उगारतो ).

**मनो०**– ( मोठयानें ओरडून ) अरे देवा रे ३ !

**सुदर्शन**– ( ओरडून ) अगे बयागे ३ ! ( तिच्या कंबरेस मिठी घालूं पहातो ).

**घोरमुख**– ( त्याच्या हातास धरून आणि त्यास झटकर मागें ओढून ) क्यं बे छोकरे, तू कल्ला क्यं करता हय्? चुप रहो ; नहीं तो तेरी गर्दान उडादेऊंगा ! ( त्याच्या मानेवर तलवार उगारतो ).

**मनो०**– ( खळखळां रडत सुदर्शनाकडे पाहून ) हर हर हर ! बालका सुदर्शना, राजपदावर बसलेल्या तुला पाहून मी आपले डोळे शीतळ करीन, अशी मला फार रे आशा होती ! परंतु बाबा, कशी ही आकाशाची कुऱ्हाड येऊन पोहोंचली ! ( दीन दृष्टीनें चहूंकडे पाहून तळमळत ) अहो, कोणी या माझ्या बालकाला तरी जगवा हो ३ ! अहो, कोणी तरी या मृत्युपाशापासून माझ्या बाळाला सोडवा हो ३ ! अहो, कोणी तरी या माझ्या लेंकराचे प्राण वांचवा हो ३ ! ( कोणी उत्तर देत नाहीं, असें कळून येतांच घोरमुखाकडे हात जोडून तळमळत ) बाबा आतां एवढी तरी कृपा कर ! आधीं माझी मान सोडीव ! (त्याजपुढे मान करिते).

**जरती**– ( रडत रडत ओरडून ) बाईसाहे३ब ! ( तिच्या मानेवर आपली मान ठेविते ).

**विदल्ल**– ( गरीबीनें ) अरे भिल्लांनों, आह्मी केवळ दुर्बळ अशस्त्र आहों, हें पाहूनही अशी झोंबाझोंबी कां करितां ? तुमचें काय ह्मणणें असेल तें नीट कां बोला ना ?

**भयानक**– अबे बुड्ढे, बोलतेहूं गरीबीसें बोलतेहूं ! हम् भट्टहूं, बसिष्ठभट्ट और बिस्वामित्रभट्ट ! सीधा बोलनेकू. अबे, तू मूवा बुड्ढा अंधा हूय् रे ? मालुम् परता

नही, हमारी तल्वार क्या कहती हय् उस्? ( वेगानें तलवार वर करितो ).

( इतक्यांत भिल्लांचा नायक दुर्दर्श प्रवेश करितो ).

**दुर्दर्श**–( त्रासून ) घोरमुखजी, अबे भयानकजी, किस्वास्तें तुमनें इतनी देर लगायी हय् ? इस्लोग कौंन, और किदर्से आये ?

**घोरमुख**–( असूयेनें ) खुदावंत, ये सब्बि बडी मग्रुरी करते हय्; कब्बि सीधा बोलते नही !

**दुर्दर्श**–( घुश्शानें ) अच्छा हय्, आपनेकू क्या नही बोले तो ? सब्का सीर उडादेना, और आपना काज करकर निकल्जाना !

**मनोरमा**–( त्याजकडे हात जोडून, दीन स्वरानें ) अरे शबरराजा, हे तुझे दोघे शस्त्रधारी पहिल्यानेंच आमच्या माना कापण्यास तयार झाले ! यांणीं बोलायास अवकाशच दिला नाहीं; मग आह्मांकडे काय आहे, सांग बरें. आतां तूं ऐकत असलास तर बोलसें एक. अरे, आमच्या दुर्दैवानें आह्मांला जागच्याजागींच मरण आलें होतें, पण आपल्या साऱ्या ऐश्वर्याची आशा सोडून सरासरीस प्राण वांचवावे, असें मनांत धरून मोठ्या आयासांनीं आपल्या घरांतून निघून आह्मी एथपर्यंत आलों आहों ! आणि तूंच पहा बरें; आह्मांपाशीं कांहीं हत्यार, किंवा जिवंठ माणूस तरी आहे काय ? यासाठीं ह्मणसें,–

**पद**–( राग कालंगडा ).

**सोडिसोडीआह्मांसीभिल्लाधिपते करुणेनेंगंभीरमते**
॥ सोडि० ॥ ध्रु० ॥ दुर्दैवयोगानेंपतिलामुकल्यें

राज्यहिगेलेतेंमाझें ॥ तरिवत्सासहमीवनवासीझाल्यें हेंहीबावाटेस्याओझें ॥ सोडिसोडी० ॥ १ ॥ धन वानातुजलागीकायहीजोडी त्यांतूनीआह्मीबापुडीं ॥ गांजिल्याशींसुजनचकोणीनाडीं जाणेजोसुयशाची गोडी ॥ सोडिसोडी० ॥ २ ॥ १९ ॥

**दुर्दर्श**—( कपाळास आठ्या घालून, भयानकाकडे ) रोय् रोय् क्या बताती, कछु अच्छा मालुम परता नही ! ( किंचित् विचार करून ) होना. ( विदल्लाकडे ) बुढ्ढे, अबी तुमनें जीकी फिकीर मतकरना, लेकिन् तुह्मारे पास जो कछु होगा, उस् सब यहां चुप धारकर तुम् निकल् जाव.

**विदल्ल**—बहुत उत्तम ! एथें आह्मी फक्त मनुष्यें आहों, हें तुह्मी पहातांच आहां. आतां, ( पडद्याकडे हात दाखवून ) त्या मोठ्या जाळीमध्यें चार घोडे आणि ज्यामध्यें दहा लाख रुपायांच्या जवाहिरानें भरलेली पेटी आहे, असा जडावाचा रथ. इतकेंच आह्मांपाशीं आहे, याखेरीज कांहीं नाहीं !

**दुर्दर्श**—(त्या जाळीकडे न्याहाळून पाहिल्यानें मोठमोठे घोडे आणि लखलखीत रथाची झाक नजरेस येतांच हर्षानें ) भयानकजी, अबे घोरमुख, हकाल्देव इन्कू.

**घोरमुख**—( सर्वांस हातानें खूण करून ) जाव जाव.

**मनोरमा वगैरे**—( चटकर निघून जातात ).

**दुर्दर्श**—घोरमुखजी, अबे भयानक, रथकू घोडे लगाव. उसमें बैठकर निकल् जाऊं ! ( तिघेही निघून जातात ).

( इतक्यांत मनोरमा वगैरे प्रवेश करितात ).

**विदूषक**—( मनोरमेकडे ) महाराज, दोन प्रसंग जिवावरचे गुजरले ! पुढें तिसरा खास येणारच ! कार-

ण, तो युधाजित् आहे! त्या प्रसंगांतून बचावलों, ह्मणजे बहुतकरून पार पडलोंच! आणि ईश्वर प्रायः तशीच कृपा करील, असेंही वाटतें!

**मनो०**—( धुसकारा टांकून ) परमेश्वराची मर्जी असेल तसें होईल!

**विदल्ल**—वनचरा, अशाही प्रसंगीं एथील नावाडी बहुत सज्जन भेटला! त्याणें प्रेमयुक्त भाषण करून अगत्यानें आह्मांस भागीरथींतून उतरून पार केलें! असो, चला आतां भारद्वाजमुनींचें दर्शन घेऊन पुढें चालते होऊं! ( नंतर ते हळूंहळूं भारद्वाजाश्रमाच्या समीप गेले असतां, मनोरमा श्रमांनीं आणि भीतीनेंही थकून मटकर खालीं बसली, असें पाहून सर्व तिजपाशीं बसतात).

**विदल्ल**—महाराज मनोरमाबाई, आपल्या सुकुमार चरणांस हा अरण्यांतील खडतर मार्ग बहुत पीडा करीत असेल! तर एथें असेंच कांहीं वेळ बसून विश्रांति घ्यावी. ( अंगवस्त्राच्या पदरानें तिला वारा घालितो).

**मनो०**—(भिल्लांच्या दर्दराटानें थर्थरां कांपत) हर हर हर! देवा! या तीन वारांच्या मागें मी कशी होत्यें, आणि आतां कशी आहें! ( चहूंकडे पाहून) मला सर्वत्र ते भयंकर भिल्ल दिसताहेत! ( घाबऱ्यानें आकाशाकडे पाहून) देवा, बाल, वृद्ध, आतुर, अशा आह्मां अनाथांच्या माथ्यावर दुर्दैवानें एवढा पर्वतप्राय संकटाचा बोज्या लादला हा अनर्थ, सर्वदर्शी सर्वशक्ति तूं डोळे उघडून पाहतोस, हें दयाळा तुला शोभतें ना? आतां हा प्रकार तुला दिसलाच नाहीं ह्मणावें, तर, तुझा डोळा हा चंडकिरण, उष्णकाळाच्या योगानें पूर्णदशेस आलेल्या आपल्या तापाच्या

कडक झळायांनीं, फुपाट्यांत घालून भाजिल्यांसारखें आह्मांस गांजितो आहे! अरे, मानेवर सुरी ठेवण्याकरितां खाटकानें जोड्याच्या पायाखालीं मुंढी दाबून धरिल्यामुळें गरगरां डोळे फिरवीत चारी पाय पांखडणाऱ्या बकऱ्याप्रमाणें आह्मी तरफडत असतां आह्मांवर असा कहर करणें, हा तुझ्या पूर्ण दयाळूपणाचा परिणाम ना? असो, आमच्या प्रारब्धाला तू काय करिशील! "जसें वागावें तसें भोगावें" असा तूं आपला सिद्धांत प्रसिद्ध करून मोकळा झाला आहेस! बरें, तुझी मर्जी! (मूर्च्छेप्रमाणें डोळे झांकीत खालीं मान घालित्ये).

**सुदर्शन**—(घाबऱ्या घाबऱ्या तिजपुढें गुडघ्यावर उभा राहून, आणि तिचें तोंडाशीं तोंड नेऊन रडत रडत) आई गे, सावध हो. तूं असें काय करित्येस? तूं जातीची क्षत्रिय आणि जाणती असून कितीं ही शोकाच्या आहारीं जात्येस? आतां तुजखेरीज दुसरें कांहीं तरी मला उरलें आहे काय? आई, आपला अंत घेणाऱ्या दुर्दैवालाच तूं कशी मदत करित्ये आहेस? आई, डोळे उघड गे! (हनुवटीस धरून आणि तिचें तोंड वर करून) आई गे, आयुष्याच्या क्षणिकत्वाचा अनुभव घेणाऱ्या मला तुझें तोंड तरी डोळाभर पाहूं दे!

**मनो०**—(डोळे उघडून धुसकारे टाकीत भित्र्या दृष्टीनें चहूंकडे पाहून कांपऱ्या रडक्या स्वरानें) लेंकरा सुदर्शना, अरे राजपदावरून ओढून टाकिलेल्या तुझ्या, रक्तानें भिल्लांचीं हत्यारें, अथवा वाघ, लांडगे यांच्या दाढा रंगविण्याकरितांच तुला प्रसविणाऱ्या मज चांडाळणीचें तोंड आतां कशाला पाहतोस! आणि शत्रूंच्या

उत्साहदेवतेला, तूं, हा बळी देऊन पुष्ट करण्याकरितां, मृत्युगृहासारख्या या घोरा अरण्यांत तुला घेऊन येणाऱ्या निर्दयेला मला आई तरी कशाला ह्मणतोस बालका? अरे, आपणांवर गुजरलेल्या या दुस्तर समयीं, मी केवळ आपल्या शत्रूलाच नाहीं, तर धरित्रीला सुद्धां दुर्धर भार झाल्यें आहे! कशावरून ह्मणशील तर, ही पृथ्वी अचल असतांही आपलें आंग थर्थरां झाडून मला झुगारून देये आहे! तशाच साऱ्या दिशा गरगरा फिरून मजवर कोसळताहेत, असें मला वाटतें! तर बाबा, आपल्या जिवाला आणि पोटच्या जहरा तुलाही अशा घोरसंकटांत घालणारी फुटक्या कपाळाची मी कोणत्या आधारावर आतां तोंड दाखवूं! (खळखळां रडये).

**विदुल**—(डोळ्यांस आंसवें आणून) महाराज मनोरमाबाई, आतां अगदीं भिऊं नका; आपण भारद्वाज मुनींच्या आश्रमासन्निध आलों आहों! पहा बरें, सभोंवतीं वृक्षांच्या पंक्ती कशा रमणीय दिसताहेत त्या, आणि निर्वैर पशु तसेच पक्षी कसे प्रसन्नचित्त, शांतदृष्टि होत्साते यथेच्छ संचार करिताहेत! आतां आपणांस पृथ्वी आणि दिशा हालल्या सारख्या दिसतात, याचें कारण; या दारुण संकटानें आपल्या तळपायांसही कांपरें सुटलें आहे, तशीच आपली दृष्टिही भयचकित झाली आहे इतकेंच.

(इतक्यांत भारद्वाजाचा शिष्य कमलाकर, बगलेस आसन आणि उजव्या हातांत जलपूर्ण कमंडलु घेऊन तोंडानें कांहीं गुणगुणत लगबगीनें पडद्याच्या दाराबाहेर येतांच मनोरमेकडे पाहून दबकतो, नंतर चकित होऊन आपणाशीं) अहाहा! कोण ही स्त्री असावी!

जिला पाहून असें वाटतें कीं, कदाचित् अति थंडीनें पाणीही अचल होतें. तशी कांहीं कारणानें ही विद्युल्लताच स्थिर झाली आहे काय! अथवा या ग्रीष्मार्काच्या कडक तापानें सारें अरण्य तापल्यामुळें एथील वनदेवताही म्लान होत्साती विश्रांतीकरितां शीतळच्छायेच्या आशेनें या पुण्याश्रमाच्या आश्रयास आली आहे काय! ( नंतर सूक्ष्मदृष्टीनें तिजकडे पाहिल्याबरोबर हळहळून ) अरेरे! असें नव्हे. कारण, जसें षड्रिपुत्यागावांचून तप, किरणसमुदायावांचून चंद्रबिंब, पुत्रावांचून दांपत्य, राजावांचून राष्ट्र, मनुष्यसमाजावांचून मंदिर, तसें कुंकुमतिलकावांचून अतिरिक्तसुंदी इचें भालस्थळ आणि तशीच उदास मुखचर्या दिसते! तस्मात् इचा पति थोडक्याच दिवसांमागें लोकांतरींचा प्रवासी होऊन, प्रपंच विध्वस्त झाल्यामुळें दुःखाग्नीच्या ज्वाळांनीं होरपळून वनवासी झालेली कोण्याही महाभाग्यवानाची स्त्री असावी यांत संशय नाहीं! ( किंचित् अवकाशानें ) हर हर हर! आतां अशा वैतागानें तळमळणाऱ्या इचें स्वागत मीं अवश्य करावें; परंतु काय करूं, अगदींच अवकाश नाहीं! इतक्यांत गुरुमहाराज येतील! याकरितां इणें मला निर्दय, पाषाणहृदय म्हटलें तरी तें सोसण्याचें पतकरून त्वरेनें पर्णशालामंडपांत जाणें भाग आहे! ( लुगुलुगू पुढें चालूं लागतो ).

**विद्युल्लता**— मुनिमहाराज, आपण कोठें असतां आणि आपलें नांव काय?

**कमलाकर**— अहो, मी भारद्वाजमुनींचा शिष्य; त्यांच्या आश्रमांतच असतों, आणि माझें नांव कमलाकर.

**विट्ठल**—( हात जोडून ) कमलाकरमहाराज, मला आपणांशीं कांहीं बोलायाचें आहे.

**कमलाकर**— अहो, मी फार त्वरेंत आहें! मागून गुरुमहाराजांबरोबर त्यांचे पट्टशिष्य माधवाचार्य येताहेत त्यांजपाशीं बोला. ( पुढें जाऊन भारद्वाजाचें आसन मांडायास लागतो ).

**विट्ठल**—(दिल्गिर होऊन) बरें आहे! (आपणांशीं) शिव शिव शिव! मोठमोठ्या जाहागीरदारांस तसेंच सरदारशिपायांस देखील आह्मांशीं दोन शब्द बोलायाला, महिना महिना, दोन दोन महिने सवड होत नव्हती; आणि आतां आह्मांस कसा दिवस आला आहे हा! तेंच आह्मी उलटें आर्जवानें बोललों, तरी तें आमचें भाषण कोणी ऐकेना देखील! मग दुसरें तर काय? राम राम राम!

( इतक्यांत माधवाचार्यासह भारद्वाज प्रवेश करितो ).

**विट्ठल**—( भारद्वाजास वंदन करून माधवाचार्याकडे ) अहो माधवाचार्य, आह्मांला गुरुमहाराजांचे दर्शनास येण्याविषयीं आज्ञा असावी.

**माधव**—( आर्जवानें ) अहो महाराज, एथें पशुपक्षीही यथेच्छ संचार करितात आणि तुह्मी तर मोठे संभावित दिसतां मग तुह्मांस कशाची शंका बरें, खुशाल या.

**भारद्वाज**—( उजव्याकडे माधवास आणि डाव्याकडे कमलाकरास घेऊन आसनारूढ होतो ).

**मनोरमा वगैरे**—( भारद्वाजादिकांस वंदितात ).

**भारद्वाज**— इष्टसिद्धिरस्तु. ( त्यां सर्वांकडे ) या; स्वस्थ बसून विश्रांति घ्या. तुह्मी बहुत श्रांत झालां आहां, असें तुमच्या मुखमुद्रांवरूनच दिसतें!

**विदल्ल**– ( हात जोडून ) गुरुमहाराज, एतत्संबंधीं सर्व वृत्तांत, या चरणांपाशीं निवेदित करून आपण दु:खरहित व्हावें, या हेतूनेंच आह्मी आलों आहों!

**भारद्वाज**– बरें बरें आहे. आणि तुह्मी अगदीं अनाथासारखे फारच भयाकुल दिसतां, यास्तव आह्मी आपला उद्योग यथावकाश करूं, परंतु आधीं तुमची वार्ता ऐकावी, असें इच्छितों.

**विदल्ल**– ( गहिंवरून मनांत ) शिव शिव शिव! किती मृदु ही अंत:करणवृत्ति, केवळ दयेची मूर्तिच! ( स्पष्ट ) गुरुमहाराज, साक्षात् कल्पवृक्षच अशा या चरणांच्या छायेस आलों ह्मणजे आमचा सकलदु:खजनित दाह लयास जाईल, अशी आशा धरून आह्मी येण्याबरोबर गुरुचरणांच्या दर्शनानेंच आमची इच्छा सफल करण्यास आरंभ केला! यास्तव निर्भयचित्त होऊन विनंती करितों. अयोध्येचा राज्याधिकारी ध्रुवसंधिराजा होता; त्याचा मुख्य प्रधान मी, माझें नांव विदल्ल; आणि त्याची थोरली स्त्री, (.मनोरमेकडे ) ही मनोरमा, तसाच तिचा पुत्र (सुदर्शनाकडे) हा सुदर्शन!

**भारद्वाज**– हां हां! असें काय? अरेरेरेरे! बरें, पुढें?

**विदल्ल**– त्या राजाची धाकटी स्त्री लीलावती, तिचा पुत्र शत्रुजित् ( सुदर्शनाकडे हात करून ) या सुदर्शनाहून एक महिना वयानें अधिक, इतक्या कारणानेंच प्रस्तुत तो राज्याधिकारी झाला आहे!

**भार०**– हूँ३. असें झालें काय? हर हर हर! अयोध्येच्या दर्बारांत अशी धांदल! आह्मांस आमंत्रण आलें होतें, परंतु या दंग्यामुळेंच आह्मी कंटाळा केला.

**विद०**— आणि महाराज, सर्व ऋषी, राजे, यांपैं-कीं कोणीच आले नाहींत!

**भार०**— अस्तु, परंतु अहो, ध्रुवसंधिराजा महाशूर आणि अगदीं तरुण! त्याचें देहावसान झालें ह्मणून आह्मीं ऐकिलें खरें, परंतु त्यास काय कारण झालें हो?

**विद०**— गुरुमहाराज, आज सोळा सतरा दिवस झाले; ध्रुवसंधिराजा अरण्यांत मृगया करीत असतां त्याला एका प्रचंड सिंहानें अवघड ठिकाणीं गांठिलें! नंतर राजा पराकाष्ठेचा शस्त्रास्त्रविद्यानिपुण असून, त्याची आयुर्मर्यादा भरली, या कारणानेंच तो निरुपाय झाला, आणि त्या सिंहानें किरण साधून त्यांजवर झडप घातली! (डोळ्यांस पदर लावीत आंतल्या आंत फुंदून विराम करितो).

**मनोरमा, सुदर्शन** आणि **दासी**—(आंतल्या आंत मुसमुसतात).

**भार०**—(कळवळून) हर हर हर! (माधवाकडे) माधवा, कसा सहवासानें हृदयग्रंथि दृढ होतो आणि त्याचा परिणामही हा पहा! त्यांतही याचा अनुभव गुणिलोकांस विशेषतः. अस्तु. (विदल्लाकडे) बरें, पुढें?

**विद०**—(अश्रुपूर्ण दृष्टीनें विदूषकाकडे पाहातो).

**विदूषक**— पुढें काय सांगावें महाराज, ज्या कालीं सैनिक परतून अयोध्येस आले, त्या कालीं,—

## ओवी.

वार्ताकथिलीसैनिकांनीं ॥ ऐकूनिवदतांमंत्रिलोकांनीं ॥
अवधारिलीपडतांकानीं ॥ बायकांनींनृपाचिया॥२०॥

**भार०**— राम राम राम! (माधवाकडे) माधवा, काय दुःख हें! या लोकांच्या कर्णांस ती वार्ता शूलप्रहाराहूनही अधिक वेदनाजननी झाली असेल! (विदूषकाकडे) बरें, पुढें?

**विदूषक**— नंतर महाराज, ते राजभार्यादिक,—

## ओवी.

**तळमळूनियाअंतःकरणीं ॥ आंगटाकूनियाधरणी ॥**
**ह्मणतीकैसानजातारणीं॥राजर्क्षतरणिनिमाला॥२१॥**

**भार०**— (माधवाकडे) माधवा, सर्वार्थनाशसमय आला ह्मणजे मनुष्य दीन होऊन अर्थनाशाला मुकाट्यानें मान्य करितो! अस्तु. (विदूषककाकडे) बरें, पुढें?

**विदूषक**— नंतर महाराज, ते सर्व,—

## ओवी.

**देहादिकींहोऊनिविलक्ष ॥ आकाशींदेऊनियालक्ष ॥**
**ह्मणतीराजात्वद्गुणवलक्ष॥लक्षोपलक्षआठवती॥२२॥**

**भार०**— (धुसकारा टांकून) नारायण! (माधवाकडे) माधवा, अशा प्रसंगीं अतिदीन बायकामुलांनीं काय करावें! हर हर हर! (विदूषककाकडे) पुढें कसें झालें रे बाबा?

**विदूषक**— नंतर महाराज, राजमंदिरांत झालेली आरडाओरड ऐकून नागरिक लोकांनीं जो आकांत मांडिला, तेणेंकरून एक मुहूर्तभर असें वाटलें कीं, आपल्या पतीचें निर्धन ऐकून ही सारी नगरीच दारुण घोषानें आक्रंदत्ये आहे काय!

---

१ अन्यराजे, हींच ऋक्षें (नक्षत्रें) त्यांचा तरणि (सूर्य) तात्पर्य, त्यांस दिपविणारा. २ तुझे गुण. ३ स्वच्छ (निर्दोष). ४ मरण.

**भार०**— (धुसकारा टांकून) शिव शिव शिव ! असो, आतां तें पुरे ! पुढें याची व्यवस्था कशी झाली तें सांग ह्मणजे झालें.

**विद्युल**— ( विदूषकाकडे हातानें खूण करून ) थांब. ( भारद्वाजाकडे ) पुढें महाराज, तात्कालिक आणि वृद्धिनिमित्तापकर्षप्राप्त[1] कृत्यें झाल्यावर चवदाव्या दिवशीं, वसिष्ठप्रमुख पंडित, सारे मंत्रिवर्ग, सेनापति वगैरे कामदार आणि सरदार, तसेच राजधानींतील प्रख्यात संभावित, या सर्वांच्या विचारानें (सुदर्शनाकडे) हा सुदर्शनच राज्याधिकारी, असें ठरलें; इतक्यांत, लीलावतीचा पिता उज्जयिनीदेशाधिपति युधाजित्, आणि या मनोरमेचा जनक कालिंगदेशाधिपति वीरसेन, हे येऊन पोहोंचले. पुढें सभेंत झालेला ठराव युधाजितास अनिष्ट वाटल्यामुळें, त्या दोघांचा कलह संग्रामांत[3] झाला; त्यांत वीरसेन पडला, मग काय ! ( गप्प राहतो).

**भार०**— अरे राम राम राम, फार वाईट गोष्ट झाली ! अस्तु, पुढें ?

**विद्युल**— नंतर या मनोरमेला कांहींसा पित्याचा आधार वाटत होता, तोही नाहींसा झाल्यानें ही अगदींच घाबरली; असें होतांच मीही, "परोपकार करण्यानें दारिद्र्य आलें तरी चांगलें, परंतु चोऱ्या करून आलेली श्रीमंतीही वाईट;" याप्रमाणेंच, "न्यायानें कष्ट भोगावे लागले तरी चिंता नाहीं, परंतु अन्यायोत्पन्न सुख नको"

१ राज्याभिषेक हीच वृद्धि ( मंगल ) या निमित्तानें पुढील कृत्यें असून आधींच केलीं पाहिजेत या शास्त्रानें प्राप्त झालेलीं. २ मासिकें वगैरे. ३ युद्धापर्यंत.

असें मनांत आणून; या मनोरमेला बोललों कीं, हें मंदिर इतके दिवस तुमचें होतें परंतु प्रस्तुत तुमच्या मृत्यूचें झालें! असें समजून सद्भूया याची आज्ञा अगदीं सोडा, आणि, माझा मातुल सांप्रतकाळीं, काशिक्षेत्रीं राज्य करितो आहे; तेथें आपण जाऊन त्याच्या पाठीस पडूं; मग कसेंही झालें तरी ती काशी आहे; असा संकेत ठरवून, नंतर एक जडावाचा रथ आणि सुमारें दहा लक्षांचें जवाहीर घेऊन, ते अन्यायी लोक अभिषेकसमारंभाच्या गडबडींत दंग आहेत, अशा अवसरीं निघून, दोन दिवसांत भागीरथीतीरीं आलों, तेथें भिल्लांनीं सारें द्रव्य आणि रथही नेला!

**भार०**— (धुसकारा टाकून) हर हर हर! कसला भयंकर प्रसंग हा! बरें, अशाही धामधुमींत तुह्मांला भिल्लांनीं जिवंत सोडिलें, हें एक राज्यच दिलें! अस्तु, पुढें?

**विदल्ल**— नंतर गंगा उतरून, (त्याच्या पायांकडे हात जोडून) या चरणांचे दर्शनास आलों! आतां गुरुरायांची आज्ञा होईल तसें पुढें,—

**भार०**— शाबास शाबास! प्रधानजी, एथें आलां हें चांगलें केलेंत! तुह्मी राजारजवाड्यांकडेस कोठेंही गेलां असतां, तरी तो दुष्ट युधाजित् तुमचा नाश केल्यावांचून राहताना! आतां, "काशीस जाऊं" ह्मणतां, परंतु आह्मी सांगतों; तुह्मी एथून एव्हांच जाऊं नका, कारण या वेळेस तुह्मांला मुनीखेरीज दुसऱ्या कोणाचाही आश्रय सुखावह होणार नाहीं! आणि,—

## अनुष्टुप्.

**अकंपसत्ववृत्तीना मस्माकंत्वाश्रमेक्कचित् ॥**

**अत्रशत्रुत्वचारोस्ति नार्थतःकिंतुनामतः ॥२३॥**

फार काय सांगावें! अस्मदादिकांच्या तपोवनांत, गाई व्याघ्र, उंदीर मांजरें; वनश्वान हरिणें, वानर बकरीं; इत्यादिक स्वभावतः वैरी पशुही निर्वैर नांदतात! याचा अनुभव या आश्रमांत येतांना तुह्मींही घेतलाच असेल, तर निर्भयाचित्त होऊन एथेंच रहा. थोडक्याच काळानें ईश्वर तुमचें राज्य तुह्मांस देईल, समजलां!

**मनो०,सुद०,विद०**—(हात जोडून एकदांच) आज्ञा!

**विद०**—गुरूमहाराजांचें एवढें आश्वासन मिळाल्यावर आणिक काय पाहिजे!

**भार०**—( सर्वांकडे ) चला आतां, आह्मी देवपूजेकरितां देवालयांत जातों, आणि तुह्मींही आपआपलीं आन्हिककर्मं करा.

**सर्व**—( भारद्वाजाबरोबर निघतात ).

( इतक्यांत एक दूत प्रवेश करितो ).

**दूत**—( कमलाकराकडे ) भटजीमहाराज, हे पाहुणेसे कोण दिसतात?

**कम०**—अरे, ते अयोध्येच्या राजाची स्त्री, पुत्र, मंत्री असे आहेत.

**दूत**—( मनांत ) वाहवा, मोठें काम झालें! एणेंकरून आतां माझें दारिद्र्य पळून जाईल. ( परत जाण्याकरितां निघतो तोंच )—

---

१ एथें आह्मा निश्चलसत्ववृत्तींच्या आश्रमांत, शत्रुत्वसंचार प्रत्यक्ष नाहींच, परंतु (पुराणादि वाचितांना) क्वचित् नामतः आहे! द्रुतकेंच.

**भार०**— ( दोघे शिष्य वनचर आणि राजमंडळी यांसह निघून जातो ).

**दूत**— ( घाईनें इकडे तिकडे फिरत फिरत शेवटीं पडद्याकडे वळून, आपणाशीं) अहो, मी यशस्वी झालों यामुळें रात्रीचा सुद्धां दिवस करून मजल गांठिली ! तरी या वेळेस वाड्यांत जाऊन उपयोग नाहीं, हा समोर हिराबाग दिसतो; यांत युधाजित्महाराज, याच वेळेस येत असतात; ह्मणून तेथें जाऊन त्यांस गांठितों. ( बागांत गेलेसें करून ) अहाहा ! काय नामी हा बगीच्या, ज्यांत शिरण्याबरोबर माझा चालण्याचा भागवटा बहुतकरून गेलाच !

( इतक्यांत पडद्यापलीकडे ) उज्जयिनीदेशसिंधुसुधाकर युधाजिद्राजमहारा२ज, आस्तें, कदम् मुलाजा २. ( असा शब्द होतो ).

**दूत**— ( एका बाजूस स्तब्ध राहतो ).

( नंतर चित्रतंत्रमंत्री यासह युधाजित् प्रवेश करितो आणि ते यथायोग्य बसतात ).

**युधा०**— काय हो प्रधानजी, जितका दूत परत आला तितका " शत्रु सांपडत नाहीं " ह्मणून रडत गात आला ! यास्तव मला तर आज झोंप सुद्धां आली नाहीं ह्मणजे पहा ! कारण, अग्निशेष, ऋणशेष, शत्रुशेष, हीं मोठीं अनर्थबीजें आहेत ! त्यांतही सुदर्शन मोठा कहारी बुद्धिमान्, यास्तव फारच धस्धस् वाटत्ये ! ( धुसकारा टांकितो ).

**दूत**— ( हात जोडीत त्याच्या समोर येऊन ) सरकार, त्या शत्रूविषयीं खावंदांनीं तिळभर देखील धस्-

धस् बाळगूं नये, याच पावलीं त्याचा वध करण्याकरितां निघावें!

युधा०— अरे, पण त्याचा शोध लागेल तेव्हां कीं नाहीं?

दूत— खावंद, मजसारखा यशस्वी दूत सरकारच्या पदरीं असून अशा गोष्टीविषयीं काळजी! तर ऐकावें महाराज,—

## अंजनीगीत.

भारद्वाजाश्रमामाजीं। आहेअपुलाशत्रूआजी॥
त्याच्यामारणिंउशीरकांजीं। करितांनृपवर्या॥२४॥

युधा०— (हर्षानें) भले शाबास! (प्रधानाकडे) प्रधानजी, या दूताला योग्य बक्षीस द्या.

चित्रतंत्र— (हात जोडून) आज्ञा.

दूत— (मुजरा करून निघून जातो).

युधा०— प्रधानजी, आतां भारद्वाजाश्रमास जाण्याची तयारी लवकर करा, आणि सरंजाम फारसा नकोच; कारण भटांशीं गांठ आहे! ते दुराग्रह करणार नाहींतच; त्यांतही कदाचित् केलाच तर अम्मळ दर्डाविलें ह्मणजे झालें, आहे काय त्यांत!

चित्रतंत्र— खरें आहे सरकार. (मनांत) हें भाषण एथेंच, आश्रमांत गेल्यावर या शूरांची कशी हवाल होईल! कांहीं सांगवत नाहीं! असो. (स्पष्ट) महाराज, आतांशा स्वारीची सर्वदा तयारी आहेच, लवकर निघण्याचें करावें ह्मणजे झालें.

युधा०— ठीक आहे, चला!

सर्व— (निघून जातात).

# अंक ४ था.

---

## पात्रें १७:

१ विदूषक............ एक हास्यकारी.
२ सावकार............ एक व्यापारी.
३ शिपाई................ त्याचा.
४ युधाजित्............ लीलावतीचा पिता.
५ कंचुकी............ त्याचा भालदार.
६ चित्रतंत्र.... ........ ,, प्रधान.
७ व्याघ्रसेन........... ,, सेनापति
८ दुर्दर्शी................ भिल्लनायक.
९ भयानक............ त्याचा एक हस्तक.
१० घोरमुख............ ,, दुसरा ,,
११ भारद्वाज............ प्रसिद्ध मुनि.
१२ माधव... .... ..... त्याचा थोरला शिष्य.
१३ कमलाकर.......... ,, धाकटा ,,
१४ मनोरमा............ भुवसंधिराजाची थोरली स्त्री.
१५ सुदर्शन............ तिचा पुत्र
१६ विदल्ल............... ,, मंत्री.
१७ जरती................. तिची दासी.

## स्थळ-भारद्वाजाचा आश्रम.

( तदनंतर विदूषक येतांच भांबावल्यासारखें करून) अरे, मी कोणत्या देशांत आलों हा! पश्चिमेकडे एकांत एक गुंतल्यासारख्या डोंगरांच्या रांगा आणि पूर्वेकडेस एकापेक्षां एक भयंकर माळ, झाडझूड तर साऱ्या गांवांत एखादुसरें इतकें विरळ असून दोन दोन, चार चार कोस पाणीही नाहीं! आणखीं पांढऱ्या मातीच्या भें-ड्यांचे गंज लाविल्याप्रमाणें भुंडीं घरें. कोण उदाशी ही!

( इतक्यांत एक सावकार प्रवेश करितो ).

**विदू०**— (त्याजकडे पाहून मनांत) आतां मीं याला राम राम करावा कीं नमस्कार करावा! कांहींच न क-रावें तर माजोरपणा! असो, एथें तोच पतकरणें भाग आहे! ( सावकाराशीं ) अहो बाबा, तुमचा हा कोण मळघाऊ देश? ज्यांत ब्राह्मण, सोनार, शिंपी, तांबट, इत्यादिक वेष, भाषा यांवरून ओळखितां येतच नाहींत!

**सावकार**— अव का इच्यार्ता, आमचा व्हराटी सुबा, आण बोली चाली सार व्हराटी, ह्यो मानदेसांतला लटाव परांत व्हन्यात. अमी इथ्थल्ल देसपांड ऱ्हग्वेदी देशेस्थ ब्रालन. वेजुर्वेदी न्हव. जोसकी अमाकडच हय. त्रचीच सा मन दाण सालदरसाल येत्यात.

**विदू०**— तुम्हांला मुलेंबाळें काय काय आहेत?

**साव०**— इटु व्हन याक ल्योक आण आजवर्दीं झाल्याली चंद्री व्हन याक ल्याक हय. आण आमच्या ज्येठ्या भावाला घा ल्योक हयत.

**विदू०**— पण तुह्मी इतके दिल्गीर कां?

**साव०**— इथ जादववाडींत काई देन घ्येन कयेल हयू, त्याच्या वसुला करता शिपाई पाटिवला त्याला आ-ज च्यार रोज झाल; ठिकाणा न्हाई! ह्याला का विला-ज करावा, या इच्यारांत पडलों हयू! (असें बोलत बोलत दोघेही खालीं बसतात).

( इतक्यांत शिपाई येतो ).

**विदू०**— सावकार साहेब, तुमच्या या प्रांतांत कर्ज-भरी आणि (शिपायाकडे हात करून) हे असले भिकारीही फार!

**शिपाई**— ( विदूषकाकडे कुर्य्यानें ) वाव्वाव! हमी भिकारी है का रौसाबाच शिपै है? ( असें बोलत बो-लत सावकाराच्या जवळ जाऊन आणि घोंगडी पस-रून तिजवर बसतो).

**साव०**— ( अम्मळ दूर सरून ) बर न्हाऊद्या, अधि सांगा वसुलाच कस काय झाल त्ये.

**शिपाई**— ( मिशांवर हात फिरवून डौलानें ) आतां समुद सांगतु कीं, बगा अंदी ग्येलु त्यो नीटच जाद्वाच्ये वाड्याम्दीं, हमाला सम्द ठाव हैयू! अव हमी शिपै है का कान? आन् त्यो जाद्वाचा घराना लै ब्यास! तिर्म-करी का, मादौरी का, जादौरी का, येदौरी का, तवड इट्टलरी मातर बगा अक्शी याड! अव, अटाट दी त्वान्धुनबि न्है, मंग अंगुळीच करयेला इच्यार्तीया? त्येला अताशीं इनाजीपत वैद चकाद देत्याती, मंग बगाव का निरानबंद असल त्यो खरा! अव त्ये का कानाच्या हताम्दी है का का? नारैनाची विद्या अनिक का!

**साव०**— ( त्रासून ) अर तुला त्येच कुणी इच्यारलं

हय्? वसुलाच कस काय झाल त्ये सांग मणजे झाल.

**शिपा०**— त्येच अदुगर सांगतु कीं, म्या जाद्वाच्ये वाड्याम्दी पाइ ठिवतु है का न्है, इत्तयाम्दी द्वाग तिग अल, आन् माज ध्वाड्ड धरूनश्यान फराफरा वडीत वडीत गावाच्ये भाईर न्ह्येऊनश्येनी तिगानीबी आपूल ज्वाड हताम्दीं घ्येत्ल, आन हमाला बडवबडव बडवाया लाग्ल ! मंग का, परनाशी गाट !

**साव०**— ( सुसकारा टांकून ) भल श्येबास शिपैबुवा ! बरं, अतां वसुलाच कश्येला इच्यारावं !

**शिपा०**—वाव्वाव ! वसुलाच मजी ? त्येस्नी पैका येरत ख्वाडता का का है तरी का ! तुमी भ्यालात का मन ? अव हमी शिपै है का न्है ? याकूदा बडव्ल तर पुनारूपि जाईन, त्येचा पिच्या ख्वाडीन का का ? पन रौसाब, काईबि झना ! ह्ये गांवकरी लै उर्माट ! अव, ल्येकाच्येनी येजाच का च्येर रूपै झाल अस्याल्लि तवूड तरी द्येवत का न्हैव? पन काईबि दिनाति मजी का झनाव का?

**साव०**—ठीक समज्लं. तुमी चला आतां घराक्ड. भर्पै झाली वसुलाची !

**शिपा०**— ( निघून जातो ).

**विदू०**— ( विस्मित होऊन मनांत ) अहो, मी भारद्वाजाश्रमीं जायाचा; तो या रखरखीत देशांत भडकून ही गांवूडळ बडबड ऐकत बसलों, वाहवा ! असो, आतां तरी त्वरा करावी.

**साव०**— आतां तुमी कुणिक्ड जाणार हा ?

**विदू०**— अहो, मी चित्रकूट प्रांतीं जाणार आहें.

**साव०**— अमी याव का तिक्ड ?

**विदू०**— कशाला ? त्या साऱ्या प्रांतांत एक देखीत कर्जरोखा सांपडणार नाहीं, आणि तुमचा तर तो उपासनाक्रम !

**साव०**— मग नकोबा ! ( निघून जातो ).

**विदू०**— ( घाईनें इकडे तिकडे पुष्कळ चाललेंसें दाखवीत शेवटीं पडद्याकडे तोंड करून खेदानें ) अहो, किती दिवस सारखा चालतों आहें, तरी आजून भारद्वाजाश्रम येत नाहीं ! ( मागें वळून हर्षानें ) वाहवा, कोण भ्रांति ही पहा ! मी भारद्वाजाश्रमाच्या शिवेवरच येऊन पोहोंचलों आहें हा !

( इतक्यांत पडद्यापलीकडे ) उज्जयिनीदेशसिंधुसुधाकर युधाजिद्राज महारा३ज. ( असा शब्द होतो ).

**विदू०**— ( विस्मित होऊन आपणाशीं ) असें असें ! मनोरमा वगैरेंचा शोध लागून त्यांस भारद्वाजमुनींपासून काढून न्यावें, या हेतूनें ही उज्जयिनीपतिमहाराजांची स्वारी काय, ठीक ! मीही बरा वेळेस येऊन पोहोंचलों ही माजलेल्या कोल्ह्यानें प्रौढ सिंहावर केलेली स्वारी पहायास.

( इतक्यांत चित्रतंत्रमंत्री आणि व्याघ्रसेनसेनापति यांसह युधाजित् भालदारास पुढें करून येतो, नंतर ते तिघे यथायोग्य बसतात ).

**कंचुकी**— निगारखे मेहेर्बान्. अदबसें.

**विदू०**— ( युधाजितास मुजरा करून डाव्या तर्फेस बसतो ).

**युधाजित्**—( विदूषकाकडे ) काय रे वनचरा, झाली तुझी चित्रकूटची वारी ?

**विदू०**— ( हात जोडून ) होय महाराज, वारी झाली आपली सरासरी! कारण, एका वारींत मला भिल्लांनीं गांठून भारी जेरीस आणिलें होतें! नाहीं तर वारी वारी ह्मणजे काय! तरीही मी, तीं सारीं विघ्नें जबरीनेंच मागें सारीत सारीत, घारी सारखी भरारी मारून मोठ्या जरूरीनें आलों, यावरून ही ह्मणच खरी कीं, " ज्यास देव तारी त्यास कोण मारी. "

**युधा०**— बरें असो, पण आमची ती खट पुत्रासह मनोरमा, इला, भारद्वाजमुनि हे भट्ट असून, त्यांणीं धट्टपणा करून आश्रय दिला आहे! परंतु आपण ही खटपट करण्यानें रिकामें झट लाऊन घेऊन कट केल्याप्रमाणें या युधाजिताशीं आट धरणें नीट नव्हे! हा विचार त्यांणीं कसा केला नाहीं!

**विदू०**— ( विस्मित होऊन ) मोठें आश्चर्य वाटतें महाराज. ( मनांत ) त्यांणीं कां विचार केला नाहीं, हें आतां चांगलें जन्मजन्मांतरीं देखीत स्मरण रहावें, असें कळून येईल. बरी घोड्यामैदानांशीं गांठ पडली आहे!

**व्याघ्रसेन**— अहो, ज्यांस असल्या गोष्टींत मन घालायास अगदीं फावायाचें नाहीं असे हे अरण्यवासी भारद्वाजमुनि, निरंतर ईश्वराचा धावा करण्यानें आपणांस तपस्वीबावा ह्मणवीत असून यांणीं असा कावा करावा काय? परंतु " स्वभावास औषध नाहीं " एवढें खरें!

**चित्रतंत्र**— ( युधाजिताकडे हात जोडून ) सरकार, मी आतां जें बोलणार त्याणें आपणांस राग येईल, हें जाणूनही, मला प्रसंगास अनुसरून बोलणें भागच आहे ह्मणून विनंती करितों. महाराज, मुनि ह्मणजे दीनांचे

मायबाप! त्यांचे हितकारक आलाप ऐकून घेण्याचें सोडून उलटा त्यांस संताप येईल, असें कराल तर हें तुमचें पापच तुह्मांस शाप देववील! तर तसें न व्हावें यास्तव हें काम मोठ्या मुर्वतीनें चालविलें पाहिजे, असें मला वाटतें!

युधा०— ( त्याचें भाषण अर्धवट घेतलेंसें करून ) बरें कां होईना! याविषयीं मीं असें मनांत आणिलें आहे कीं, शृंगवेरपुरचा भिल्लाधिपति दुर्दर्श हा, ग्रामसंबंधानें भारद्वाजांचा शिवधड्या असून प्रस्तुत आपल्या अमलांतही आला आहे, तर त्यास पुढें करून हें काम चालवावें.

चित्र०— बरें आहे, ह्मणजे कांहीं तरी पडदा!

( इतक्यांत घोरमुख आणि भयानक यां सहवर्तमान दुर्दर्श प्रवेश तसाच युधाजितास मुजराही करितो ).

कंचुकी— निगारखे मेहेरबान्. सलाम फां. तफावत्सें.

युधाजित्— ( डाव्या तर्फेस हात दाखवून ) भिल्ल-नायका, असा बैस.

दुर्दर्श—( हात जोडून ) हुकूम. ( युधाजितानें दाखविलेल्या जागीं बसतो, नंतर त्याच्या उजव्याकडे घोरमुख आणि डाव्याकडे भयानकही बसतो ).

दुर्द०— युधाजित्महाराज, हमारे खुदावंत अजोध्यासरकार, उस् रहाषतकी देखरेख अबी आपही करते; ऐसा सूनकर मैं महाराजन्की मुलाखत लेनेवास्तें आया हूं.

युधा०—(चित्रतंत्राकडे अपसांत) वाहवा, या कामास वेळ फारच चांगली लागली! असो. (दुर्दर्शाकडे स्पष्ट) हे भिल्लनायका, तूं मोठा शिपाई आहेस, हें तर प्रसिद्धच आहे; परंतु सर्व भिल्लांत एक विचार राखला आहेस, एणेंकरून मोठा मुत्सद्दी आहेस, असेंही स्पष्ट दिसून येतें!

दुर्द०–खुदावंत, ये दोनोबी गुन मेरे आंगमें ठोडे बहुत रहते हय्, लेकिन् उन्कू सरकारनें आपके मुखसें बखानना, ऐसा कछु नही हय् !

युधा०–असो, परंतु शबरनायका, यावरूनच सारें समजलें ! आतां आह्मी कांहीं कार्यास्तव एथें आलों आहों, तर यांत जितकें तुझ्या हातून आह्मांस साह्य होईल तितकें करावेंस !

दुर्द०–महाराज, हम् तो निपट बनबासी ! हमारे हातसें खुदावंतन्का कोनसा काज बननेमाफक हय् ? जो कछु वैसा होगा तो हम् कसूर करनेवाले नहीं ; लेकिन् अव्वल काज तो मालुम् होना.

युधा०–ठीक आहे. अयोध्येच्या राज्याची झालेली व्यवस्था तर सारी तुला समजलीच असेल.

दुर्द०–सूनी हय् खुदावंत. महाराजन्के बेटीका छोकरा राजा हूवा हय्.

युधा०–होय पण, असें झाल्यानें आमचा नातू शत्रुजिद्राजा आणि त्याचा सावत्र बंधु सुदर्शन, यांचें अर्थांतच परस्परांशीं शत्रुत्व झालें !

दुर्द०– सच्चा हय् मेहेर्बान्.

युधा०–आणि त्यांत असें झालें,—आह्मी राज्याभिषेकाच्या समारंभांत दंग आहों, असें पाहून तेथील "विदल्ल" या नांवाचा मुख्य मंत्री याणें आमची नजर चुकवून, तो सुदर्शन, त्याची माता मनोरमा, आणि तिची एक ह्मातारी दासी, यां तिघांस काढून घेऊन तेथून निघाला तो भारद्वाजमुनींस शरण गेला !

दुर्दर्श–( विस्मित होऊन आपणाशीं ) ऐसा ऐसा !

( घोरमुख आणि भयानक यांजकडे पाहून अपसांत ) जिन्का दसूलख्खन्का जवाहीर और जडावका रथ आपनें छीनलाया; ये होगे! इस्में कछु अंदेसा नहीं. (राजाकडे स्पष्ट ) मेहेरबान्, सो बुड्ढा मंत्री बिदल्ल, बडा बडा मसलतगार! ऐसा मालुम् परता. जिन्नें कैसा बेदर्द मकान पकडा हय्!

युधा०—( मनांत खोंचूनही दमदारीनें ) असो, शबरराजा, यांत विदल्लानें केलें हें एकपक्षीं नीटच, परंतु भारद्वाजमुनि आपणांस समदर्शी, निष्पक्षपात असें ह्मणवितात, त्यांस हें राज्यकारभारसंबंधि झट लावून घेणें अगदीं अनुचित!

दुर्द०—नहीं नहीं वैसा नहीं सरकार, जो कोई सरन आया, उस्कू आस्रा देना; ओ तो अघटितघटनासमर्थन्का उन्का बानाय् हय्!

युधा०—( खिन्न होऊनही धीरानें ) असो, परंतु त्यांजपासून सुदर्शन वगैरेंस काढून घेऊन बंदोबस्त करणें आह्मांस जरूर आहे!

दुर्द०—भला! "खुदावंतन्नें जो मन्में लाया, ओ अच्छा," ऐसा हम्कू कहनाय् हय्, लेकिन् मुनिमहाराजन्नें मुर्वतसें चूप दीये तो सरकारका मतलब पुरा होताय् हय्. और जो उन्केसाथ मेहेर्बान् तेड चलायेगे, तो उस्की अखर बडी बुरी होगी! इसूमायनेसें हमारा दिल् बहोत डर्ता हय्!

युधा०—तें कसेंही असो, पण आरंभिलेलें कार्य अर्धें सोडणें नीट नव्हे, आणि शबरनायका, भारद्वाजमुनींशीं पहिल्यानेंच आपण बोलूं नये, तर तुला पुढें करून काम चालवावें असें मीं मनांत आणिलें आहे.

दुर्द०—अच्छा हय् सरकार, उन्के साथ मै सीधा बोलूगा. तेडी बात कर्नेकू मेरा हीया होता नहीं!

युधा०— भिल्लनायका, भारद्वाजमुनि स्नानाकरितां नदीतीरीं गेले आहेत ह्मणून समजलें, त्यास बहुत वेळ झाला; तर ते इतक्यांत येतील, नंतर आश्रमांत जाऊन बसले ह्मणजे मागून आपण जावें, त्यांची उभ्याउभ्याच गांठ घेऊं नये; असें मनांत आहे, यास्तव चला आपण; (झाडीकडे हात दाखवून) त्या झाडींत अम्मळ बसूं. नंतर तू आधीं आश्रमांत जाऊन बोलण्याची सुरवात करितोस तोंच मी येईन.

दुर्द०—हुकूम.

(राजा, मंत्री, सेनापति आणि तिघे भिल्ल निघून जातात, इतक्यांत माधव आणि कमलाकर यांसह भारद्वाज येतो, नंतर ते तिघे पूर्ववत् बसतात ).

विदूषक— (त्यां तिघांस वंदून त्यांच्या समोर बसतो).

भारद्वाज— माधवा, तपोवनांत कोणी पुष्कळ लोक आले आहेत, असें दिसलें रे.

माधव— होय गुरुवर्या, आणि त्यांतही कोणत्या तरी राजाची स्वारी असावी, असें वाटतें.

( इतक्यांत दुर्दर्शी, पडद्याच्या आंतल्या बाजूस येऊन तोंड किंचित् बाहेर काढितो ).

दुर्द०— ( हळूच ) मुनिमहाराज,

विदू०—(चटकर पडद्याजवळ जाऊन) कोण आहे तें?

दुर्द०— महाराज, मैं सृंगबेरपुरमें रहनेवाला दुर्दर्शी-नामका भिल्ल हूं. गुरुमहाराजन्केपास मेरा कछु बोल-नेका हय्, इसवास्तें जो आज्ञा मिलेगी तो अंदर आऊंगा.

विदू०— थांब. ( भारद्वाजाच्या समीप येऊन ) गुरु-महाराज, तो शृंगवेरपुरचा दुर्दर्शनामक भिल्लाधिपति आहे. त्याचें, "मला दर्शनास येण्याविषयीं आज्ञा असावी " असें ह्मणणें आहे.

भार०—अरे, सांग त्यास ये ह्मणून.

विदू०— ( पडद्याजवळ जाऊन ) या दुर्दर्शजी.

दुर्द०— ( प्रवेश आणि सर्वांस वंदन करून, त्याणीं दाखविलेल्या जागीं हात जोडून बसतो ).

भार० काय रे दुर्दर्शा, आज कसा वाट चुकून इकडे आलास हा ?

दुर्द०— महाराज, सच्चा देखा तो नसीबसें आया हूं! नहीं तो हमूकू इस्पांवका दर्सन कहांका? हमारा बिचार और ब्यापार जो हय् ओ दुनियामें महसूरय् हय्! इस्मेंबी नसीबनें गुरुमहाराजन्के चरन दिखाये! इस्पांवके आगे अबी इत्ती बिनती कर्नेकी हय्; अजोध्याजीका राजा ध्रुवसंधि जंगल्में सिकार कर्नेकू गयाथा, ओ उदरय् सिंहनें मारडारा! आगे उस्की छोटी रानी लीलावती; इस्का लढका सत्रुजित् उंबरसें बडा, इस्कारनसें ओय् अबी राजतखतपर बैठा हय्. जिस्वखत उस्कू राज मिला, उस्वखत वहांका बडा मंत्री बिदल्ल, ध्रुवसंधिराजाकी बडी रानी मनोरमा और उस्का छोकरा सुदर्सन इस्दोनोंकूबी मतलबसें निकालकर यहां गुरुमहाराजन्के आस्रम्में आया, और गुरुमहाराजन्नेंबी उस् सब्कू थारा दीया हय्! लेकिन् लीलावतीका पिता उज्जनदेसका अधिपति जुधाजित्, मनोरमा, सुदर्सन और बिदल्ल, इस् सब्कू मङ्नेवास्तें यहां आकर इस्

आस्रमके नजीकयू उतरा हयू. उसूनें सदर बिनती कर-नेंवास्तें मैंकू भेजदीया. आगे गुरूमहाराजन्की खुसी !

**भार०**— अरे दुर्दर्शा, तीं मनुष्यें अगदीं दीन हो-ऊन आमच्या आश्रमांत आलीं असतां, आह्मीं त्यांस कसें डांकावें? तूंच पहा बरें. याकरितां युधाजितास सांग; आमचे आश्रमाच्या बाहेर तूं मुखत्यार होतास, परंतु आतां आलास तसा मुकाट्यानें परत जा.

**माधव**— अरे दुर्दर्शा, तू त्यास समजावून सांग कीं, आतां तुला तीं मनुष्यें प्राप्त होतील अशी आशा तू अगदीं धरूं नकोस !

**कमलाकर**— आणि दुर्दर्शा, तू त्याला एथून निघून जाण्याविषयीं फारसा आग्रहही करूं नकोस ! अरे, अ-सल्या दुष्टानें गुरूमहाराजांच्या तप या मेघमंडळां-तील क्रोध ही विद्युल्लता एक वेळ पाहिलेली असावी, हेंही बरेंच आहे !

**भार०**—अरे कशाला इतकें पाहिजे ! जाऊं दे त्याला आपल्या वाटेनें.

**दुर्दर्श**– (पायां पडून) मैंकू आज्ञा होयगी महाराज ?

**भार०**—बरें आहे.

**दुर्द०**— (आपल्या दोघां हस्तकांसह निघून जातो).

( इतक्यांत मंत्री आणि सेनापति यांसह युधाजित् प्रवेश तसेंच शिष्यांसह भारद्वाजास वंदन करून, त्याणें दाखविलेल्या जागीं हात जोडून बसतो, तसेच त्याच्या उजव्याकडे मंत्री आणि डाव्याकडे सेनापति असे दोघे बसतात ).

**भार०**—युधाजिता, कुशल आहे कीं ?

**युधाजित्**—मुनीश्वरमहाराज, अयोध्येचा वृत्तांत गुरुमहाराजांस विदित असेलच; याखेरीज मनोरमा वगैरे आह्मांस मिळाले ह्मणजे सर्व क्षेम आहे. पण याविषयीं आपण शबरपतीपाशीं चांगलेंसे उत्तर केलें नाहीं. तर आपण आमची ही गोष्ट ऐकिलीच पाहिजे.

**भार०**—अरे युधाजिता, एखाद्यानें परोपकारार्थ दीन अनाथ अशा मनुष्यांस अभयपूर्वक आश्रय दिल्यानंतर, कोणी घातक प्रबल पुरुष जरी त्या मनुष्यांस आपल्या ह्मतून घेण्याकरितां प्राप्त झाला, तरी तो आश्रय देणारा आपलें बौद्ध[1] आणि शारीर[2] असें द्विविधही[3] बल खरचल्यावांचून दुसऱ्याच्या हातीं देणार नाहीं! हें कसें तूं अगोदर मनांत आणिलें नाहीं?

**युधा०**—मुनिमहाराज, ही गोष्ट खरी आहे; परंतु बलाढ्याशीं दाली बांधणें, हें केवळ मृत्यूचें द्वार! असें असून कोणी अविचारी त्या द्वाराचा आश्रय करील तर आपला सर्वथा नाश करून घेईल. याकरितां ऋषीश्वरा, आपल्यासारख्या संभावितांनीं त्या घातक द्वाराचा अवलंब करणें योग्य नव्हे! याकरितां आपण निमुटपणें सुदर्शन वगैरे यांस आमच्या हवालीं करावें, हें बरें. नाहीं तर आह्मी नेणारच, पण त्यांत आपली प्रतिष्ठा रहाणार नाहीं.

**भार०**—युधाजिता, अरे तूं आपल्यास राज्यकर्ता ह्मणवितोस, परंतु तुझी बुद्धि आजूनही फारच अपरिपक्व[4] आहे!

**युधा०**—मुनिमहाराज, आतां हा विनोद पुरे. मुकाट्यानें देतां कीं नाहीं, हें समजूंद्या लवकर!

---

1 बुद्धीचें. 2 शारीरांतील. 3 दोन प्रकारचेंही. 4 कच्ची. 5 थट्टा.

भार०—( किंचित् क्रोधानें ) मूर्खा युधाजिता, अरे हा सर्व विनोदच, असें समजणाऱ्या तुझ्याशीं भाषण करणें अयोग्यच! परंतु तू झाला आहेस लोभांध, ह्मणून तुला एक वेळ सावध करितों. अरे, आमची तृणकुशलताच खरी, परंतु ती तुझ्या रणकुशलतेला तृणप्राय मोजिते आहे बरें! यास्तव,—

पद—( राग कामक्रोध )

नकोआग्रहाला पडूंभूमिपाला ॥ मीनदेइनकदापिहि मुलाला ॥ नको० ॥ ध्रु० ॥ जायपूर्वींवसिष्ठाचिया आश्रमीं गाधिसूनुश्रमीकरुनित्याला ॥ सोडितोसुरभिलाकोपतिजलाआला मारतीणेंदिलापळुनिगेला ॥ नको० ॥ १ ॥ तीअवस्थातुलाप्राप्तहोइलखला कोप आणिशिमलाहाकशाला ॥ तोहिम्यांभक्षिलातूहिसंरक्षिला भेटवामाक्षिलाजाघराला ॥ नको० ॥२॥२५॥

ऐकिलेंस युधाजिता? या माझ्या भाषणाविषयीं प्रधानासहवर्तमान तू पुरता विचार कर. घाबरूं नकोस. सावकास कां होईना. आणि आह्मी आतां माध्यान्हिक स्नान करून येतों तोंपर्यंत कोणी एथून हालाल किंवा पळून जाल, तर मात्र तुह्मांला फार जड जाईल आँ! खबरदार संभाळून असा! ( शिष्यांसह निघून जातो. )

युधा०—( भारद्वाजाचे वचनाच्या दर्पानें भ्याल्यामुळें खिन्न होऊन ) चित्रतंत्रजी, कसें करावें? भारद्वाजांनीं जरब तर फार दिली! ( धुसकारा टाकितो. )

---

१ दर्भ. २ कसपटाप्रमाणें. ३ विश्वामित्र. ४ कामधेनूला. ५ सुन्दर नयनेला ( तात्पर्य, भार्येला ).

**चित्रतंत्र**—महाराज, विचारावें काय? हे तपोधन जे आहेत, यांच्याशीं विरोध करणें सर्वनाशहेतु होय! पहा बरें. विश्वामित्र केवढा जबर्दस्त वीर आणि किती त्याचें सैन्य, तसेंच केवढें ऐश्वर्य, परंतु वसिष्ठांशीं विरोध केल्यापासून त्याला जें संकट आलें, त्यांतून तो जगला हें त्याचें पुनर्जन्म झालें!

**युधा०**—ह्मणूनच ह्मणतों, एक निश्चय करा कोणता तो, इतक्यांत भारद्वाज येतील! तर तुह्मी भारद्वाजांस विचारून या. मी आश्रमाच्या बाहेर बसतों. (सेनापतीसह निघून जातो).

**विदू०**—प्रधानजी, भली खोकडी गुंगली! नाहीं तर या तुमचे राजाच्या इतक्या नाकांत काड्या घातल्यावर? अग बय्या ३! लागलाच बिथरलेल्या लांडग्यासारखा चवताळून अंगावर गुर्कावता! परंतु वाघाच्या वासानें डुक्कर जसा गांगरतो, तसा भारद्वाजांचे भाषणाच्या दर्पानें गर्भगळीत होऊन हा भोळ्या भाविकाप्रमाणें लागलाच पळून गेला.

**चित्रतंत्र**—वनचरा, खरें बोललास. अरे, समुद्रासारखे गंभीर हे मुनि, ह्मणूनच राजानें अशा अवस्थेंत तरी असून ही वेळ पाहिली! आणि प्रत्यक्ष भारद्वाजांपुढें, "तुमची प्रतिष्ठा राहणार नाहीं." असें बोलूनही प्राणसंकट अनुभविलें नाहीं!

(इतक्यांत दोघां शिष्यांसह भारद्वाज प्रवेश करून पूर्ववत् बसतो, आणि चित्रतंत्र व विदूषक आधीं उभे राहून, नंतर बसतात.)

**भार०**—(किंचित् हांसून) कां प्रधानजी, कसा

काय तुमचा विचार ठरला? आणि युधाजित् कोठें आहे? त्यास आणवा.

**प्रधा०**— वनचरा, राजेसाहेबांस घेऊन ये.

**विदू०**— ( निघून जातो आणि राजा सेनापति यांसह येतो, नंतर राजा वगैरे पूर्ववत् बसतात ).

**युधा०**— ( हात जोडून नम्रतेनें ) महाराज, या चरणांशीं विरोध करण्यास कोण समर्थ होईल? आतां आह्मांस आज्ञा असावी!

**भार०**—बरें आहे. परंतु युधाजिता, ईश्वरानें कृपा करून तुला आपल्या कल्याणाच्या साधनास केवढी सामग्री दिली आहे ही! ती बाबा, उन्मत्तपणानें व्यर्थ घालवूं नकोस. अरे, "रोजगारांत कर्ज आणि तारुण्यांत व्याधि, मग सुख तें लागावें कधीं?" अशी वृद्धांची ह्मण आहे; तिजप्रमाणें ऐश्वर्य हें रोजगाराच्या, तसेंच मनुष्यजन्म हें तारुण्याच्या स्थानीं आहे, यांच्या योगें-करून सर्वांस परमसाध्य काय तें आत्मज्ञान! परंतु त्याच्या साधनाकडे लक्ष न देतां मूढ मानव क्षणिक अशाही ऐहिक सुखाला भुलून डोळेझांक करितात, हा अनर्थ नव्हे काय? अरे, आयुष्य मुळींच अगदीं स्वल्प! त्यांतही निद्रादिकांचा काल जाऊन जागृदवस्था कितीशी राहणार? आणि तीही वंचक विषयांकडे खर्चावी! अरेरेरेरे!! तर बाबा हो, आयुष्यांतील मागला काळ कसा झटकर गेला, हें मनांत आणून पहा बरें; आणि पुढीलही असाच जाणार; यास्तव असें समजावें कीं, क्षणोक्षणीं आयुर्हानि ही आपल्या नांदत्या घराला निर्बाध आग लागली आहे. तर त्या घरांतून बिनडाग

बाहेर निघण्याची वाट धरावी; किंवा त्यांतच निजून झोंप घ्यावी! असो; युधाजिता, तू जोंपर्यंत स्वप्नावस्थेंत असल्यासारखा ऐहिक सुखाच्याच रंगांत दंग आहेस, तों पर्यंत तुला हा उपदेश गोड लागणार नाहींच, पण लक्षांत ठेवशील तर प्रसंगीं उपयोग होईल!

**युधा०**—( हात जोडून ) मुनिमहाराज, "थोरांचा विरोधही कल्याणकर" असें प्रौढ लोकांचें ह्मणणें आहे, त्याचा हा मीं अनुभवच घेतला! ( त्यास वंदन करून ) आतां आह्मांला आज्ञा होईल?

**भार०**—बरें आहे. तुह्मांला मार्ग सुखाक्रमणीय होवो.

**युधा०**—( मंत्री सेनापति यांसह पुन्हां त्यास वंदून निघून जातो. )

**भार०**—( माधवाकडे ) माधवा, युधाजिताचा स्वभाव किती उग्र रे हा!

**माधव**—खरें आहे महाराज. तो केवळ कृष्ण सर्पच; परंतु गुरुचरणांनीं गरुड असूनही त्याला वाटेस लाविलें, हें उभयपक्षींही चांगलें झालें!

**भार०**—माधवा, प्रस्तुत सुदर्शनाचीं कांहीं चमत्कारिक चिन्हें तूं लक्षांत आणिलीं आहेत काय? आतां त्याचें वय ह्मटलें तर व्रतबंध देखील झाला नाहीं इतकें थोडें, पण आलीकडेस मी पाहतों तों त्याची मुखश्री काय! नेत्रांत तेज कितीं तर्तरीत! त्याची वाणी ऐकून वाटतें कीं, भूलोकीं हा एक बृहस्पतीचा अंशावतारच झाला! या प्रकारची त्याची धारणाच विलक्षण! तर असें अद्भुत गुणैश्वर्य याला प्राप्त होण्यास कांहीं तरी असाधारण हेतु झाला असावा!

माधव– गुरुमहाराज, खरें आहे! मी देखील याविषयीं वहुत दिवस मनांत आश्चर्य करितों आहें!

कमलाकर– त्याचे सहचरांच्या[1] माहितीनें शोध केला ह्मणजे तसें कांहीं असेल तें समजेल, असें वाटतें!

विदू०–गुरुमहाराज, सुदर्शनाचे गुणैश्वर्याच्या[2] निदानाविषयीं[3] आपणही विचारांत आहां, पण तें मला ठाऊक आहे!

भार०–हां हां! भले शाबास. (माधवाकडे) माधवा, हा वनचर पराकाष्ठेचा धूर्त आहे बरें. (वनचराकडे) वनचरा, कसें काय तुला विदित आहे, सांग सांग!

विदू०–महाराज, प्रतिदिवशीं प्रात:काळची स्नानसंध्या आणि पाठ वगैरे झाल्यानंतर तपोवनांत सारे ऋषिकुमार अवस्थानुरूप यथेच्छ विहार तशींच भाषणें इत्यादि क्रीडा करितात, त्यांमध्यें विदल्लप्रधानांसहवर्तमान सुदर्शनही असतो. अशा नित्यक्रमाप्रमाणें एके दिवशीं ते तपोवनांत असतां कोणी एका तापसबटूनें, सुदर्शन वनवासी झाला याविषयींचें वर्तमान त्याजपासूनच समजून घेतल्या नंतर "विदल्ल हा वृद्ध मंत्री त्या प्रसंगीं असून त्याणें असें कसें होऊं दिलें," हें मनांत आणून,–

## लावणी.

चपलानें त्यामुनिपुत्रानें मंत्रिविदल्लाला ॥ अतिदुर्भाषणकेलेंसद्वा[4] ङ्मियुद्धमल्लाला ॥ दुर्भाषणगतअप्राकृत[5]

---

१ बरोबर वागणारांच्या. २ उत्तम गुण (हेंच जें) ऐश्वर्य याच्या. ३ मुख्यकारणाविषयीं. ४ उत्तम प्रकारचा संवाद हीच जी कुस्ती तिजविषयीं पैलवान. ५ प्राकृत भाषेंत येत नाहीं असा.

**हें अक्षरमंत्र असें ॥ मानुनि नृपसुत चिंतनिं त्याच्या सादर नित्य असे ॥ या योगानें पंचम वर्षीं सांग यजुर्वेदा ॥ आणिक जाणे नयशास्त्रासह समस्त तद्भेदां ॥ २६ ॥**

**भार०**—( आनंदानें ) अरे पण, ज्यामध्यें तें अक्षर आहे, असा तो दुर्भाषणांतर्गत शब्द कोणता तो सांग.

**विदू०**—( उठून जाऊन आणि ओणव्यानेंच तोंडास पदर लावून भारद्वाजाच्या कानांत तो शब्द सांगितलासें करितो. )

**भार०**—( आनंदानें ) शाबास शाबास वनचरा! भलें लक्ष पुरविलेंस! आणि आह्मीं स्पष्ट विचारिलें असतां गुप्त सांगून मंत्रशास्त्राची मर्यादाही राखिलीस, हें तुझें चातुर्य पाहून आह्मांस मोठा आनंद झाला! (माधवाकडे ) माधवा, तें अक्षर दुर्गेच्या महामंत्रांतील बीजविशेष होय. काय मंत्राचा प्रभव हा! अरे, तत्संबंधि एक बीज; तेंही व्यंग; अशाही त्याच्या अभ्यासानें हें फळ! धन्य आहे त्या जगन्मातेच्या करुणाशालित्वाची!

**विदू०**—गुरुमहाराज, काय सांगावें! तें अक्षर सुदर्शनाच्या कानीं पडण्याबरोबर त्याची अखीच फिरली! आणि तेव्हांपासून त्याचें सर्वप्रकारक तेज शुक्लपक्षींच्या चंद्रासारखें वृद्धिंगत होतें आहे!

**भार०**—( हर्षानें ) खरें आहे. असें बलवत्तर[1] कारण असल्याखेरीज एवढा प्रकाश कसा पडेल! ( माधवाकडे ) माधवा, हा सर्व वृत्तांत समाधिद्वारा मला विदित होता, परंतु साऱ्यां विद्यार्थ्यांच्या मनांत येईल कीं, "या गुरुजींनींच सुदर्शनास कोणत्या तरी अद्भुतवि-

1 फार बळकट.

द्येचा उपदेश केला, आणि आह्मांला नाहीं." यास्तव या वनचराकडून बोलविला.

**माधव**— ( विस्मित होऊन. ) सत्य आहे महाराज. नाहीं तर मला मोठें आश्चर्य वाटलें! अशा गोष्टीविषयीं गुरुमहाराज दुसऱ्याला विचारितात, हें ह्मणावें तरी काय! परंतु आतां सारें सुसंगत आहे.

**भार०**—पण माधवा, कोणाला तरी पाठवून सुदर्शन वगैरेस इकडे आणीव बरें.

**माधव.**—आज्ञा. ( विदूषकाकडे ) अरे वनचरा, जा लवकर; आणि सुदर्शन, मनोरमा तसाच विदल्लप्रधान यांस घेऊन ये.

**विदू०**— ( हात जोडून ) आज्ञा. ( निघून जातो ).

**कमलाकर.**— ( भारद्वाजाकडे ) गुरुमहाराज, हा वनचर मोठा कुशलबुद्धि आहे.

( इतक्यांत विदूषक, सुदर्शनादिकांस घेऊन पडद्याच्या आंतल्या बाजूस येतांच. ) सुदर्शनमहाराज, एथेंच उतरा. रथ पुढें जाणार नाहीं. ( बाहेर येतो ).

**भार०**—( हर्षभरानें सगद्गद हांसून. ) अरे, सुदर्शन रथांत बसून आला! अरे, रथ कोठला!

**विदू०**—( हात जोडून ) गुरुमहाराज, आपण दिव्यदृष्टीच आहां, परंतु या वेळेस सुदर्शनराजाकडे पाहण्याची आमची ताकद नाहीं! आजचें त्याचें तेजच अप्रतिम!

( इतक्यांत; किरीट, कुंडलें, कवच, डाव्या खांद्यावर धनुष्य, पाठीशीं बाणांचा भाता, उजव्या हातांत तलवार, असें धरून गंधाक्षत वगैरे सर्वालंकारांनीं विभूषित

असा सुदर्शन, मनोरमा आणि विदल्ल हे प्रवेश तसेंच सर्वांस वंदनही करितात. )

**भार०**—( आनंदानें आपल्या डाव्या बाजूस अम्मळ दूर हात दाखवून ) प्रधानजी, असे बसा. ( तसाच उजव्याकडे हात दाखवून ) मनोरमे, असें बसावेंस. ( सुदर्शनाकडे पाहून ) या सुदर्शनराज. ( त्यास आपल्या जवळ घेऊन मनोरमेकडे ) मनोरमे, आतां तुह्मांस शुभाशिर्वाद देण्याविषयीं साक्षात् जगदंबे दुर्गेनें मनावर घेतलें आहे! असें समजून आमचें चित्त भाररहित, इतकेंच केवळ नाहीं, तर आनंदमयही झालें! ( सुदर्शनाकडे ) अरे सुदर्शनराजा, आज तुझें नांव, जसें कांहीं वैकुंठनाथाच्या हातांतील सुदर्शन, तसें दाहीं दिशांस व्यापून झळकूं लागलें आहे! आतां तुह्मांस आह्मीं एथें राहून घेतल्याबद्दल जगन्माता तुह्मांकडून आह्मांस निःसंदेह यश देवविस्ये!

**सुदर्शन**—गुरूमहाराज, जगज्जननीनें जरी शुभाशिर्वाद दिले, तरी ते आह्मांस प्राप्त होण्याचें द्वार, गुरूरायांचें मुखकमल!

**विदू०**—गुरूमहाराज, "सुदर्शन राजांचें नांव दाहीं दिशांस व्यापून झळकूं लागलें." असें आपल्या मुखांतून निघालें, याचा कांहीं अनुभव आल्याविषयीं सांगतों.

**भार०**—( त्वरेनें ) अरे, सांग सांग कसें काय झालें तें!

**विदू०**—गुरूमहाराज, सुदर्शनराजे तपोवनांत विहार करीत असतां त्यांस साक्षात् दुर्गेनें आपलें प्रत्यक्ष दर्शन, आणि धनुष्य, बाण, कवच, खड्ग, इत्यादि अमोघ युद्धसाधनें देऊन, ( सुदर्शनाकडे हात दाखवून ) हा

जामानिमा तिणें आपल्या हातांनीं केला! आणि, (गुरु-महाराज, इत्यादि पुढें बोलणार तोंच)—

**भार०**—(आनंदभरानें डोळे मिटून) शिव शिव शिव! (सुदर्शनाकडे पाहून) सूर्यवंशांत जन्म घेतल्या अन्वयें कृतकृत्य झालास सुदर्शना!

**विदू०**—गुरुमहाराज, रथाचाही मोठाच चमत्कार झाला!

**भार०**—अरे, काय ह्मणतोस! तो कसारे?

**विदू०**—महाराज, सुदर्शनप्रमुख अयोध्येहून आड-मार्गानें इकडेस येत असतां त्यांचा रथ आणि सारें जवाहीर दुर्दर्शादिक भिल्लांनीं हिसकावून घेऊन यांस पदचारीच इकडेस लाविलें! परंतु महाराज, आतां तो दुर्दर्श, सुदर्शनराजांच्या दर्पानें भयभीत होऊन आप-ल्या अपराधाबद्दल क्षमा मागण्यासाठीं गुप्तपणें यांस शरण आला, इतकेंच केवळ नाहीं; तर,—

## साक्या.

**दुर्दर्शाभि[1]धशबरप[2]येउनि रिपुज[3]नभंजनवदला ॥**
**सुदर्शनातुजरक्षोद्वादर्श[4] विग्रहकंजनवदलों[5] ॥ २७ ॥**
**आणिकमाणिकमौक्तिकयुतरथ त्यादेउनिभवनाला ॥**
**गेलाअपुल्याशोभविनृपसुत हिवसंत[6]निभवनाला २८**

**कमलाकर**—(मनोरमेकडे) मनोरमे, आतां थो-डक्याच काळांत तुमचें नष्टचर्य निःसंशय सरतें बरें!

**मनो०**—(हात जोडून) तथास्तु.

**माधव**—(सुदर्शनाकडे) सुदर्शना,—

---

१ दुर्दर्शनामक. २ भिल्लांचा नायक. ३ शत्रुलोकांस शासन कर-णारा. ४ सूर्य. ५ कमळाच्या कोंवळ्या पाकळीला. ६ वसंतऋतूसारखा.

पद–( राग कालंगडा. )

तुजलागींसांगतोंभावीरंग ॥ ध्रु० ॥ ऐकसुदर्शना लाधसीराज्या ॥ अहितांचाकरुनीभंग ॥ तुजला० ॥१॥ यापृथ्वीमंडळींशोभसीतैसा ॥ आकाशींजैसापतंग ॥ तुजला० ॥ २ ॥ जगदंबेच्याकरुणासारें ॥ शूरत्वींबांधीशीचंग ॥ तुजला० ॥ ३ ॥ साधूजनांचातुजसीनिरंतर ॥ होईलसुखकरसंग ॥ तुजला० ॥ ४ ॥ सत्कर्मयोगानेंज्ञानसमुद्रीं ॥ होशीलबालादंग ॥ तुजला० ॥ ५ ॥ २९ ॥

**मनो**०– मुनिमहाराज, आपल्या भाषणास जगदंबा अनुकूल आहेच, तर त्याप्रमाणें अनुभव येऊन, ( सुदर्शनाकडे हात करून ) या दासाच्या हातून आपली सेवा घडो !

**भार**०– मनोरमे, तू लोकरीतीप्रमाणें बोललीस हें नीटच, परंतु साक्षात् परमेश्वरीनें तुझ्या पुत्राला किरीट, कुंडलें, कवच, धनुष्य, बाणांचा भाता, खड्ग, इत्यादि क्षत्रियाला अति अवश्य असे अलंकार आपल्या हातांनीं घालून सजविलें, हें ज्याचें अनुपम भाग्य, अशा या पुत्राच्या योगेंकरून तू धन्य आहेस ! आणि मोठमोठ्या तापसांनांही जिचें प्रत्यक्ष दर्शन दुर्लभ, ती आदिशक्ति स्वतः तुमचा सत्कार करिते आहे, तर यावरून समजा कीं, इतःपर तुह्मी सर्वत्र विजयी आहां !

**मनो**०– मुनीश्वरमहाराज, आज असा दिवस आमच्या दृष्टीस पडला, यास मुख्य हेतु, ( त्याच्या पायांकडे हात जोडून ) या चरणांचा आश्रय ; हें उघडच आहे.

---

१ शत्रूंचा. २ सूर्य. ३ करुणेच्या वृष्टीनें.

पण असा कल्याणकर हा आश्रय आह्मांस मिळण्याचें साधन, (विदल्लाकडे हात करून) आमच्या या विदल्ल-प्रधानजींचें इमान आणि चातुर्य !

**भार०—** खरें बोललीस मनोरमे. अशा घोरतर प्रसंगांत प्रधानजींनीं तुह्मांला सोबत देऊन; इमान, चातुर्य आणि धैर्य, यांची पराकाष्ठा करून दाखविली, यांत संशय नाहीं ! (विदल्लाकडे) प्रधानजी, तुह्मीं बहुत वर्षें राज्य सांभाळिलेंत; परंतु तत्संबंधि यशाहूनही प्रस्तुत-कृत्यसंबंधि तुमचें यश अधिकतर झालें, भले शाबास ! परमेश्वर तुमचें कल्याण करो ! असो, (मनोरमेकडे) मनोरमे, क्षत्रियांच्या व्रतबंधाचा मुख्य काळ जें अकरावें वर्ष, तेंच सुदर्शनाला प्राप्त झालें आहे, आणि याच्या योग्यतेस शोभेल, अशा थाटानें याचा व्रतबंध व्हावा; यास्तव आतांपासून त्याजविषयीं उपक्रम केला पाहिजे, असें मनांत आलेलें तुला कळविलें आहे. पहा याचा विचार करून.

**मनो०—** (गहिंवरून) गुरुमहाराज, आतां आह्मांला; देव, धर्म, आई, बाप, गुरु, आप्त, इष्ट, मित्र, यजमान, स्वजन, धन, इत्यादि सर्वांच्या ठिकाणीं, (त्यांच्या पायांकडे हात जोडून) हे चरण आहेत ! तेव्हां मला काय विचारायाचें आहे! आणि आपल्या मुखानें याला महामंत्रोपदेश झाला ह्मणजे तो आह्मांस इह लोकीं तसाच परलोकींही सुखकारक होईल!

**भार०—** (माधवाकडे) माधवा, या सुदर्शनाच्या व्रतबंधाचा समारंभ, सर्व ऋषी, राजे, संस्थानिक आणि राष्ट्रांतील संभावित, यांचा समाज मिळून जसा अयो-

ध्येंत व्हावयाचा, त्याप्रमाणेंच एथें व्हावा; असें मनांत आल्यासारखें मोठमोठे मंडप, तशींच भांडीं, इत्यादि सामग्री जमविण्याविषयीं सर्व राजेरजवाडे यांस सूचना होऊन सारी सिद्धता होण्यास बराच काळ पाहिजे, यास्तव चला; आतांपासूनच याचा उद्योग करूं! ( उभा राहतो ).

**सर्व**— ( लगबगीनें उठून उभे राहतात ).

**माधव**— ( उठतां उठतांच ) बहुत उत्तम!

**सर्व**— ( भारद्वाजाबरोबर निघून जातात ).

---

## अंक ५ वा.

### पात्रें १३.

१ **मंगलायन**...... उपाध्यायाचा हस्तक.
२ **बकुलमंजरी**.... पद्मावतीची दासी.
३ **विदूषक**........ एक हास्यकारी.
४ **पद्मावती**....... सुबाहुराजाची स्त्री.
५ **कंचुकी**.... .... तिचा भालदार.
६ **अनुष्ठिति**...... उपाध्यायाची स्त्री.
७ **सिद्धविद्या**..... तिची कंन्या.
८ **शशिकला**. .... सुबाहुराजाची कंन्या मुख्य नायिका.
९ **सुबाहु**. ........ काशीदेशाचा राजा.
१० **कंचुकी**........ त्याचा भालदार.
११ **न्यायसागर**..... ,, मंत्री.
१२ **शार्दूलध्वज**..... ,, सेनापति.
१३ **विद्याधरमिश्र**.. एक तापस ब्राह्मण.

## स्थल काशीनगरींतील राजमंदिर.

( तदनंतर डाव्या हातांत बेल, फुलें, तुळशी इत्यादि पूजासंभारानें भरलेली करंडी, उजव्या हातांत जलपूर्ण कमंडलु, आणि बगलेला आसनाची वळकटी घेऊन मंगलायन प्रवेश करितो ).

**मंगलायन**– ( चपापून, आपल्याशीं ) अहो, आज रोजच्याहून रात्रि अधिक राहिली आहे, त्यांतही आकाशामध्यें मोठा मेघ आल्यामुळें फार काळोख पडला आहे, आणि मी एव्हांच निघून आलों; हा अविचार झाला! कोण आंधेर हा! ( आसमंतात् बागेकडे तसेंच आकाशाकडेही पाहून ) अरेच्चा! मी भूमीवरच असून, अति दाट अशा काळोखानें; जमीन, झाडें, घरें, आणि आकाश, हीं पृथक् दिसतच नाहींत! यामुळें आभाळांत उडून गेलों आहें कीं काय, असा मला भास होतो; याकरितां,—

### अपरवक्त्रं.

[1]उपवनभुवमत्रपुष्पव द्रुचिरहितांदिवमेवमानसं ।
कलयातिनवमेघमुत्थितं तदुदकदंबतमेघमेवच ॥ ३० ॥

---

१ एथें पुष्पवद्रुचिरहित ( प्रशस्तपुष्पाच्या वृक्षाचें चिरकाल हित करणारी ), अशा उपवनभूमीला माझें मानस, दिव् ( आकाश ) असेंच समजतें! कारण तें आकाशाही या समयीं, ( चंद्र मावळून गेला आणि सूर्य आजून उगवला नाहीं म्हणून ) "पुष्पवद्रुचिरहित" ( सूर्यचंद्राच्या कांतींनीं रहित, असें ) आहे. आणखीं या, उदकद ( उदकवृष्टि करण्यास समर्थ ) तात्पर्य सजल; ( काळा भोर ) अशा ( आकाशामध्यें ) प्राप्त झालेल्या तरूणमेघाला, तें निश्चयेंकरून माझें पापच, असें समजतें! कारण, पापहीं; "उदकद" ( कं सुखं. अर्थात् अकं दुःखं. उच्चैः अकं ददातीति उदकदं. तात्पर्य, झपाट्यानें

( किंचित् विचार करून ) असो, झालें तें झालेंच; परंतु आतां एथेंच क्षणभर अवकाश करावा हें नीट. उगीच उतावळी करून ठेंचा लागल्या अथवा एकाद्या नाल्यांत पडलों ह्मणजे त्यांत कोणती शोभा ! ( सारें खालीं ठेवून रस्त्यावरच बसतो ).

• ( इतक्यांत पद्मावतीची दासी बकुलमंजरी त्याच वाटेनें प्रवेश करित्ये )

**बकुलमंजरी**– ( भीतीनें आसपास पहात पहात पुढें येऊन आंधेरांत मंगलायनाला अर्धवट पाहिल्यामुळें तेथेंच दबकून कांपऱ्या स्वरानें ) अरे देवा रे ३ !

**मंगलायन**– ( तिचा कांपरा आणि घाबरट स्वर ऐकतांच दचक्यानें उभा राहून मागें पाहतो )

**बकुल०**– ( तो उठला असें दिसून येतांच मटकर बसून नंतर दोहों हातांनीं आपलें डोचकें धरून कांपत कांपत ) तरी मीं आईसाहेबांस ह्मटलें, रात्र पुष्कळ आहे ! त्यांतही काळोख ! पण आतां काय करूं ! माघारीं तरी कशी जाऊं !

**मंगला०**– ( तिचा स्वर ऐकिल्यावरून ती कोणी तरी परिचितच असावी असें लक्षांत आणून हळुहळू तिजकडे येऊं लागतो ).

**बकुल०**– ( तो आपल्याकडेसच येतो, असें समजून मोठ्यानें ) अगो बाई गे !

---

दुःख देणारें असें ) आहे. आतां कं हें अव्यय आहेच; आणखीं—"कंशीर्षसुखतोयेषु कशब्दःस्यात्रिलिंगकः" असा एकाक्षरी कोशही आहे. याविषयीं प्राचीन उदाहरण "॥ स्तनमंडलमाश्रित्य नखरयवरयोषिताम् ॥ कदाकर्णयतेगीतं रमयासहरंगराट् ॥" या कूटांत "कद" असें मेघाला संबोधन आहे.

**मंगला०**— ( तर्कानें ) कोण आहे ती; बकुलमंजरि, भिऊं नकोस. मी मंगलायन आहें. अगे, तूं बायको मनुष्य ! इतक्या अंधेराची कोणीकडे निघालीस ही ?

**बकुल०**— ( लांब धुसकारा टाकून कांपत कांपत ) मंगलायनमहाराज, आपण आहां काय ? अगे बाई बाई बाई बाई ! मी काय भ्याल्यें बरें का, ह्मटलें आतां ही जन्माची अखेरच !

**मंगला०**— वेडी आहेस ! अगे, महापुण्यवान् सुबाहुराजा; त्याचा बगीच्या हा, यांत कोणी घातक प्रवेश करितील काय ? छे३ : ! तेवढी काळोखाची मात्र अडचण खरी. तरी तो आतां कितीं कमी झाला ! मघाच मी आलों तेव्हां केवढा मोठा ढग आला होता ! तो काळोख तू एथें पाहतीस तर ? लागलीच धडपडतीस ! आतां आभाळ कितीं स्वच्छ झालें ! ( पूर्वेकडे पाहिलेंसें करून ) आणि पहा तो कसा चकचकीत शुक्राचा तारा उगवला आहे, तेव्हां आतां लवकरच सूर्योदय होईल ! रात्र अगदीं थोडी राहिली आहे.

**बकुल०**— मंगलायनजी, माझ्या पोटांत जी धडकी भरली आहे, ती आजूनही बाहेर जात नाहीं !

**मंगला०**— असो; पण तू अशा वेळेस निघालीस कोणीकडे ?

**बकुल०**— तें काय विचारितां महाराज, श्रीमंतांच्या तब्वेती ! अम्मळ कपाळ दुखूं लागलें कीं, लागलाच, ठां, ठां, ठां, ठां, शेपन्नास खलबत्त्यांचा बाज्या सुरू झालाच ! तशीच शहरांतील साऱ्या वैद्यांच्या जिवाची तारंबळ ! आणि कांहीं ठिकाणीं केरांत मुसळ ! अहो,

काय सांगावें महाराज, लेंक लाडकी लाडकी ह्मणून घरीं का ठेवायाची आहे! कधीं कां होईना, ती कोणास तरी द्यायाचीच वस्त नां? पण त्याला कांहीं तरी मर्यादा! आतां शशिकलाबाईस सारें पुर्त्तें समजूं लागलें, तिचें दिवसानदिवस मी एकेक लक्षण पाहयें आणि माझ्या पोटांत धस्स् होतें! असें असून; तिच्या प्रत्यक्ष आईच्या अद्याप कांहीं लक्षांत येईना, याला काय ह्मणावें बरें? आतां आह्मीं ताबेदारांनीं असल्या गोष्टीची चाटाचाट करावी; हें तरी नीट दिसतें? पण काय सांगावें; मंगलायनजी, तुह्मी पुरूष; तुह्मांपाशीं मला फार बोलतां येत नाहीं! पण शशिकलाबाई काल सकाळची निजून उठल्यापासून जी बावरली आहे, त्याला कांहीं ताळ नाहीं; ह्मणजे पहा! तरी तें थोरांचें लेंकरूं, ह्मणून सोशितें; इतकेंच. तथापि एथें काय! "वडाची साल पिंपळाला!" आमच्या आईसाहेब पद्मावतीबाई; यांचें चित्त कोणीकडेस! त्या ह्मणताहेत, "इला पिशाच्याचा झपाटा झाला! असें ह्मणून अंगारे धुपारे काय! भालदोऱ्या काय! तोडगे काय! कोंबडीं बकरीं ओंवाळून टांकणें काय! परंतु हा कोणत्या पिशाच्याचा झपाटा, आणि याचा पंचाक्षरी कोण; हें यांस कळूं नये काय? अहो, त्यांणीं आह्मांतून कोणालाही साऱ्या रात्रींत झोंप लागूं दिली नाहीं ह्मणजे पहा! तूं अमक्याकडे अंगाऱ्यास जा, तूं नाडापुरीस जा, तूं वैद्याच्या घरीं जा, तूं पंचाक्षऱ्याच्या एथें जा, मारून दाणादाण! पण आपला चाकरीचा पेशा; तक्रार करून उपयोग आहे? ह्मणून सुंदरवाडींतील एकवीरेचा अंगारा आणायास मी निघाल्यें आहें.

**मंगला**— वकुलमंजरि; खरें बोललीस, परंतु आतांशा तिच्या विवाहाविषयीं राजाकडून कांहीं उपक्रम झाला आहे. तरीही धीरे धीरे, श्रीमंती खटला! मला प्रस्तुत हें अनुष्ठानही; तिला उत्तम पति मिळावा, अशासाठीं तत्संबंधिच आहे. (देउळाकडे हात दाखवून) या मोतींबागांतील मंगलादेवीची पूजा, कांहीं जप, कांहीं स्तोत्रपाठ, असें चालविलें आहे, तथापि तू ह्मणत्येस सुस्ती; ही खरीच! शशिकलेच्या शरीरामध्यें तें तारुण्याचें तेज स्पष्ट दिसूं लागलें! मीही मंगलादेवीचें तीर्थ; अंगारा; प्रसाद; इत्यादि द्यावयास प्रतिदिवशीं तिच्या मंदिरांत जातों, त्या वेळेस तिचे कटाक्ष, मुखमुद्रा इत्यादिकांचा स्वाभाविक झोंक पाहतों, तो काय विचित्र! अगे, तिच्या तारुण्याचीं लक्षणें परिपूर्णंच झालीं आहेत! आतां तू न का बोलेनास, पण सारें पाहिलेलें मीच तुला सांगतों. अगे, तिच्या,——

## मंदाक्रांता.

थोडाथोडावलययुगुलाकार[1]वक्षःस्थळाला[2]
स्तोकस्तोकें[3]प्रचपलपणादृष्टिलीलेसिआला ॥
किंचित्किंचित्सकलतनुं[4]लामार्दवें[5]प्राप्तझालें
वारंवारस्मर[6]वसुनियात्याशरीरांतडोले ॥२१॥

असो, सारांश; देवाच्या दयेनें तिला उत्तम पति मिळावा आणि त्यासाठीं श्रम करणारे तुह्मी आह्मी यांस यश यावें!

---

१ दोहों वर्तुळांचा आकार. २ उराला. ३ थोडथोडा. ४ साऱ्या-शरीरास. ५ मऊपणा. ६ मदन.

**बकुल०**—होय इतकेंच. पण दैवयोगानें तसा अनुभव येईल तेव्हां खरें! ( आसमंतात् पाहून ) असो; मंगलायनमहाराज, आतां मी जातें. बरेंच दिसायास लागलें. नाहीं तर उशिर झाला ह्मणजे आणिक वरतें दर्काटणें! तेव्हां आपल्या बुद्धाप्रमाणें भिऊन वागावें, हें नीट.

**मंगला०**—बकुलमंजरि, खरें बोललीस; परंतु थोडकें सांगतों. मी नित्यशः पहांटेच्या तीन घटिका रात्री प्रायः याच वाटेनें देवालयांत जातों, आणि सायंसंध्या करून तीन घटिका रात्र होतांना परतही येतों. परंतु आज रात्र अधिक तसाच काळोखही फार होता, त्यांत तुझी गांठ पडली. अशा कारणांनीं मीं आज हें बालोद्यान चांगलें पाहिलें. अहाहा! काय या आरामाची रमणीयता, वाहवा रे वाहवा!

**बकुल०**—( चहूंकडेस पाहून, लगबगीनें ) महाराज, ह्या बोलण्याचे नादांत आपणा दोघांसही उशीर जाहला, तर चलतें मी आतां. ( त्यास वंदून निघून जाते ).

**मंगला०**—( आपलें सामान घेण्याकरितां अम्मळ ओणवूनही पुन्हा उभा राहतो, आणि कमरेवर दोहोंकडेस दोनी हात ठेवून आपल्याशीं ) काय ही बगीच्याची अद्भुत शोभा! जिला पाहण्याचें सोडून मला जाववतच नाहीं! अहाहा! कसे हे तऱ्हेतऱ्हेचे बंगले! आणि तशाच हवेल्या, तशींच कारंजीं, तसेच हौद, तसेच पुष्पवृक्ष, तसेच तटाक, तशाच वापी, तशींच सरोवरें आणि त्यांत भ्रमरगुंजारवविराजमान कमलवनें, तसेच आंबे; बकुळी; सोनचाफे; इत्यादि फुललेले मोठ-

मोठे वृक्ष, तसेच हंस; मयूर; इत्यादिक पक्षी, वाहवा रे वाहवा! अशा स्थळीं प्रियजनांसहित वारांगनांचें नृत्य; गीत; इत्यादि सुखकारक विषयांचा अनुभव घेणारे, या भूतलावरील केवळ गंधर्वच होत! तरीच हें सारें क्षणिक असें समजत असतांही विषयी लोकांच्या चित्ताचा या विषयजालांतून पाय निघत नाहीं, तो का उगीच! असो; हें जरी असें गोजिरवाणें दिसतें, तथापि सारी फसगपत!

(इतक्यांत विदूषक प्रवेश करितो).

**विदू०**— (त्याजपुढें हात जोडून) भले महाराज! आपलें सद्विचाररूप सर्व भाषण मी ऐकिलें. (सुसकारा टांकून) धन्य आहा! आणखीं काय बोलावें?

**मंगलायन**— (डोळे उघडून) नमस्कार महाराज. (त्याला नमस्कार करून) आपण कोण; हें मी समजलों नाहीं, पूर्वींचा कांहीं तसा संबंध असल्यास क्षमा असावी.

**विदू०**— नाहीं नाहीं. पूर्वींचा कांहींएक संबंध नाहीं. माझें एथें येणें सुद्धां अपूर्वच[1] आहे. मी आहें वनचर. बहुत वर्षें भारद्वाजमुनींच्या आश्रमांत होतों. तेथें कांहीं माझें नातें गोतें नाहींच, परंतु ती पुण्याश्रमलीला सामान्य मनुष्यांस देखील कशी आहे; जशी मुंग्यानां साखर! याचा अनुभव हाच कीं, मी आठ दहा दिवस तेथें रहावें; असें योजून गेलों तों दहा वर्षांनीं तेथून निघालों ह्मणजे पहा! नंतर प्रयागक्षेत्रीं मकरमास घालविला, आणि आपल्या या महाक्षेत्रांत काल रात्रीं येऊन (तिकडे हात दाखवीत) त्या धर्मशाळेंत राहिलों होतों.

---

१ पहिल्यानेंच.

**मंगला०**—बरें; पुढें कसा काय बेत काहे?

**विदू०**—आतां एथील राजमंदिरांत प्रवेश करावा अशी इच्छा आहे!

**मंगला०**—ठीक; बहुत उत्तम. तुह्मी गृहस्थ आहां कीं भिक्षुक?

**विदू०**—अहो, तें कांहीं नियमाचें नाहीं. जसा प्रसंग पडेल तसें, परंतु प्रस्तुत भिक्षुकच असावें, असा निश्चय केला आहे; आणि या राजधानींत भिक्षुकी खात्यावरील मुख्य अधिकारी मंत्राकर[1] दीक्षित, तसेच त्यांचे प्रिय शिष्य मंगलायनजी ते आपण, अशी माहिती मिळाल्यावरून आपणाकडेस आलों आहें.

**मंगला०**—ठीक. तुह्मी मोठे चतुर दिसतां. तुह्मांला दुसऱ्या द्वाराचा अवलंब करणें नकोच; ह्मणून ह्मणतों, थोडासा अवकाश करून कचेरींतच जा; ह्मणजे तेथें राजेसाहेब, मंत्राकरजी, सारे कारभारी तसेच मुत्सद्दी या सर्वांची भेट होईल. मला या वेळेस येण्यास सवड नाहीं, कारण कांहीं अनुष्ठान करण्याकरितां (देवळाकडे हात करून) त्या देवालयांत जावयाचें आहे.

**विदू०**—ठीक आहे. सावकाश कां होईना. मला कांहीं पोटाविषयीं तोटा नाहीं! पहा पाहिजे तर माझ्या खिश्शांत; ज्यामध्यें खोटा अंश मुळींच नाहीं, असा दोन हजारांचा नगनगोटा आहे. आणि मी थोटा पांगळा तर नाहींच, पण हा छोटासा जोटाचा आंगरखा वगैरे गबाळ पाहून, मला कोणी उगीच धमकावील, याकरितां (देउळाकडे हात दाखवून) त्याच

---

1 मंत्रांची खाण.

देवालयाचे कोटाच्या दरवाजापाशीं तो मोठा ओटा दिसतो; त्यावरील खडागोटा बोटांनींच झाडून तेथें; सोटा लोटा, फेटा दुपेटा ठेवून जरासा घोटा पितों. इतक्यांत तुमचें आटोपलें ह्मणजे बरोबरच जाऊं.

**मंगला०**— छे छे. मला फार अवकाश ! मी सायंसंध्या करून परत येणार. ह्मणून ह्मणतों, तुह्मी कचेरींत जा, अथवा आधीं आमच्या मंत्राकरदीक्षितांच्या वाड्यांत जा, असो, पण या समयीं तुह्मी आलां हें फार चांगलें झालें ! कारण राजकन्येच्या विवाहाचा थोडासा उपक्रम झाला आहे.

**विदू०**— ठीक आहे. बरें, पुरोहितांची गांठ केव्हांशी पडत असते ?

**मंगला०**— अहो, ते नऊ वाजतां प्रातःकृत्य आटोपून बाहेर येतात.

**विदू०**— हां हा ? मग नीट आहे !

**मंगला०**— झालें आतां ? चलतों तर मी.

**विदू०**— बरें आहे. मीही निघालोंच हा.

**मंगला०**— ( निघून जातो ).

**विदू०**— ( जाण्याकरितां निघतो, इतक्यांत पडद्याचे आंत ) निगारखे मेहेर्बा३न् आस्ते३. कदम् मुलाजां३. ( असा शब्द झाल्यानंतर कंचुकी बाहेर येतो ).

**कंचुकी**— ( विदूषकाकडे ) अजी बम्मनदेवजी, अंदरसें आईसाबमहाराजन्की सवारी आती हय्, तो जरा तफावतसें जाईये महाराज. ( हात जोडतो ).

**विदू०**— ( चटकर दुसऱ्या वाटेनें निघून जातो ).

( इतक्यांत मंत्राकरपुरोहिताची स्त्री अनुष्ठिति, तशी-

च कंन्या सिद्धविद्या[१], यांसहवर्तमान राजस्त्री पद्मावती प्रवेश करून, डाव्याकडे सिद्धविद्येस आणि उजव्याकडे अनुष्ठितीस बसवून आसनारूढ होत्ये ).

**अनुष्ठिति**– ( पद्मावतीकडे ) महाराज पद्मावतीबाई, आज आपणांस फारच खेद झाला आहे, असें आपली ही रंजिस चर्या पहातांच उघड दिसून येतें ! पण इतकी खिन्नता होण्याचें काय कारण झालें बरें ?

**पद्मावती**– तुह्मीं बोललां हें सारें खरें आहे अनुष्ठितीबाई, ( धुसकारा टाकून ) अहो, देवाच्या दयेनें आह्मांला आज कांहीं एक कमी नाहीं, परंतु शशिकलाबाईनें कालपासून आमच्या तोंडचें पाणीच पळविलें आहे; ह्मणजे पहा ! आतां तिला व्याधि असो किंवा पिशाचबाधा असो ती कांहीं फारशी नाहीं; पण बाई, तिची चित्तवृत्ति अगदींच बदलली ! आतां ल्हान का बरें ही ? असें असून तिणें एकाएकीं दमच सोडिल्यासारखें केलें आहे ! हें केवढें संकट, तुह्मीच पहा बरें. आतांशा तिच्या स्वयंवरसमारंभाची सुरवात झाली आहे, आणिं इकडेस तिची प्रकृति बिघडण्याची तर वाढती कळा ! हेंही असो. पण अनुष्ठितीबाई, ( गहिंवरून ) आह्मांला मुळीं ही एकुलती एक कंन्या ! यास्तव तिची उदास वर्तणूक, आणि अति दीन मुखमुद्रा पाहून माझे पंचप्राण कसे गोळाच होतात ह्मणजे पहा ! (धुसकारा टाकित्ये).

**अनु०**–बरें; एवढेंच नां? याखेरीज तर कांहीं नाहीं ?

**पद्मा०**– नाहीं नाहीं. दुसरें कांहीं एक नाहीं. अहो, हा प्रपंच आहे. यांत ल्हानमोठीं खेदाचीं कारणें वारं-

---

१ कोणत्याही मंत्राचे अनुष्ठानाच्या योगानें विद्या सिद्ध होते.

वार उत्पन्न होणें, हा सृष्टिधर्मच आहे. परंतु काय सां-गावें ! अनुष्ठितीबाई, अह्मांला देवानें ही कंन्या दिल्या-पासून, हिचें उत्तम रूप, तसेंच गुण पाहून त्या आनं-दानें मीं; कोणत्याही दुःखास जुमानिलेंच नाहीं; पण,—

### पद.

अतांशशिकलेलामी कायकरूंबाईबाई ॥ ध्रु० ॥
बयामाझिसकुमार कष्टीहोयवारंवार ॥
तिचामुखसुधाकर कोमेजूनिगेलाफार ॥
नम्रकरूनीतीशिर रडतसेधाईधाई ॥ अतां० ॥ १ ॥
नाहींतिलादेहभान गेलातिचासारामान ॥
नेत्रआसवेंभरून वहात्येतिबावरून ॥
एकाएकिंघाबरून लोळतसेठाईठाई ॥ अ० ॥ २ ॥ ३२ ॥

**अनु०**— असो, असें आहे तरी आपण इतःपर अ-गदीं चिंता करूं नये ! महाराज, आपल्या या संकटा-विषयीं मी बोलत्यें हें आधीं ऐकावें. ( कंन्येकडे हात करून ) ही आमची सिद्धविद्या आणि शशिकला या दोघी अगदीं सारख्या वयाच्या, परंतु महाराज, आपला श्रीमंतीचा पसारा; आणि आमचा आपला ब्राह्मणी वि-चार ! आपल्यासारखाच एक तो भावार्ध्वरीचा पुत्र ता-पसाध्वरी पाहिला आणि त्याला ही चटकर देऊन टा-किली, त्याला पांच वर्षें झालीं ! तो कांहीं आमचा विद्यार्थी तर नव्हेच; परंतु मध्यें कांहीं दिवस मी भारी क्षीण झाल्यें होत्यें, त्या समयीं त्या तापसाध्वरीनें मला

१ नर पडण्यास पूर्वपर्वंकरून भाव ( शास्त्रावर विश्वास ), पांडअ. २ जो नाास ( नवरी ) असेल त्यास सिद्धविद्या मिळते.

जगविलें ह्मणजे पहा! आणि अशी सात्विक अंतःकरणवृत्ति असणें, हीच आह्मां ब्राह्मणांची दौलत. ती त्याजपाशीं परिपूर्ण आहे असें पाहिलें; आणि तोच जांवाई केला. अयोध्येंत राहणारा वसिष्ठमहाराजांच्या घराण्यांतील चांगला कुलीन आहे.

**पद्मा०**— अनुष्ठितिबाई, मला तें सारें माहित आहे. इतकें सांगायास नको. आम्ही लग्नसमारंभास आलोंच होतों, आणि त्याजविषयीं सारा विचार एथेंच झाला.

**अनु०**—महाराज, आपण माझ्या बोलण्यांतलें तात्पर्य मनांत आणिलें नाहीं. (कन्येकडे हात करून हळूच) इला गेल्यावर्षींच रजोदर्शन झालें. तेव्हां वयाच्या अवस्थेविषयीं, इचा आणि शशिकलेचा अधिकार अगदीं सारखा आहे. तर महाराज, या अवस्थेंत कोणत्या[1] पिशाच्याचा झपाटा होत असतो, हें जगत्प्रसिद्ध असून आपण अंगारे धुपारे कसले करितां? आणि इतक्या पंचाइतींत कशाला पडलां अहां? पाहिजे तर याचा प्रत्ययही पहा. (कन्येकडे बोट दाखवून) ही आणि शशिकला, हे परस्परांचे केवळ प्राण आहेत, हें तर सरकारांस पुरतें ठाऊक आहे? तर इची आणि तिची क्षणभर एकांतीं गांठ घाला, आणि मग पहा बरें; तेव्हांच सारें बाहेर पडतें कीं नाहीं तें! मी या सिद्धविद्येची आणि शशिकलेची कालपासून गांठच पडूं दिली नाहीं. महाराज, आपण श्रीमंत, आपल्या येथें हजार प्रकारचीं हजार मनुष्यें, तेव्हां, "या सारख्या सारख्या मिळून अमक्याच ठिकाणीं गेल्या असतील

१ मदनाचा.

आणि तेथें अमकेंच झालें असेल!" असे कोणाचे तर्क निघाले, ह्मणजे आह्मां वृत्तिवानांस केवढी अडचण बरें?

पद्मा०— अनुष्ठितिबाई, तुह्मी ह्मणतां हाही प्रकार माझ्या मनांत आला होता, पण शशिकला कांहींच बोलेना, त्याणें माझें चित्त अगदीं गोंधळून गेलें!

अनु०—महाराज, आपणांशीं शशिकला बोलेना; हेंही मी ह्मणत्यें या अर्थाचेंच सूचक नव्हे काय?

पद्मा०—खरें ह्मणतां अनुष्ठितिबाई, तर आतां तिची आणि, (सिद्धविद्येकडे) इची लवकर गांठ घालावी.

अनु०—महाराज, त्यास कांहीं प्रयत्न नको! काल-पासून तिचीइची भेट नाहीं, हेंही एक तिच्या उदा-सीनतेची वृद्धि असण्यास कारण आहे, आणि आह्मी आतां वाड्यांत आलों; त्या वेळेस पिछाडीच्या बागेंत ती, "सिद्धविद्या आली आहे काय?" याच शोधांत आहे; असें मला वाटलें. तेव्हां आह्मी आलों आहों; हें तिला समजून प्रायः ती इतक्यांत इकडेस येईल, नंतर तिचें आणि इचें हितगुज चालू झालें कीं, आप-ण हळूच निघून जाऊं, ह्मणजे एका क्षणांत शशिकले-च्या मनांतला खरा अभिप्राय समजेल!

(इतक्यांत शशिकला प्रवेश करून धुंददृष्टीनें इकडे तिकडे पहात पहात त्यांच्या समीप येत्ये, आणि सिद्धविद्येस पाहतांच किंचित् हास्य, तसाच अनुष्ठिति आणि सिद्ध-विद्या यांस नमस्कार करून, मोठ्या झोंकानें पद्मावती आणि सिद्धविद्या यांच्या मध्यें बसते).

अनु०—(शशिकलेकडे) लवकर उत्तम पतीस वरा आणि सर्वांस आनंदित करा.

**पद्मा०**—( शशिकलेची हनुवटी धरून ) बया शशि-कले, अनुष्ठितिबाई ह्मणतात हें बरें आहे नां?

**शशिकला**—( डाव्याकडे मुर्की मारून ) हँ३. कसेंही असो. मजसारख्या पराधीन प्राण्याला जें जें होईल तें तें बरें ह्मणणेंच भाग आहे. मग हें तर काय; अ-नुष्ठितिबाईंचें वचन!

**पद्मा०**—( आर्जवानें ) बया, असें मखमाली म्यानानें झांकलेल्या तरवारीसारखें कां बोलयेस? नीट कां बो-लेनास बरें?

**शशि०**—आईसाहेब, नीट, वाईट, हें ओळखण्याचा अधिकार ज्याच्या अंगीं देवानें कृपा करून ठेविला असेल, त्याला असें विचारिलें तर उपयोग; मजसार-ख्या मूढांना काय?

**सिद्धविद्या**—( तिशीं अपसांत ) शशिकले, अगे; तुझ्या नेत्रांमध्यें तुंबून राहिलेल्या अश्रूदकानेंच वृद्धम-र्यादांचे बांद उपळून अगदीं विस्कळित झाले. तर आतां त्यांचा प्रवाह तरी काढूं नकोस.

**पद्मा०**—( शशिकलेकडे ) शशिकलाबाई, तुह्मांला आज बरी मनाजोगी कर्मणुक झाली, चालूद्या आतां कांहीं तरी खेळ.

**शशि०**—हँ३: सारें मनाजोगेंच आहे! ( हळूच ) मग तें प्राप्त न का होईना.

**पद्मा० आणि अनु०**—( निघून जातात ).

**शशि०**—( हर्षानें ) सिद्धविद्ये, तब्बल् दोन दिवस झाले, कोणीकडे गुंगारा दिला होतास? तू या काशींत होतीस का? तुझ्या बरें गे चैन पडलें? इतके दिवस म-

ला बाई असें वाटलें नव्हतें, तू मोठी पाषाणहृदय आहेस !

सिद्ध०—शशिकले, याचें उत्तर कांहीं दिवसांनीं समजेल, परंतु आज तुझा वदनसुधाकर इतका म्लान कां झाला आहे बरें?

शशि०—अगे सिद्धविद्ये, माझा मुखचंद्र मलिन होण्याचें कारण; तुझा वियोग! तुला सासऱ्याहून मुरळी आला ह्मणजे तो मला राहूच आला असें वाटतें, आणि हा कृत्रिम राहु; त्या प्रत्यक्ष राहूपेक्षांही अधिक. पहा बरें, खऱ्या चंद्रग्रहणाचा पर्वकाळ पराकाष्ठा दहा घटका, आणि याचा सहा सहा महिने, वर्ष वर्ष! परंतु त्यास उपायच नाहीं; ह्मणून तोही बरा, असें तूं या दोन दिवसांत केलेंस!

सिद्ध०—शशिकले, तशीच कांहीं अडचण असल्याखेरीज मी असें करीन बरें? किंवा ती मजकडून चूक झाली, आतां तर सरलें? पण बाई, आज तुझी तब्येत अंतर्बाह्य विघडलेली कां दिसत्ये? याचा खरा हेतु सांगशील तर सांग, नाहीं तर व्यर्थ श्रम घेऊं नकोस!

शशि०—सिद्धविद्ये, दोन दिवसांतच बरा उसणें उसणें बोलण्याचा अभ्यास केलास!

सिद्ध०—शशिकले, कोणालाही झालें तरी प्रसंगानुरूप वर्तणें भाग आहे. बापाला बाबा ह्मणेना तो चुलत्याला काका ह्मणेलच, असा भरंवसा कोण धरील? मीं केलेला प्रश्न, आईसाहेब पद्मावतीबाईही करून चुकल्या, त्यांची कांहीं दाद लागली नाहीं; असें ऐकिलें, आणि त्या ऐकण्यानेंच मला उसणें बोलायास शिकविलें!

शशि०—वेडी आहेस तू सिद्धविद्ये. अगे, एखाद्या

तळ्यांतल्या जळाच्या सभोंवार पांच पांच सात सात हात सारखी दलदल असेल तर, तें पाणी तटूकर उडून हरिणच प्राशील, आणि हत्ती मोठा ह्मणून त्याला तें प्राप्त होईल कीं काय ? याकरितां सिद्धविद्ये; मी तुझी वाटच पाहात होत्यें, पण बाई; एथें नको. चल पिछाडीच्या उपवनांत जाऊं !

( दोघी उठून नंतर उपवनांत गेलेंसें करून पुन्हा बसतात )

**शशि०**— ( प्रेमानें ) काय गे सांगूं सिद्धविद्ये, हें माझें वेड दोन दिवसांतलेंच नव्हे, वर्षसहामहिन्यांचें आहे ! भारद्वाजमुनींच्या आश्रमाकडून या वर्षांत कोट्यावधि मनुष्यें आलीं असतील; तितक्यांच्याही मुखानें, तेथें अयोध्येच्या ध्रुवसंधिराजाचा, सुदर्शननामक पुत्र आहे, त्याचे गुण सर्वच ऐकताहेत; केवळ मीच नाहीं. तर त्याचे गुणांच्या कोट्यंशाइतके दुसऱ्या राजपुत्राचे सारेही गुण भरणार नाहींत! आणि सिद्धविद्ये, काय चमत्कार सांगावा ! आज वर्षभर मला त्याचा ध्यास आहे, या अन्वयेंच आमच्या कुलदेवते दुर्गेनेंही मला स्वप्नांत दर्शन देऊन सांगितलें कीं, " तू त्या भारद्वाजाश्रिता सुदर्शनालाच वरावेंस. " आणि दुसऱ्या दिवशीं स्वप्नामध्यें मीं सुदर्शनराजा पाहिला. नंतर लागलेंच उजाडलें; तेव्हां माझ्या मनांत आलें कीं, तो मला प्राप्त होण्याविषयीं इतःपर उद्योग होऊन, तें कार्य कसें होईल, अशा धसूधशीनें माझें अंतःकरण फारच विरस झालें; तर माझा विवाह; माझ्या मनोदयानुरूप होईल, अशासाठीं कांहीं प्रयत्न करावा; तें सोडून मातुश्री आंगारे धुपारे करितात, काय सांगावें ? असो ! वडील आहेत.

सिद्ध०— ठीक. आतां सारें सुसंगत आहे, अशी माझी खातरी झाली. तर शशिकले, इत:पर तू अगदीं चिंता करूं नकोस. मी बेताबातानें आईसाहेबांकडून हा मजकूर महाराजांस कळवून, तुझ्या मनोदयाप्रमाणें कार्यसिद्धि होईल, असें करिन्यें. परंतु तूं आज, सर्वांनीं मोठ्या प्रीतीनें दिलेले, तुझे चंदनादिक आवडते उपचार; यांचा प्रेमाचसा काय; तसेंच अन्नही सोडून, अगदीं बैरागीण बनल्यासारखें केलें आहेस! तेणेंकरून आह्मांसारखे[1] असोत, परंतु तुझे जननीजनक[2] किती दु:खी झाले असतील बरें?

शशि०—सिद्धविद्ये, हें मला नाहीं का समजत? पण—

## लावणी, किंवा पद—(राग बीभास).

**सखयेहेंसारेंमजलारुचेना ॥ कैसेंकरूंआतांकांहीं सुचेना ॥ ध्रु० ॥ सुदर्शनभूपवरयाचीकहाणी[3] ॥ ऐकूनीयांझाल्येंअतिदीनवाणी ॥ सखयेहें० ॥ १ ॥ ज्यादिनींधरिनतयाचामीपाणी[4] ॥ त्यादिनींहेंगोड मजअन्नपाणी ॥ सखये० ॥ २ ॥ पंचबाणेंमज[5] व्याकुळकेलें ॥ यासाठींमीत्याच्यायोगींभुकेल्यें ॥ सखये० ॥३॥ चंदनहेंदेहींमजविषवाटे ॥ त्याच्या गंधेंमाझ्याअंगींयेतीकांटे ॥ सखये० ॥ ४ ॥ सुमहार[6]मजलाविषधर[7]भासे ॥ प्राणहोतीजैसेनिर्जळींमासे ॥ सख०॥५॥ स्वप्नींम्यापाहिलातोसखेबाई॥ तेणेंझालीमाझ्याशरिराचीलाही ॥ सखये०॥ ६ ॥**

---

१ स्नेही. २ आईबाप. ३ कथा. ४ हात. ५ मदनानें. ६ फुलांचा हार. ७ सर्प.

अलंकारशय्याआणिखाणेंपिणें ॥ त्यावाचूनीमाझें मनकांहींनेणें ॥ सखयेहेंसारें० ॥ ७ ॥ ३३ ॥
याकरितां सिद्धविद्ये, सांगितल्या साऱ्या संबंधाअन्वयें मीं मनोमार्गेंकरून त्या सुदर्शनास वरिलें आहे. आतां पुढें जगदंबा काय करील तें खरें!

**सिद्ध०**—ठीक आहे. आतां कांहीं बोलायास नको. शशिकले, तुझ्या मनांतील हा अभिप्राय मजकडून काढवावा, या हेतूनेंच आईसाहेबांनीं मघाशीं चटकर एथून पाय काढिला, आणि त्याप्रमाणेंच त्या आतां इतक्यांत इकडेच येतील असें वाटतें, तर तूं अम्मळ आपल्या दिवाणखान्यांत जा, ह्मणजे त्यांचा खरा खुलासा समजण्यास नीट पडेल.

**शशि०**—खरें ह्मणत्येस, पण बाई; हा विचार चालू झालेला ऐकण्याचें सोडून माझ्यानें जाववत नाहीं! यास्तव मी, (तिकडे हात दाखवून) या कुंदाच्या जाळींत छपून बसत्यें! (निघून जात्ये).

(इतक्यांत अनुष्ठितीसहवर्तमान पद्मावती प्रवेश करित्ये)

**तिघी**—(यथायोग्य बसतात).

**पद्मा०**—(त्वरेनें) कांगे सिद्धविद्ये, कांहीं ठाव लागला काय?

**सिद्ध०**—(हर्षानें) महाराज आईसाहेब, हें विचारावें काय! शशिकलेच्या अतिखोल अशा अंतःकरणवापीचा ठाव घेण्याविषयीं, (आपल्या हृदयास हात लावून) हा पानबुड्या अगदीं भरंवशाचा आहे. असो. महाराज, मजकूर मोठा बिकट आहे!

**पद्मा०**—(घाईनें) हाँहाँ, काय ह्मणत्येस!

**सिद्ध०**—महाराज, आहे सोईचेंच. भारद्वाजमुनींच्या आश्रयास, अयोध्येच्या ध्रुवसंधिराजाचा पुत्र सुदर्शन आहे. त्याचे अति अद्भुत सद्गुण, कोट्यावधि लोकांच्या मुखांनीं या भूमंडळावर प्रसिद्ध होत चालले आहेत; हें सर्वांस ठाउकेंच आहे. असो; पण, "त्यालाच तू वरावेंस" असें, जगन्माते दुर्गेनें शशिकलेच्या स्वप्नांत येऊन तिला मोठ्या अगत्यानें सांगितलें. तसाच त्या सुदर्शनावरही जगदंबेचा पूर्ण अनुग्रह झाला आहे, तेव्हां सारें सुसंगत असूनही; सुदर्शन राज्यभ्रष्ट याकरितां बिकट ह्मणावें लागतें, आणिक काय! परंतु शशिकला ह्मणत्ये, "मीं मनानें सुदर्शनास वरिलेंच आहे, आतां याज्ञिकविधि मात्र व्हावा; आणि तसें न होईल तर, आपलें आयुष्य सरलें; असें मला समजलें पाहिजे!"

**अनु०**—मला वाटतें; कांहीं बिकट नाहीं, फार चांगलें आहे!

(इतक्यांत पडद्यापलीकडे) काशीदेशाधिपति सुबाहुराज महारा३ज, आस्ते; कदमूमुलाजा३. (असा शब्द होतो).

**सर्व**—( खडी ताजीम घेतात ).

( नंतर शार्दूलध्वज सेनापति आणि न्यायसागरमंत्री यांसहवर्तमान सुबाहुराजा प्रवेश करून आसनारूढ होतो).

**सुबाहु**—( सदर तिघींकडे ) बसा बसा.

**पद्मा०**—( राजाच्या डाव्या बाजूस बसत्ये ).

**अनु०**—(राजाच्या उजव्याकडे अम्मळ दूर सिद्धविद्येस जवळ घेऊन बसत्ये).

**न्यायसागर**—(राजाच्या समोर उजव्या तर्फेस बसतो).

**शार्दूलध्वज**—( तसाच डाव्या तर्फेस ).

पद्मा०--बरीच स्वारी मोठी वेळेवर आली !

सुबा०— (आनंदानें) वाहवा वाहवा ! आतां या हर्ष-मुद्रेवरून; कन्याबाईची तब्बेत कशी काय आहे, हें विचारायासच नको ! कां खरें नां ?

पद्मा०— (किंचित् हांसून) तसें कांहीं आजून ह्मणतां येत नाहीं; पण कदाचित् (त्याजकडे हात जोडून) सरकारांकडून आणिक बिघडेल कीं काय, अशी शंका त्या आनंदांतच आहे !

सुबा०— (चकित होऊन) हें काय ! तुमच्या आनंदांत मजकडून बिघाड ?

पद्मा०—सरकार, आमच्या नव्हे; शशिकलेच्या.

सुबा०—ह्मणजे ? यांत काय झालें; माझ्या आनंदांत मजकडूनच विक्षेप ! असेंही नाहीं कां होत ?

पद्मा०—खरें आहे, परंतु तसें तर दिसतें !

अनु०— (पद्मावतीकडे हात करून) थांबा थांबा. मी सांगत्यें. शशिकलाबाईच्या प्रकृतीस औषध, तिचा विवाह त्वरित झाला पाहिजे. (इतकें बोलत्ये तोंच)—

सुबा०— (चकित होऊन किंचित् रोषानें) तर तुह्मां सर्वांनां, तुह्मी निरंतर झोंपेंत असतां असें ह्मटलें पाहिजे, वाहवा. अहो, कोण आटापेट; आणि काय आमच्या जिवांचें रान झालें आहे, परंतु तुह्मांस याची बिल्कुल दाद नाहीं ? ठीक ! असो, आह्मांकडून आज विवाहाची सिद्धता आहे, पण अनुष्ठितिबाई, हा कांहीं घरांतल्याघरांत करायाचा कुलधर्म नव्हे, कीं सणवार नव्हे; देशोदेश ज्यांस पत्रें गेलीं आहेत; ते राजपुत्र आणि सर्व लोक तर आले पाहिजेत नां ?

अनु०—महाराज, माझें भाषण पुरें ऐकावें.

सुबा०—(चकित होऊन) आणिक कोणतें ?

अनु०—महाराज, भारद्वाजाश्रमांतील सुदर्शनराजास पत्र गेलें आहे काय ?

सुबा०—(गहिंवरून) अनुष्ठितिबाई, त्या सुदर्शनाचें चरित्र ऐकून चित्ताची काय हवाल होत्ये आहे, ती माझी मलाच ठाऊक ! कारण; तो राज्यभ्रष्ट पडला हो, नाहीं तर काय सांगावें. (धुसकारा टाकून) असो; आमच्या प्रारब्धीं तसा योग नाहीं इतकेंच.

पद्मा०—(खेदानें खालीं पाहून हळूच) पण शशिकलेचें ह्मणणें, " जगदंबे दुर्गेनें स्वप्नांत सांगितल्याप्रमाणें मीं मनोमार्गें त्यास वरिलें आहे, तर सरकार आदिकरून सर्वांनीं मेहरबानीनें तें मान्य केलें पाहिजे.

(इतक्यांत विदूषक प्रवेश करितो)

विदू०—(राजास मुजरा करून सेनापतीच्या समीप बसतो).

सुबा०—(त्याकडे) आपण कोण आणि कोणीकडून आलां ?

विदू०—(हात जोडून) महाराज, मी वनचर आहें. माझ्या अंगीं; भिक्षुकी, गृहस्थी, कारकुनी, सरदारी, मुत्सद्दीगिरी, शिपाईगिरी, फार कशाला ! एक लुच्चेगिरी खेरीज करून सर्व आहे. आणि मी आलीकडे दहा वर्षें भारद्वाजमुनींच्या आश्रमांत होतों, तेथून इकडेसच आलों.

सुबा०—अरे वनचरा, तेथें अयोध्येचा सुदर्शनराजा आहे त्याविषयीं तुला माहिती असेलच.

विदू०—त्याची कच्ची हकीकत मला ठाऊक आहे!

सुबा०—प्रस्तुत त्याचें बरें आहे?

विदू०—महाराज, तें काय पुसावें. असा दुसरा राजकुमार प्रस्तुत या भूमंडळावर तर नसेल! सरकार, त्याच्या दैवयोगानें त्याला आधीं आश्रयच कसा मिळाला आहे, सर्व प्रकारच्या सामर्थ्याचें घर! तो सुदर्शन मातेसहवर्तमान अगदीं कालग्रस्त दीन होऊन तेथें आला, आणि त्याचा शत्रु महाप्रबल तसाच खल युधाजित्, हेंही समजण्यांत आलें; पण एथें काय! ते मातापुत्र, प्रधान आणि दासी असे आश्रमांत येण्याबरोबर,—

## साक्या.

भारद्वाजदयेनेंत्याला स्वाश्रमिंदेउनिजागा ॥
वदलानचभयधराअसेतो ईशनिरंतरजागा ॥ ३४ ॥
नाशुनिदैन्यातोप्रभुदेइल तुमचेंराज्यतुह्मांला ॥
न्यायिजनाचीइष्टसिद्धिहा वाटेलाभअह्मांला ॥ ३५ ॥
नंतरत्यांचेंलालनपालन करिसदयपरमहर्षें ॥
ह्मणेसुदर्शनदीनांचेतुह्मि जननीजनकमहर्षे ॥ ३६ ॥

(गहिंवरून) नंतर महाराज, तो नवां वर्षांचा झाला असतां; साक्षात् जगदंबे दुर्गेनें त्यास प्रत्यक्ष दर्शन, तसेंच; धनुष्य, बाण, खड्ग, कवच, इत्यादि युद्धाचीं अमोघ साधनेंही स्वहस्तें दिलीं! पुढें कांहीं दिवसांनीं शृंगवेरपुरचा भिल्लनायक दुर्दर्श याणें, जडावाचा रथ त्यास नदर दिली! तो सुदर्शन त्या रथांत बसून वनविहारास निघाला ह्मणजे त्याजबरोबर दोनच

मनुष्यें असून त्याजकडेस पाहणारांला; त्याच्या तेजःप्रभावानें असें वाटतें कीं, त्याचे सभोंवार दोन अक्षौहिणी सेना आहे काय? फार काय सांगावें महाराज, त्याच्या त्या बुद्धिवैभवाविषयीं भारद्वाजमुनिही आश्चर्य करितात ह्मणजे पहा!

सुबा०—(किंचित् त्रासून) अरे, सारें ह्मणतां खरें; पण "नांव सोनूबाई आणि हातांत तखलाचें काईबाई." तो भ्रष्टराज्य, त्याला पत्र पाठविण्यास आह्मांला कांहीं लाज आहे कीं नाहीं! "सोन्याची सुरी ह्मणून उरीं का घालावी?" यास्तव (पद्मावतीकडे) तो नाद कांहीं उपयोगीं नाहीं, असें शशिकलेला तुह्मी नीट समजून सांगा!

शार्दूलध्वज—(हात जोडून) सरकारांनीं मनांत आणिलें असेल कीं," त्याला; धन, सेना, सहाय, कांहींच नाहीं!" परंतु मेहेर्बान्, जगदंबेनें शस्त्रें दिलीं! यांत सारें आहे, असें मला वाटतें.

न्यायसागर—महाराज, मी फार बोलत नाहीं. थोडकेंच ऐकावें. बुद्धिमानानें सर्व जिंकिलें आहे!

सुबा०—(त्रासून) अहो, तें सारें बोलतां येतें; परंतु केवळ हाताचे मांडे होत नाहींत!

न्याय०—खरें आहे महाराज, परंतु सुदर्शनाच्या गुणवैभवाचा आधार; जो जगन्मातेचा उदार हस्त, तो मांडे तर काय; परंतु कोट्यावधि ब्रह्मांडेंही लीलामात्रें निर्मिणारा आहे!

सुबा०—(कोंडल्यासारखा होऊन) अहो, या स्वमवार्तेवर भरंवसा ठेवून युधाजिताशीं वांकडें होण्याचा

आमचा दम आहे ? ह्मणून ह्मणतों, उगीच पोरबुद्धीस लागणें नीट नव्हे. (आनंदानें) आणि जर जगन्माते दुर्गेचीच मर्जी असेल तर निःसंशय त्याप्रमाणें घडेल ! मग उगीच साहस किमर्थ करावें ? (मंत्री आणि सेनापति यांसहवर्तमान निघतो, इतक्यांत शशिकला प्रवेश करून; पद्मावतीचे सन्निध आली असतां सारे पुन्हा पूर्ववत् बसतात).

सुबा०—( शशिकलेस जवळ घेऊन आणि तिची हनुवटी धरून आर्जवानें ) बया शशिकले, तू एथेंच का होतीस ?

शशि०—होय बाबा, आणि मीं तुह्मां सर्वांचीं भाषणेंही ऐकिलीं; यास्तव थोडेंसें मर्यादा सोडून बोलत्यें. महाराज, आपण योजिल्याप्रमाणें स्वयंवर करण्यांत माझा संतोष नाहीं. यास्तव मी बोलत्यें हें ऐकिलेंच पाहिजे.

सुबा०—(रागानें) समजलों मी तुझें बोलणें. पण हा तुझा वेडेपणा आहे. अगे, तू राजकन्या; पति उगीच आपला गोरा गोमटा असला ह्मणजे झालें ? "हुरळली मेंढी आणि सरळली वाघापाठीं !" परंतु समजेल पुढें. सुदर्शनास वरून नंतर भारद्वाजाश्रमीं कंदमूलें खाण्याचा आणि वल्कलें नेसून पर्णकुटिकेंत राहण्याचा प्रसंग आला, ह्मणजे तूच ह्मणशील कीं, "मी एक पोरबुद्धि; पण माझा पिता तर प्रौढ राज्यकर्ता होता, त्याणें हा अविचार कसा केला" असा तुला पश्चात्ताप व्हावा, आणि आह्मांवरही युधाजितानें दांत ठेवावा हें अनर्थमूल नव्हे काय? तर ही बुद्धिपूर्वक डोळेझांक करणें नीट नव्हे! यास्तव तुला साफ सांगतों, उगीच

असला हेका करूं नकोस. ( असें बोलून, नंतर भालदारास पुढें करून मंत्री आणि सेनापति यांसह निघून जातो).

**शशि०**—( पद्मावतीच्या अंगावर मान टाकून डोळ्यांस आसवें आणित्ये ).

**पद्मा०**-( तिच्या अंगावरून हात फिरवून ) बया, काय बरें असा दुराग्रह करित्येस. उगी, नको रडूं. ( तिच्या तोंडावरून हात फिरवित्ये ).

**शशि०**—( नीट बसून, लाडक्यानें ) आई, तुह्मी कितींही झिटकारा आणि दुसरें कोणी कांहीं ह्मणो; पण,—

## पद.

मीजननिसुदर्शनासि वरिनवरिनवरिनवरिन ॥ध्रु.॥ मातेकृतिखासभोति करिजोनरत्यासभोति घारतशी पतिसभोंति फिरन० ४ ॥ मीजननि० ॥ १ ॥ सेवुनियापतिपदास राष्ट्रसकलआत्मदास रिपुसंघाअति उदास करिन० ४ ॥ मीजननि० ॥ २ ॥ अनयाअरिसाधनास देईनधनानिर्धनास व्रतहेंवृषवर्धनास धरिन० ४ ॥ मीजननि० ॥ ३ ॥ ३७ ॥

समजलें पुरतें? माझ्या ह्मणण्याप्रमाणें करा, नाहीं तर मजवर पाणी सोडा; आणि युधाजिताशीं स्नेह जोडा! ह्मणजे झालें.

**पद्मा०**—( तिच्या तोंडावरून हात फिरवून ) बया, उगीच दुराग्रह करून अशी संतापूं नकोस. चल वाड्यांत. ( उठत्ये आणि तिचा हात धरून तिला उठवूं लागत्ये ).

---

१ अन्यायाला. २ शत्रूंसहवर्तमान. ३ धर्मवृद्धिकरिता.

शशि०–( झटक्यानें मुर्का मारून ) मी नाहीं येत. येथें असल्यें काय आणि वाड्यांत असल्यें तरी काय. "पळस कोठें गेला तरी त्याला पानें तीनच" ( धुसकारा टांकित्ये ).

पद्मा०–( तिचा हात सोडून ) बरें आहे. तुझा संतोष असला तर एथें कां असेनास, पण; ( तिची हनुवटी धरून ) चिमण्ये, आतां उगीच त्रास मात्र करून घेऊं नकोस हो! ( सिद्धविद्येकडे ) सिद्धविद्ये, शशिकला संतापली तर तुला विचारीन बरें, ध्यानांत ठेव. ( अनुष्ठितीसह निघून जात्ये ).

शशि०– ( खेदानें ) सिद्धविद्ये, कसें प्रारब्ध पाहिलेंस नां? अगे, मी मानित, पालित, दत्तक, अशी तरी आहें? प्रत्यक्ष औरस, पण तें कांहीं नव्हे! ( मूर्च्छित होऊन सिद्धविद्येच्या आंगावर मान टांकित्ये ).

सिद्ध०–( घाबरून तिच्या आंगावर आपल्या पदरानें वारा घालित्ये, आणि तिणें डोळे उघडून पाहिल्यानंतर काकुलतीनें ) सख्ये शशिकले, दम कां टांकित्येस बरं? अगे, संकटकाळीं मन घट्ट करून; आपला मतलब साधावा. त्यांतून तुह्मी राजेलोक, कोणतें बरें कमीं आहे; सांग. ( तिकडे तिकडे हात करून ) हें इंद्रभवनासारखें मंदिर पहा; हा बगीच्या पहा; आणि बाकीचेही कसे पाहिजेत तसे ऐषआराम! आणि तेंही सारें असो, पण आधीं तूं वाड्यांत चल आणखीं जेव तर खरी. कां ताट तयार करून इकडेसच आणूं?

शशि०–( एकाग्रचित्त होत्साती, स्वप्नांत पाहिलेली

सुदर्शनाची मूर्ति मनांत आणून ) सिद्धविदे, तूं ह्मण-ल्येस जेव, हें पहा, तें पहा, पण बाई,—

## गजल.

पतिविणेंमजकांहीं नावडेमीकायपाहूं ॥ ध्रु. ॥
अन्नअसूनीबहुत आणिदूधदहींघृत ॥ प्राणनाथ अरण्यांत एकलीमीकैसीजेऊं ॥ पति० ॥ १ ॥
असूनीहिगुणराशी कंदमूलेंनीवाराशी[1] ॥ प्रियमा झावनवासी दुःखहेंमीकैसिसाहूं ॥ पति० ॥ २ ॥
कल्कहीन[2]वल्कधारी[3] कांतकाननविहारी[4] ॥ मजउ पचारभारी देतांतेमीकैसीघेऊं ॥ पति० ॥ ३ ॥
झालीविवाहाचीघाई पतिलागिंपत्रनाहीं ॥ मज होतीकष्टबाई प्राणतरीकोठेंठेऊं ॥ पति० ॥ ४ ॥
माझामनोरथरितो[5] करीतसेकैसापिता ॥ तैसीमा ताहेंमीआतां दैन्यकोणापासिगाऊं ॥ पति० ॥५॥
( आकाशाकडे ) गौरीनाथाविश्वेश्वरा देईदेइमज थारा ॥ तुजवाचूनीयाहरा शरणमीकोणाजाऊं ॥ पति० ॥ ६ ॥ ३८ ॥

विदू०—महाराज शशिकलाबाई, आतां आपल्यास मी एक युक्ति सांगतों. सुदर्शनराजास आपले वडील पत्र पाठवीत नाहींतच; तर त्यांच्या परोक्ष आपणच कोणी एखादा चतुर ब्राह्मण पाहून त्याजबरोबर पत्र पाठवावें.

शशि०—( आनंदानें ) भले शाबास. वनचरा, मींही हेंच मनांत आणिलें आहे! अरे, जिवावर आलेलें संकट

१ कंदमूल, तृणधान्यें (वर्या वगैरे) खाणारा. २ निष्कलंक. ३ वल्कलें वापरणारा. ४ वनवासी. ५ निष्फळ.

कसें टळेल तसें टाळिलें पाहिजे! आणि वनचरा, पत्र तर आहेच, परंतु ज्याच्या योगेंकरून कार्य सिद्धच होईल; अशा प्रभावाचा तपस्वी कोणीं ब्राह्मण पाठवायास मिळेल तर लवकर पहा. आणि इतक्यांत तस्स मिळाला ह्मणजे हेंच कार्यसिद्धीचें सूचक.

विदू०—खरें आहे महाराज. याप्रमाणेंच दमयंतीस जेव्हां संकट पडलें तेव्हां तिला कोणी प्रत्यक्ष द्विज मिळाला नाहीं, नंतर तिणें पांखराला द्विज ह्मणतात हें मनांत आणून एक हंसपक्षीच पाठविला आणि तेणेंकरून ती कृतार्थ झाली, असा केवळ द्विजशब्दाचा महिमा! मग तो सलक्षण सांपडेल तर काय निःसंदेह कार्यसिद्धिच. (इतक्यांत—

## पंचायतनदेवताभजनपद्य.

सूर्यगजाननदुर्गेशंकर माधवमजतारी ॥ ध्रु० ॥
पापतमः[1]स्तोमालामाझ्या झटकरसंहारी ॥ व्याकु-
ळकरिमजसंकटकुळत्या लवकरिपरिहारी ॥ कर[2]
देमजदुष्प्रवृत्तिलक्षणं[3] मार्गीतविहारीं ॥ कामांद्य[4]
रिमजछळितीत्यांकरिं माझ्याआहारीं ॥ ठेविसंसृ[5]
तितप्तामजनिजमुख[6]विधुनीहारीं॥सूर्यग०॥१॥२९॥

असें भजन करीत तापसवेषधारी विद्याधरमिश्र येतो).

शशिकलाप्रमुख—(आनंदानें त्यास वंदितात).

---

१ पापरूप अंधःकाराच्या समुदायास. २ हात. ३ दिवसानुदिवस वाढती जी विषयांची आशा हेंच ज्याचें लक्षण अशा मार्गामध्यें जें वर्तन त्याचाठायीं. ४ काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर, हे शत्रु. ५ वारंवार जन्म तसेंच मरण यांणीं तापलेल्या. ६ आपल्या मुखचंद्राच्या गारव्यांत.

विद्याधर०—कार्यसिद्धिरस्तु. (विदूषकाकडे हळूच) अहो, ही कोण आहे?

विदू०—ती एथील राजाची कन्या आणि तिचें नांव शशिकला.

विद्या०—ठीक, हें नांव तिच्या गुणाअन्वयें बहुत योग्य आहे.

शशि०—(त्यास आसन देऊन) महाराज, आपलें नांव काय?

विद्या०—(आसनावर बसून) हे राजकन्ये, माझें नांव विद्याधरमिश्र.

शशि०—(सिद्धविद्या आणि विदूषक यांजकडे पाहून हळूच) प्रायः जगदंबेनें अभय दिलें असें वाटतें! (विद्याधराकडे) मिश्रमहाराज, आपलें आगमन कोणीकडून झालें?

विद्याधरमिश्र—हे राजसुते, मी भारद्वाजमुनींच्या आश्रमांतील महानंदानुभव घेऊन आतां या वाराणसी क्षेत्रांतिल घ्यावा, अशा हेतूनें तिकडून येऊन दशाश्वमेधघाटीं माध्यान्हांत आन्हिककर्म आटोपून (तिजकडे हात करून) त्या धर्मशाळेंत बिऱ्हाड ठेवावें, अशा इच्छेनें निघालों आहें.

शशि०—(आनंदानें) मिश्रमहाराज, भाराजद्वमुनींच्या आश्रमांत आपण कोणकोणते चमत्कार पाहिले?

विद्याधर०—(तिचीं विवाहविरहादि लक्षणें मनांत आणून) बाई राजकन्ये, तेथील कशास कशास ह्मणून वर्णावें? परंतु त्या सर्वां गोष्टींत अति अद्भुत हेंच कीं, अयोध्याधिपति ध्रुवसंधिराजाचा पुत्र सुदर्शनराजा पा-

हिला, त्याचेंही चरित्र लोकोत्तर! त्याजपाशीं प्रस्तुत पाहिलें तर; धन नाहीं, सेना नाहीं, सहाय नाहीं, असें दिसतें आहे मात्र; परंतु त्याचें तें रूप, औदार्य, शौर्य, भाषण माधुर्य, इत्यादि ऐश्वर्य पाहिलें ह्मणजे वाटतें कीं, सकलभूमंडळावरील राजे याचे आज्ञाधारक, तशा साऱ्या दौलतीही याच्याच आहेत! अगे नरपतितनये, फार काय सांगूं?

पद—(राग सारंग).

स्वस्थितिनें[1]चिसुदर्शनें[2]वर्मा करिवनि[3]केलाहिसुधर्[4]-
र्मा ॥ जाणेंदर्शनिंपरहृन्मर्मा[5] ऐसाअतिमानुषकर्मा[6]
॥ ध्रु. ॥ भर्मावरियच्छरीरचर्मा[7][8] भादेत्येलोचनेंशर्[9]-
र्मा ॥ वर्मालेउनि[10]संयुगेंनर्मा[11] करित्यापरिनाहींफ-
र्मा ॥ १ ॥ घर्माक्लुत[12]रिपुतत्स्नेहचिाहित मानुनिटां
कितिरिपुधर्मा ॥ निर्मायाक्षम[13]सहाय्यकतो भूधरणीं[14]-
शेषाकूर्मा ॥ २ ॥ स्वस्थिति० ॥ ४० ॥

या प्रकारचे त्याचे गुण पाहून वाटतें, ज्याणें तो सुदर्शन पाहिला नाहीं; त्याचीं नयनें व्यर्थ आहेत! असें केवळ रूप. तात्पर्य, परिपूर्ण असा एकच गुण एखाद्याला दिला तर तेवढ्यानेंच तो मनुष्य लोकांमध्यें वर्णनीय होतो, आणि असे सारे गुण एकत्र झाले तर तो मानव या

---

१ आपल्या योगानें. २ सुदर्शननामक क्षत्रिय. ३ अरण्याला. ४ देवसभा. ५ दुसऱ्याच्या मनांतील इंगितास. ६ सामान्य मनुष्याच्या हातून होण्यास अशक्य अशीं कर्में करणारा. ७ सोन्यासारखी. ८ ज्याच्या शरीरावरील कातड्याची कांति. ९ नेत्रसुखास. १० कवचाला. ११ युद्धरूप क्रीडेला. १२ घामानें थबथबलेले. १३ समर्थ. १४ भूमीचें धारण करण्याविषयीं (धार्मिक राजा असला ह्मणजे पृथ्वीचें धारण शेष, कूर्म यास जड पडत नाहीं.)

सृष्टींत कसा दिसेल, हें कौतुक पाहाण्याकरितांच ब्रह्मदेवानें हा सद्गुणांचा राशि निर्मिलाआहे काय! असें वाटतें.

**शशि०**—मिश्रमहाराज, आपल्या या भाषणेंकरून माझी चित्तवृत्ति फारच चंचल झाली! कारण साक्षात् जगदंबे दुर्गेनें मला स्वप्नामध्यें सांगितलें कीं, तूं त्या भारद्वाजाश्रिता सुदर्शनालाच वरावेंस. यावरून मीं मनोमार्गें त्यास वरिलें आहे. आणि माझ्या पित्यानें स्वयंवराकरितां देशोदेशच्या राजकुमारांस आमंत्रणें करून, सुदर्शन राज्यभ्रष्ट याकरितां त्यास, मी सूचना केली असतांही पत्र पाठविलें नाहीं! ह्मणून अशा या संकटांतून मला तारण्याकरितां आपणांस त्या दुर्गेनेंच पाठविलें असावें; असा मनांत भरंवसा आला, तो सफळ व्हावा; यास्तव विनंती करित्यें कीं, मी स्वतः सुदर्शनराजास पत्र देत्यें तें त्याला पोंहोंचवून, तो एथें स्वयंवरास येईल; असें, "मी आपली धर्माची कन्या आहें" हें मनांत दृढ धरून आपण केलें पाहिजे!

**विद्या०**—बहुत उत्तम आहे. अगे राजकन्ये, तुझा इच्छितार्थ सिद्ध केल्याचें यश, हा मज धनहीनाला अलभ्य लाभ होतो आहे, याकरितां मी मोठ्या आनंदानें याच पावलीं परत निघण्यास सिद्ध, ह्मणून समज. नये भूपतितनये, असें आहे,—

## दिंड्या.

**पुष्पशोभानाहिंगेज्याअचाट ॥ नाहिंछायातैशीच निपटदाट ॥ आकृतीचादेखणानाहिंघाट ॥ फळ हिज्यालानाहिंगेबहुचखोट ॥४१॥ असेंअसतांदारिद्र्यचंदनाशीं ॥ छेदऐसाहीअंगनाससोशी ॥ गंध**

देउनितोडित्याहीजनांशीं ॥ तोषवीतोत्यांचियाबहु
मनांशीं ॥ ४१ ॥ अनुपकाऱ्यांलाजवीमानवांतों ॥
दरिद्रालामजबहुतखेदहोतो ॥ ह्मणुनितोषेंमीबिये
शीघ्रजातों ॥ अशाकार्याजगदीशहातदेतो ॥ ४२ ॥

याकरितां झटकर पत्र लिहून दे, आणि इतःपर तू अगदीं काळजी करूं नकोस.

शशि०--मिश्रमहाराज, पत्र केव्हांच लिहून ठेविलें आहे. हें घ्या. ( त्याच्या हातावर लखोटा आणि कांहीं द्रव्यही टांकित्ये ).

विद्या०--( पत्र घेऊन लगबगीनें ) हा निघालोंच तर बयें.

सर्व--( त्याच्या पायां पडतात ).

विद्या०--कार्यसिद्धिरस्तु.

शशि०--( हात जोडून ) मिश्रमहाराज, आतां दुसरें कांहीं सांगणें नाहीं, " मी आपली धर्माची कन्या आहें. " हें अंतःकरणांत पुरतें धरून; काय करणें तें करावें; ह्मणजे झालें !

विद्या०--हे भर्तृदारिके, आतां कां बरें असें दैन्यदर्शक भाषण करित्येस? तूं कांहीं काळजी करूं नको ह्मणून मी बोललोंच आहें.

शशि०--तथास्तु! आतां चलावें महाराज.

विद्या०--( विदूषकाकडे ) अहो महाराज, तुह्मी चलतांनां?

विदू०--अँ३ः तें पुसायासच नको, तुह्मी पोहोंचतां तों मी तेथें आहेंच.

विद्या०--ठीक आहे. ( निघून जातो ).

शशि०–( आनंदानें ) वनचरा, मोठा तपस्वी असून अतिचतुर, असा ब्राह्मण या कामांत सहाय मिळाला, हें निःसंशय कार्यसिद्धीचें लक्षण!

विदू०–खरें आहे महाराज. पण आतां मीही चलतों भारद्वाजाश्रमास. ( निघून जातो ).

शशि०–शिद्धविद्ये, परोपकारी विद्याधरमिश्रजी यशस्वी व्हावे एतदर्थ आपण कुलदेवतेची प्रार्थना करूं चला, पण तूं पुढें जाऊन. मातुश्रीस सांग कीं अंबाबाईनें मला आश्वासन दिलें!

सिद्ध०–ठीक आहे. ( निघून जात्ये ).

शशि०–( आनंदित होत्साती चपलतेनें सुदर्शन येण्याच्या मार्गाकडे पाहणें वगैरे, आपल्या उत्कंठेच्या दर्शक अशा कांहीं चेष्टा करितां करितां थकून एका वृक्षाच्या खोडाशीं टेंकून बसत्ये, नंतर किंचित् अवकाशानें) बहुत दिवस ऐकल्याप्रमाणें भारद्वाजाचा आश्रम, आणि सुदर्शनाची मूर्ति तशीच वर्तणूक निरंतर मनांत घोळणाऱ्या नादाच्या झपाट्यानें तन्मयांतःकरणाची, स्वप्नवत्; "प्रमदवन हें भारद्वाजाचें तपोवनच." अशी भावना होऊन आश्रमादिक प्रत्यक्षासारखें पहातहोत्साती) अहाहा! कशी ही तपोवनाची रमणीय शोभा! जिकडे पाहावें तिकडे पल्लवानीं तरतरलेल्या बेल, शमी इत्यादि वृक्षांच्या रांगा, तसेंच त्यांच्या मधून मधून दूर्वा, दर्भ, वाळा, तुळशी, पाच, दवणा, मर्वा, दवणशेवत्या, निशिगंध, आणि भुईचाफे यांचे वाफे, तऱ्हेतऱ्हेचे रंगीत गालीचे पसरल्याप्रमाणें दिसताहेत! तसेच ह्यांच्या बांदांजवळून पाण्याचे नागमोडी पाट झुळझुळ

वाहताहेत! ठिकठिकाणीं पुष्करिणींतून, तशींच भोंव-
तालच्या सरोवरांतून नानाप्रकारच्या रंगांची कमलवनें
फुललीं आहेत! या सरोवरांत त्याचे तटांवरच्या गग-
नास भिडल्यासारख्या तरूपंक्तींचीं प्रतिबिंबें अतिशय
खोल खोल पडलीं असल्यामुळें त्यांच्यामधील आकाश
तर, फारच खोल दिसतें; तेणेंकरून हा आश्रमप्रदेश
इतका उंच वाटतो कीं, स्वर्गाच्याहीं वर सांगितलेला
जो ब्रह्मलोक, तोच हा कीं काय; असा भास होतो!
(आश्रमाकडे पाहिलेसें करून) अहाहा! या आश्रमा-
च्या सन्निध वृक्षांस वाळत लाविलेलीं वल्कलें; एथील
मुनिजनांचे सात्विकवृत्तिरूप ध्वजांच्या फरांच्यांप्रमाणें
तळपताहेत! तसेच मयूरादि पक्षी आसमंतात् लीलेनें
संचार करिताहेत! हरिणादि पशू कसे निःशंक चित्तानें
जागोजागीं रोंवत करीत बसले आहेत! आणि सभों-
वार दृष्टि पुरे तों पर्यंतही; आंबे, फणस, कवठी, जां-
भळी, शिताफळी, रामफळी, अवळी, केळी, नारळी,
पोफळी, हरपररेवडीं, उंबर, हिंगणबेटे, पेरू, अंजीर,
नारिंगी चकोत्रे; इत्यादि लिंबाच्या जाती, द्राक्षी, क-
वेंदी, तोरणी, अननस, डाळिंबी, इत्यादिकांतून प्रायः
मूळापासून शेंड्यांपर्यंत गच्च भरलेल्या पिकल्या फळांच्या
भारानें लवलेले तरूवर! तसेच; कुंद, मोगरा, नेवाळी,
कुसरी, जाई, जुई, चमेली, मालती, काटेशेवती, गुलाब,
सोनचाफे, बकुळ, केतकी, तऱ्हेतऱ्हेच्या कोरंटी, त-
शाच जास्वंदी, भेंड्या, कांचन, पारिजातक, हतगे आ-
णि मंदार, इत्यादि पुष्पभारानें नम्र झालेल्या वल्ली त-
शींच फुलझाडें बहुतवेळा ऐकिल्याप्रमाणेंच प्रत्यक्ष पा-

हून वाटतें कीं, वसंतादि साहीं ऋतूंचे गुण एथें सर्वकाळ वस्ती करिताहेत ! (किंचित् चमकून) अरे देवा ! मी एथील कोणासही न विचारितां हळुहळू अगदीं आश्रमाच्या दारापाशीं आल्यें ! मजवर कोणी रागें भरणार नाहीं ना. (कांहीं अवकाशानें) असो; रागें भरोत अथवा मला मारही देवोत पण क्रोधावलेल्या तरी प्राणनाथांस तसेंच भारद्वाजमुनींसहीं पाहिल्यावांचून आतां माझ्यानें कांहीं परत जाववत नाहीं ! आणि असेंही वाटतें कीं, एथील पशु पक्षी देखील, सर्वदां आनंदित असणें, दुसऱ्यास लेशमात्रही पीडा न करणें, इत्यादि तपस्विजनांचे धर्म पाळितात, तेव्हां शांत, सदय अशीं मनुष्यें शरणागताचा तिरस्कार कसा करितील !

(इतक्यांत सिद्धविद्या, शशिकलेनें सांगितलेलें काम करून पुन्हा तिला न्यावयाकरितां त्वरेनें येऊनही, ती एकाग्रचित्त आणि स्तब्ध झाली आहे; असें दिसून येतांच विस्मित होऊन; किंचित् दूर मुकाट्यानें उभी राहत्ये)

शशि०—(दचकून आणि किंचित् आंग चोरून) अगे बाई ! आश्रमाच्या मध्यभागीं मंडपांत मोठ्या उंच चौरंगावरती मांडिलेल्या आसनावर बसलेले वृद्ध दिसतात ते भारद्वाज, आणि त्यांच्या समोर हात जोडून भुईवर बसलेले तेच प्राणनाथ ! यांत कांहीं संशय नाहीं. (आसपास पाहून) आहाहा ! एथल्या या तपस्विजनांच्या शुचिर्भूत मूर्ति किती तरी तेजस्वी; आणि सुप्रसन्न. वाहवा, यांजपुढें सार्वभौम राजा आला तरी तो, याचकासारखा कळाहीन दिसेल; असें ऐकत होतें तें अगदीं खरें ! जसा आकाशांत वायु; तसा या आश्रमस्थानांत

सर्वत्र पवित्रपणा भरला आहे. शिव शिव! पूर्णचंद्राच्या साऱ्या किरणांचा जसा बुचडा बांधावा, तसा भारद्वाजांच्या मस्तकीं बांधिलेला लखलखीत आणि सफेत असा जटाभार शोभतो आहे. तसेंच आधीं गोपीचंदनाचे द्वादश तिलक असून त्यांजवर सर्वांगीं भस्म, रुद्राक्ष, आणि सभोंवतीं पवित्रदर्शन ऋषिमंडळी. त्याप्रमाणेंच प्राणनाथांच्या तर हुर्मोजी मोत्यांचे दाण्यांसारख्या पाणीदार शरीरावर तारुण्यचंद्राच्या उदयानें लावण्यसमुद्र परिपूर्ण भरती पावून स्थिर झाला आहे. (अतिहर्षानें) असो, आतां बरीक माझी पक्की ओळख झाली.

सिद्ध०—(आपणाशीं) हं हं ३. असें काय. हीं माझी सखी मनोमार्गेंकरून भारद्वाजाश्रमांत गेली आहे. ठीक! वाहवा गे नादिष्टे. ही पक्की ओळख, प्रस्तुत तुला हांसवित्ये आहे; पण आतांच क्षणामध्यें रडवील. (विस्मित होत्साती आकाशाकडे पाहून) हर हर देवा, अन्नार्थ्या आगंतुकाच्या चित्ताला भ्रांतींत देखील लाभाच्या आशेनें बसायाला अन्नदात्याच्या दाराखेरीज दुसरी जागा नाहींच! असो, इच्या पुढें कसकशा चेष्टा होतात; त्याच क्षणभर पाहूं बरें.

शशि०—(आनंदानें एका गालावर हांसून) आहाहा! आकाशभर पसरलेल्या तारागणांत; एकमेकांच्या सन्निध आलेले, पूर्णचंद्र आणि बृहस्पति जसे शोभतात, तसे एथें मंडपभर बसलेल्या मुनिजनांत हे भारद्वाज आणि त्यांचे प्रियशिष्य प्राणवल्लभ दिसताहेत! तर मी पुढें जाऊं काय? (हृदयाकडे) हृदया, आतां नको अवकाश करूं. घाल भागीरथींत उडी. मग वाहून गेलेंस तरी चिंता नाहीं.

**सिद्ध०**–(मनामध्यें) शाबास. (आपल्याशीं) काय चमत्कार आहे. भ्रांतिधर्म कितीं तरी वंचक हे! ज्यांच्या योगेंकरून प्रस्तुत ही माझी मैत्रीण, आपल्या पतीच्या मुखचंद्राचें सौंदर्यचांदणें नयनचकोरांस यथेच्छ चारित्ये आहे, पण मानसिक जेवणानें पोट भरेल काय! आतां क्षणांत शुद्धीवर आली ह्मणजे, "पुढें आलेलें आवडतें अन्न; एकाएकीं कोणीं ओढून नेल्यानें क्षुधिताचा जसा व्हावा; तसा," त्या चक्रवाकांचा तरफडाट मात्र होईल! आणि ज्या शरच्चंद्रानें इचीं आसवें थंड केलीं आहेत, तोच ग्रीष्मार्क होऊन त्याच आसवांस आधण आल्याप्रमाणें कढवील. असो, या सृष्टीच्या धर्मांत; जागृति, स्वप्न आणि निद्रा, या तीनच अवस्था ब्रह्मदेवानें निर्मिल्या, पण त्याजहूनही शाहण्या या मृत्युलोकींच्या मनोराज्य करणाऱ्या कांहीं नादिष्ठ मनुष्यांनीं कल्पिलेली चवथी जी जाग्रत्स्वप्नावस्था; तिनें प्रस्तुत इला व्यापिलें असल्यामुळें; मनोमय बनलेली ही माझी जिवलग, आधींची संकटदशा सरली नाहीं तोंच; पतिसहवासाचीं सुखें क्षणभर अनुभवित्ये आहे! याकरितां तिला अशा संधींत सावध करणें एकपक्षीं नीट नव्हेच. (किंचित् अवकाशानें) छे छे, असें नव्हे. या वेळेस हें जितकें तर्कटेल, तितकें हिला पुढें अधिक दुःखाचें कारण होईल; तर इतक्यांतच शुद्धीवर आणावें हें बरें. (जवळ जाऊन आणि एका हातानें तिच्या गळ्यास विळखा घालून) सख्ये शशिकले, आतां कां बरें उशीर करित्येस? चल आंत.

**शशि०**–(तशाच धुंद झालेल्या दृष्टीनें तिजकडेस

पाहून ) सिद्धविद्ये, अगे; मी आंत जाण्याला अळस करीत नाहीं, पण आधींचा कांहीं इतक्या सलगीचा परिचय नाहीं; ह्मणून माझें हें भित्रें मन भांबावल्यासारखें आपल्यालाच वुजतें आहे !

**सिद्ध०**–( किंचित् हांसून ) ठीक. तुझें मन फारच भित्रें आणि अळशीही आहे ! त्याणें धूम ठोकून जाण्याबरोबर एकदम भारद्वाजमुनींचा आश्रम पवित्रच करावा, नाहीं बरें ? शाबास गे भांगिष्ठे. शशिकले, तूं आहेस कोठें ? आतां, " डोळे उघडून पहा " ह्मणावें, तर तेही झांकलेले नाहींत. तेव्हां तुला ह्मणावें तरी काय ?

**शशि०**–( चहूंकडे न्याहाळून पहातांच खिन्नतेनें गुडघ्यावर आडवें डोकें टेंकून; कांहीं वेळ आंतल्या आंत मुसमुसल्ये, नंतर धुसकारे टांकित आणि अळसत सिद्धविद्येकडे पाहून ) शिव शिव शिव. सिद्धविद्ये, माझें प्रिय करणारी तूच का आहेस ही ! आणि तुजपाशीं कांहीं चेटुक आहे, असें वाटतें. अगे, डोळ्याचें पातें लवलें नाहीं इतक्यांत एकाएकीं मला शंभर कोसांवरून एकटी कशी घेऊन आलीस ?

**सिद्ध०**–अगे आणणारणीनें मीं मात्र चेटुक केलें, आणि त्याप्रमाणेंच जाणारीण तू कांहीं चेटकाळी नव्हेस नां?

**शशि०**–( लाजत लाजत खालीं पाहून स्तब्ध होत्ये, आणि कांहीं अवकाशानें तिचा हात धरून, धुसकारे टांकीत तशीच अळसत हलक्या स्वरानें ) चल बाई ! ( तिजसहवर्तमान उठत्ये ).

**दोघी**–( निघून जातात ).

---

# अंक ६ वा.

## पात्रें ९.

| | | |
|---|---|---|
| १ | भारद्वाज ....... | प्रसिद्ध मुनि. |
| २ | माधव ......... | त्याचा थोरला शिष्य. |
| ३ | कमलाकर ..... | ,, धाकटा ,, |
| ४ | मनोरमा ....... | ध्रुवसंधिराजाची थोरली स्त्री. |
| ५ | सुदर्शन........ | तिचा पुत्र. |
| ६ | विदल्ल ......... | ,, मंत्री. |
| ७ | जरती ......... | तिची दासी. |
| ८ | विद्याधरमिश्र.. | एक तापस ब्राह्मण. |
| ९ | विदूषक........ | एक हास्यकारी. |

## स्थळ—भारद्वाजाश्रम.

( तदनंतर; माधव, कमलाकर, मनोरमा आणि सुदर्शन, प्रवेश करितात, तसेच मध्यें भारद्वाजाचें आसन मांडून; त्याच्या उजव्याकडे माधव आणि डाव्याकडे कमलाकर, त्याप्रमाणें समोर सुदर्शनासहित मनोरमा, असे बसतात ).

**माधव**—( सुदर्शनाकडे ) सुदर्शनराज, आज तुमच्या चित्तास कोणता तरी नवीन वेध असावा असें दिसतें!

**सुदर्शन**—होय माधवपंडितजी. आपण तर्क केल्याप्रमाणेंच आहे खरें. माझा उजवा डोळा तसाच भुज; हे मोठ्या वेगानें फुरफुरताहेत !

**माधव**—हूँ ३. तरीच ! असो; सुदर्शनराज, हीं लक्षणें उत्कृष्ट फल देणारीं असें प्रसिद्धच आहे.

(इतक्यांत विदूषकासह विद्याधरमिश्र प्रवेश करितो, आणि त्याचे तापसयोग्य वेष वगैरे पाहून त्याला सारे नमस्कार करितात).

**विद्याधरमिश्र**– (उभ्यानींच भारद्वाजाच्या आसनापुढें हात जोडून)—

## मालभारा.

**परवैरविहीनवृत्तयेंहो हरवैश्वानरतेजसेनमांसि ॥**
**करवैगुरवेपरात्मसंवि द्वरवैतानिककर्मनिर्मलाय ४४.**

(नंतर माधवप्रमुखांकडे) नमस्कार महाराज.

**मनो०**–(उठून माधवाच्या उजव्याकडे बसल्ये).

**माधव**– (विद्याधरमिश्रास नमस्कार करून नंतर समोर हात दाखवून त्याजकडे) असें बसावें महाराज.

**विद्याधर०**–(विदूषकासह तेथें बसून माधवाकडे) माधवाचार्यजी, सुदर्शनराजे कोठें आहेत?

**माधव**– आपण कोण, आणि कोठून कशासाठीं आलां?

**विद्याधर०**–महाराज, मला विद्याधरमिश्र ह्मणतात. थोडक्याच दिवसांमागें मी, उज्जयिनीमांधातृयात्रा करून, नंतर एथेंही शिवरात्रीच्या उत्साहांत आलों होतों. प्रस्तुत श्रीक्षेत्रराज वाराणसी एथून आलों. कारण कीं, तेथील राजा सुबाहु याच्या शशिकला नामक कन्येचा इच्छास्वयंवर आहे, आणि त्याकरितां राजानें देशोंदेश-

१ दुसऱ्याच्या द्वेषानें रहित अंतःकरणवृत्ति ज्याची, पाप नाशिणाऱ्या (यज्ञिय) अग्नीप्रमाणें तेज ज्याचें, आणि परमात्मज्ञान तशींच श्रेष्ठ यज्ञकर्में; यांच्या योगेंकरून निष्पाप, अशा गुरुकारणें नमस्कार करितों.

च्या राजकुमारांस पत्रें पाठविलीं आहेत; परंतु या आश्रमांतील प्रियशिष्य सुदर्शनराजे यांचे असंख्य सद्गुण कोट्यावधि लोकांच्या मुखांनीं ऐकण्यांत आल्यावरून त्या शशिकलेला सुदर्शनराजांचाच ध्यास लागला; या योगेंकरून जगन्माते दुर्गेनें तिला स्वप्नांत दर्शन देऊन उपदेशिलें कीं, "तू भारद्वाजाश्रिता सुदर्शनालाच वरावेंस." योगें तिला अमर्याद आनंद झाला! परंतु सुदर्शनराजे राज्यभ्रष्ट, यास्तव तिचा पिता सुबाहु त्यांस पत्रही पाठवीत नाहीं, असें समजतांच दुःखही तसेंच झालें! मग ती आपल्या सिद्धविद्यानामक सखीबरोबर राजमंदिरासन्निधचे उपवनांत याविषयींच विचार करीत बसली होती, इतक्यांत त्या उपवनाच्या समीपचे मार्गानें मी जात असतां तिणें मला बलावून आणवून आणि माझा मोठ्या आदरानें उत्थापनादि सन्मान करून, तसाच झालेला सर्व वृत्तांत मला सांगून, पुढें त्यासंबंधि कर्तव्य ती असें बोलली कीं, "जगज्जननी दुर्गेच्या आज्ञेप्रमाणें मीं मनानें सुदर्शनराजांस वरिलें आहे. आतां त्यांशीं माझें लग्न लागलें तरच बरें, नाहीं तर मला देहत्याग करणें प्राप्त आहे. याकरितां मी स्वतःचें पत्र देत्यें, हें सुदर्शनमहाराजांस आपण पोहोंचवून मला जीवदान द्यावें. मी आपली धर्माची कन्या आहें!" महाराज, असें तिचें तें दैन्य ऐकून, माझें अंतःकरण फारच कळवळलें! नंतर तिणें (लखोटा दाखवून) हा लखोटा दिला, तो घेऊन मी निघालों तेव्हां तिला जो आनंद झाला, तो काय अवर्णनीय! मग ही पुढें काय काय करित्ये तें थोडेंसें पहावें; असें मनांत आ-

णून मी तेथें अगदीं लगतच एका मालतीच्या जाळींत गुप्त बसलों. नंतर, "मी त्वरेनें निघून गेलों" असें समजून ती सखीस ह्मणाली, "सिद्धविद्ये, माझ्या पित्यास कळावयाकरितां तू वाड्यांत जाऊन मातेस सांग कीं, तुह्मी माझी हेळसांड केलीत परंतु अंबाबाईनें मला आश्वासन दिलें." मग महाराज, अशी तिची हर्षयुक्त वाणी ऐकतांच सिद्धविद्या किती त्वरेनें आणि आनंदानें निघाली, तें काय सांगू!—

## रथोद्धता.

वृत्ततज्जननिलाकथावया
जायतीत्वरितत्यानृपालया ॥
शोभलीअसुनिहीअनुद्धेता
मार्गधूलिचजशीरथोद्धता ॥ ४५ ॥

या प्रकारें सखी राजमंदिरांत गेल्यानंतर शशिकलेची ती उदासीन मुद्रा पाहून मला वाटलें, पतिविरहिणी ही दुसऱ्या सुखदुःखांची गणनाच करीत नाहीं; याचें सूचक हेंच कीं,—

## भ्रमरविलसित.

संतप्तांगीमनसिजेंशुचिनें
त्रासेनातीदिनकररुचिनें ॥
हर्षेअब्जेंनदरविकसितें
मोहेनाहीभ्रमरविलसितें ॥ ४६ ॥

---

१ राजवाड्याला. २ मर्यादशील. ३ रथाच्या तडाख्यानें उडालेली. ४ मदनाग्नीनें. ५ उन्हानें. ६ कमळानें. ७ किंचित् फुललेल्या. ८ भ्रमरांच्या विलासानें.

परंतु महाराज, जरीं इतकी विरसांतःकरण झाली होती तरी ती मनोहरच. कारण, तिचे गुणच असाधारण!

**मंजुभाषिणी.**

गमनींअसेकरटिशा[1]वकोपमा
अवलोकनींतशिमृगांगना[2]समा ॥
वचनें[3]दुनेंजनचकोर[4]तोषिणी
सुदं[5]तीअशीसततमंजुभा[6]षिणी ॥ ४७ ॥

असो. पुढें कांहीं वेळ गेल्यानंतर ती आनंदानें धुंद झाली, याचें कारण, "जगदंबेच्या आश्वासनाअन्वयें कार्यसिद्धि होईलच" हें तिणें मनांत आणिलें असावें; असें मला वाटलें. अस्तु, नंतर ती चपल गतीनें,—

**विद्युन्माला.**

नीलच्छायांवृक्षस्तोमां[7] मध्येंहिंडेशोभेतेव्हां ॥
मेघां[8]मध्येंजैशीचं[9]चत्तेजोजालाविद्युन्मा[10]ला ॥४८॥

त्यावेळची तिची चर्या महाराज, काय वर्णावी; अतिविचित्र!

**माल्यभारा.**

हरिणीशिंवियु[11]क्तकृष्णसारा
निरखीबावरुनीवनींअधीरा[12] ॥
त्यजिहासविनोदखेळसारा
जशिरत्नोत्तमवस्त्रमाल्य[13]भारा ॥ ४९ ॥

---

१ हत्तीच्या छाव्यासारखी. २ हरिणीसारखी. ३ भाषण, याच चंद्रानें. ४ लोक (याच) चकोरपक्ष्यांस हर्षविणारी. ५ चांगले आहेत दांत जीचे अशी. ६ मंजुळ बोलणारी. ७ वृक्षांच्या समुदायांमध्यें. ८ ढगांमध्यें. ९ तर्तरीत आहे तेजाचा पसार जीच्या अशी. १० विजांची माळ. ११ काळविटाशी वियुक्त. १२ घाबरलेली. १३ वस्त्रें आणि रत्नमाला यांचें ओझें.

नंतर महाराज, तिच्या तात्कालिक चेष्टा पाहून मला वाटलें, तिला त्या आनंदानें भ्रम झाल्यामुळें, "सुदर्शनराजा येथें आला असेल काय ?" असें तिच्या मनांत आलें ह्मणूनच, मोठ्या चपलतेनें,—

### मालिनी.

वळुनिवळुनिचक्राकारदृष्टिप्रचारा
करुनिनदिसतांतोकाढितीअश्रुधारा ॥
क्षणचरणनखानेंभूमिलाकांखणीही
ह्मणुनिचकितहोतीतेथल्यामाळिणीही ॥५०॥

मग महाराज, बहुत वेळ झाला; अजूनही सुदर्शनराजाची स्वारी येत नाहीं, असें ह्मणून कोंडल्यासारखी जी घाबरली, ती तिची अवस्था वर्णायाचें देखील कठिण आहे ! कारण,—

### हरिणी.

वरिवरित्यजीश्वासांनासाग्रदृष्टिकरीखरी ।
हृदयदमनाभोगीयोगीजसामनआवरी ॥
क्षणधरिकरींद्राचीसाचीगतीसुमवाटिके ।
मधिपळभरेंधावेकींवजशीहरिणीठिके ॥ ५१ ॥

तदनंतर महाराज, कांहीं स्पष्ट भरंवसा येईना आणि जगदंबेनें आश्वासन दिलें, हा तर्क तर निःसंदेह आहे. अशा कारणांनीं तिचें चित्त द्विविध झाल्यामुळें,—

### चारुहासिनी.

क्वचित्पडुनिमेदिनीवरी करीरुदनहोयघाबरी ॥
क्षणेंउपवनांतवासिनी दिसेमुदितचारुहासिनी॥५२॥

---

१ मोठ्या हत्तीची. २ फुलबागेमध्यें. ३ भुईवर. ४ हर्षित. ५ मनोहर आहे हसणें जीचें अशी.

अशी तिची चर्याही द्विविध झाली, परंतु चतुरच ती !—

## मत्ता.

तेव्हांधैर्येंस्थिरकरिचित्ता
जाणोंघेईमुनिजनकित्ता ॥
निर्मीऐशीनवलसुवत्ता
हीतारुण्यास्थितिहिनमत्ता[1] ॥५३॥

तथापि महाराज, तो कांहीं खरा योग नव्हेच; यास्तव क्षणांत ती पुन्हा चंचलवृत्ति झाली, आणि जेथून या आश्रमाचा मार्ग दिसतो, अशा उपवनप्रदेशांतच तिणें हालत्या आंदोलकाचें विद्याबंधुत्व स्वीकारिलें; तेव्हां ती,

## पुष्पिताग्रा.

सततमुनिवनाय[2]नासिपाहे
विकसितनेत्र[3]युगाप्रमोद[4]वाहे ॥
ह्मणुनिगमलिचालतीउदग्रा[5]
जशिनवमा[6]धविकाचपुष्पिता[7]ग्रा ॥ ५४ ॥

नंतर महाराज, तेथूनही सुदर्शनराजा दिसेना ह्मणून ती,

## मत्तमयूरा.

स्वप्नामध्येंदेखिलिजीतत्[8]सममूर्ती
वारंवारप्रेमभरेंआणुनिचित्तीं ॥
तन्नामाचाघोषकरूनीनिजवाचे
थैथैथैथैमत्तमयूरापरिनाचे ॥ ५५ ॥

---

१ उन्मत्त. २ भारद्वाजाचे तपोवनाच्या मार्गास. ३ अगदीं उघडले आहेत आपले दोन्हीं डोळे जीणें अशी. ४ आनंदास. ५ उंच अग्राची शशिकलापक्षीं; मस्तक उंच करून मार्गाकडे पाहणारी. ६ नवी मोगऱ्याची वेलच. ७ फुललीं आहेत अग्रें जीचीं, अशी. ८ तिच्या सारखी.

असो, तिच्या साऱ्या चर्येचें रहस्य इतकेंच कीं, प्रस्तुत तिला स्वप्नदृष्टार्थाखेरीज दुसरा कोणताही भरंवसा नाहीं; तथापि ती, "सुदर्शनराजा मोठा कुलीन आहे, तो अशा संकटव्याकुले माझा आव्हेर करणार नाहीं." असें, आपल्यास आपणच धैर्य देऊन, कशी नखांबोटांवर काळ कंठित्ये आहे! फार काय सांगावें महाराज,—

### पृथ्वी.

त्यजूनिगृहअन्नहींअतिउदासतीकाननीं[1]
वसेधरिसुदर्शनाह्वय[2]मनींतसाआननीं[3] ॥
जरीउपवनांतरींधडपडेघनींवीजशी ॥
तरीधृतिनगाश्रयें[4]डळमळेनपृथ्वीजशी ॥५६॥

(इतकें ऐकतांच अतिहर्षित सुदर्शन त्वरेनें पडद्यांतून बाहेर येऊन मनोरमेजवळ बसतो).

**माधव**—(त्याचें चांचल्य पाहून विद्याधराकडे हात पसरितो).

**विद्याधर**—(त्याच्या हातावर लखोटा टाकितो).

**माधव**—(लखोटा फोडून वाचितो):—

"स्वस्तिश्री विमलललितगुणजलधि[5] भारद्वाजमुनिप्रियशिष्य श्रीदुर्गापालितपुत्र अयोध्याधिपति सुदर्शनराज महाराज स्वामींच्या सेवेशि,

दासीभूतशशिकलेचीं, चरणीं सहस्रशः लोटांगणें!

---

१ उपवनांत. २ सुदर्शन हें नांव ज्याचें असा तो राजपुत्र मनांत, आणि सुदर्शन हेंच जें नांव तें. ३ मुखांत. ४ पृथ्वीपक्षीं, तिचे धारणार्थ जे पर्वत त्यांच्या आश्रयानें; राजकन्यापक्षीं धैर्य हाच जो पर्वत त्याच्या आश्रयानें. ५ निर्मळ सद्गुणांचा समुद्र.

विनंती, मी आपल्यास ज्यांची धर्मकन्या ह्मणविल्यें, ते विद्याधरमिश्रजी माझी सारी वार्ता स्वामिचरणांपुढें निवेदितीलच. आतां मला प्रियतमांचा साक्षात् सहवास नसल्यामुळें, फार तसदी दिल्यासारखें लिहीन तर, तब्येत जाईल कीं काय, अशी शंका येऊन भय वाटलें, तथापि समयास अनुसरून स्वतःच्या अभिप्रायांतील सारांश हाच लिहून कळविला आहे कीं,—

## शार्दूलविक्रीडित.

तातेंमोकलिलीतशीजननिनेंहीदीनत्राणीसुता ॥
हेतु:स्वाविणडागलागतिजिवासोसूंकशीयाअतां ॥
स्वामींच्याविरहेंकरूनिअसतांआधींचमीपीडिता ॥
गांजीमन्मथत्यांतदावुनिमलाशार्दूलविक्रीडिता ॥५७

असें असून, जशी माझ्या मातापित्यांनीं उपेक्षा केली तशी स्वामींनींही केल्यास ती माझी हत्याच होय. तर अशा हत्येचें कर्तृत्व कोणास अवलंबून राहील, याविषयीं लक्ष पोहोंचवून या निराश्रय दीन दासीचा अंगीकार केला पाहिजे! सुज्ञशेखरांस बहुत काय लिहिणें हे विनंती.

**सुदर्शन**—(उतावळीनें माधव आणि मनोरमा यांजकडे हात जोडून) आज्ञा झाली ह्मणजे बोलतों.

**माधव**—(आनंदानें) अरे, बोलबोल सुदर्शनराजा!

**सुदर्शन**—(विद्याधरमिश्राकडे हात जोडून) मिश्रजी, आपण या कार्याविषयीं बहुत श्रम घेतले आहेत, परंतु हें आरंभिलेलें कृत्य योग्य अवकाशांत सांग सिद्ध

१ मदन. २ वाघाचें उड्डाण वगैरे भयंकर क्रीडित.

झालें पाहिजे; यास्तव ह्मणतों, आपण सत्वर परत जाऊन आपलें यशस्वित्व प्रकट करावें.

**विद्याधर**—(हर्षानें) जगज्जननीकी जय! (उठतो).

**सुदर्शन** आणि **मनोरमा**— (उठून नंतर त्यास वंदून उभे राहतात).

**विद्याधर**—साम्राज्यमस्तु.

**माधव** आणि **कमलाकर**—(उठून विद्याधराकडे) नमस्कार.

**विद्याधर**—(हात जोडून त्या दोघांकडे) नमस्कार महाराज.

**माधव**—(गहिंवरून) थोडक्याच प्रसंगानें; रसिकता, सरलता इत्यादि महत्त्वाच्या अंगांनीं परिपूर्ण, असा आपला सुगरपणा जो दिसून आला, तो आतां आमचे (छातीस हात लावून) हे देह आहेत तोंपर्यंत हृदयांतून बाहेर जाणार नाहीं! ह्मणून ह्मणतों, या निमित्तानें झालेला परिचय वृद्धिंगत असावा.

**विद्याधर**०—(त्याजकडे हात जोडून गहिंवरत) महाराज, आपण महापंडित, ह्मणून आपल्या शीलाप्रमाणें मला असें गौरव देतां, परंतु समर्थ गुरुमहाराज भारद्वाज, त्यांचे प्रियशिष्य आपण; तेव्हां मजसारख्या अल्पविद्यावर आपला अनुग्रह असावा. (निघून जातो).

**मनो**०—(त्वरेनें सुदर्शनाकडे) अरे, तू खरेंच जाणार कीं काय ?

**सुद**०—(चकित होऊन) खरेंच ह्मणजे ? आतांच आपली आज्ञा घेऊन विद्याधरमिश्रजींशीं निश्चयरूप बोललों तें आपण सर्वांनीं ऐकिलेंच आहे.

**मनो०**–( घाबरून ) अरे सुदर्शना, तू शाहाणा शाहाणा ह्मणून अगदीं वेडा झालास बाबा. हें रे काय साहस केलेंस? अरे, तेथें युधाजित् येईल! बरें, तुला सहाय तरी कोणी आहे? सर्व राजे संतोषानें अथवा असंतोषानें कां होईना? पण युधाजिताचे सोबती; यास्तव मी साफ सांगत्यें, तू जाऊं नकोस. तुझी ही मूलबुद्धि चांगल्या परिणामाची नव्हे.

**माधव**–( आपल्याशीं ) निर्भयचित्तानें विवाहास जाण्याविषयीं मनोरमेला या समयीं मीं उत्तेजन द्यावें खरें, परंतु एव्हां नको. हा सुदर्शनच आपल्या अंतःकरणांतील धैर्यादिवैभव; बुद्धिकौशल्यानें तिच्या मनांत कसें भरितो तें पाहावें बरें! ( कौतुकानें गुप्त हास्य करीत स्तब्ध राहतो ).

**सुदर्शन**–( तिजकडे हात जोडून ) महाराज मातुश्री, जगन्माता दुर्गा सारें निर्विघ्न करील! कांहीं काळजी करूं नये, आणि भय वाटत असेल तर आपण स्वस्थपणें एथेंच रहावें.

**मनो०**–नव्हे नव्हे सुदर्शना! अरे, ज्या काळीं आपल्यावर आकाश कडकडलें, त्या वेळेस मी शोकानें अगदीं अंध झाल्यें, पण तशाहीं प्रसंगीं तू हीच आपली दृष्टि, काठी आणि गति, असें समजून इतक्याच आधारावर चाचपडत चाचपडत मुनिमहाराजांच्या या आश्रमांत येऊन, इतकीं वर्षें निर्भयचित्तानें घालविलीं! आणि याचा अनुभव पाहात नाहींस का? तू क्षणभर माझ्या दृष्टीस पडेनासा झालास, तर अंधाची काठी सांपडेनाशी झाली; ह्मणजे तो घाबरतो, तशी मी लागलीच बावरी होत्यें! असें

असून; सुदर्शना, तू अंतःकरण निष्ठुर करून मला, "एथेंच रहा" असें ह्मणतोस, आणि हात पाय कसे मोडतात; याचा अनुभव पाहण्याकरितां स्वतः कड्यावरून उडी घालावी, तसा एथून जाण्याविषयीं दुराग्रह करितोस! (गहिंवरून) परंतु बाबा,–

पद (राग मधुमाल सारंग).

मजटांकुनिजाशीकैसा तूमाझ्याप्राणविसाव्या ॥ ध्रु० ॥ अंतरल्येंजरिमीअपुल्या राज्यालाअणिसदनाला ॥ कंठिलातरिमींकाळ पाहूनीतववदनाला ॥ कैसातूजाशीजेथें पावशीनिजकदनाला ॥ जरिअसतीतुजबहुविद्या असहायातरित्यासद्धया शत्रूशींकेविंदिसाव्या ॥ मजटां० ॥ १ ॥ कर्मअसेंस्वीकारावें आरंभुनिमगनकचावें ॥ बोलणेंतेंबोलावें जेंन्यायींयांसिरुचावें ॥ खाणेंहीतैसेंखावें नचदुखतांजठरिंपचावें ॥ ऐशायागुरुजनउक्ति आणखींत्यांतिलयुक्ति ॥ बासंततहृदयिंवसाव्या ॥ मजटां० ॥ २ ॥६८॥

सुदर्शन–(हात जोडून) महाराज मातुश्री, हें काय बरें? आपण असें बोलून माझ्या बुद्धीस मोह करितां! अहो, थोरांची वाणी मोहविनाशक असावी. तर आईसाहेब, धीर धरा. आतां अगदीं फाटा फोडूं नका.

मनोरमा–(त्रासूनहो आर्जवानें) अरे, असें कसें बोलतोस सुदर्शना? तेथें जाणें अनर्थकारक; असें स्पष्ट दिसत असूनही,–

---

१ आपल्या नाशाला.

पद.–(चाल दामाजी).

कैसेंहेंसाहसकरिशीताता ॥ कारणनिजघाता॥ध्रु.॥
शाळातुजमुनिचीवर्षेंसोळा ॥ तरितूकितिभोळा ॥
काळाअनुसरुनीसर्वांताळा ॥ घालावाबाळा ॥
हाळाहळ[1]समत्यारिपुजनमाळा ॥ प्रळयाग्निज्वा-
ळा ॥ पोळायातुजलाहोतिलगोळा ॥ सोडीहाचा
ळा ॥ काळापरि[2]अरि बाळाघालिल माळातुजला
कशिराजसुता ॥ कैसेंहें० ॥ १ ॥ टाळादेउनियामु
निसदयाळा ॥ मिळशीभूपाळा ॥ ढाळासुरतरुचा[3]-
सोडुनिवाळा ॥ घेशीआशाळा ॥ भोळाचिंतुनिही-
नादिसेवेळा ॥ योग्यअशाखेळा ॥ डोळाबघत्येंतुजहृ
त्कजनाळा[5] ॥ हामजसोहाळा ॥झाळायाघा याळा
देवापाळा[4]घालूं यामुनिभवता ॥ कैसेंहें ०॥२॥५९॥

तर सुदर्शना, तू एथें आलास तेव्हां तुला सहावें वर्ष होतें; त्या काळापासून आजपर्यंत सारखा विद्याभ्यास करूनही असा अतिसाहस करण्यास प्रवृत्त होतोस! आतां तू वीस एकवीस वर्षांचा मुलगा लहान काय रे?

सुदर्शन–महाराज मातुश्री, आपण बोलतां हें ब्राह्मण लोकांस नीट आहे, परंतु क्षत्रियांस योग्य नव्हे. यास्तव,–

## अंजनीगीत.

जेंहोणेंतेंहोइलमाते ॥ उपायकरुनीहिटळेनातें ॥
सिद्धांतायामुनिकुलगातें ॥ शिष्यांबोधाया ॥ ६० ॥
अवश्यजावेंयाकारितांमीं ॥ क्षत्रियधर्माहेंबहुनामीं ॥
होइलमाझीदुर्गानामीं ॥ भक्तिजरीआहे ॥ ६१ ॥

---

१ विषासारख्या. २ शत्रु. ३ कल्पवृक्षाचा. ४ देवाला. ५ (माझ्या) हृदयकमळाच्या देंटा.

देतीझालीतीवरमजला॥ ह्मणुनिभक्तहाजायासजला॥
आश्रयनसतांसाहसिंधजला ॥ ऐसाकोणअसे ॥६२॥

**मनो०**–( त्याचें तें धैर्यादि वैभव पाहून हर्षानें ) बरें असो; पण सुदर्शना,–

## अभंग.

तुजलासोडूनीया एकक्षणभरी ॥
नसेचित्तधारी बाळामाझें ॥ १ ॥
यास्तवमींयेत्यें तुझ्याबरोबर ॥
सफळहोवोवर अंबिकेचा ॥ २ ॥

( नंतर आकाशाकडे पाहून ) हे जगन्माते दुर्गे, तू या बालकाचा पक्ष धरण्यास याचे कोणते योगयाग पाहिलेस? तें कांहीं एक नसून, तू करूणासागर ह्मणूनच त्वां आपल्या,–

ऐशादासावरि केलीसीहीदया ॥
वर्णूकायबया मायातुझी ॥ ३ ॥

आणि मुळीं या बाळाला तूं आपली भक्ति दिलीस, तेव्हां त्याला सर्व लोक कां न मान देतील ! कारण,–

तुझियाभक्तीवरि ठेवीजोविश्वास ॥
होयतोविश्वास वंदनीय ॥ ४ ॥ ६३॥

**सुदर्शन**–( अतिहर्षानें ) आईसाहेब, आतां नीट आहे. मातुश्रींचा संतोष, हेंच कार्यसिद्धीचें मूळ. आपण आणि दुर्गा, हें मला कांहीं भिन्न नाहींत. ( माधवाकडे हात जोडून ) महाराज आचार्यजी, आपण आह्मांस हातीं धरल्याप्रमाणें आतां मार्गचालीस लाविलें पाहिजे.

**माधव**–(सुदर्शनाकडे) ठीक ठीक, बहुत उत्तम. (मनांत) भला अम्मल बसविला. शाबास!

(इतक्यांत भारद्वाज प्रवेश करितो).

**सर्व**–(उठून त्यास वंदितात).

**भारद्वाज**–(आसनारूढ होऊन सर्वांकडे) कल्याणमस्तु. बसा बसा.

**सर्व**–(यथायोग्य बसतात).

**भारद्वाज**–(आनंदानें हास्य करून सुदर्शनाकडे) सुदर्शना, एथील प्रस्तुतचा त्वद्विवाहसंबंधी सर्व वृत्तांत समाधिद्वारा मला समजला! (मनोरमेकडे) मनोरमे, आतां अगदीं अवकाश करूं नका, अशा संधीस मनाचा उत्साह; हाच मुहूर्त, तर घ्या देवाचें नांव! उठा. (सुदर्शनाकडे) सुदर्शना, चला आतां, मनाजोगी नवरी वरा; नंतर राजपदाधिरूढ होऊन सर्वांस आनंदित करा!

**सुदर्शन**–(हात जोडून) आज्ञा. (विदूषकाकडे) वनचरा, तू येतोस ना रे?

**विदूषक**–सुदर्शनराज, मला असें विचारावें कशास? आणि त्यांत अशा उत्साहाच्या वेळेस तुमच्या पुढें दोन पावलें!

**मनो०, सुद०, विदल्ल, दासी, आणि विदूषक**–(भारद्वाजादिकांस वंदितात).

**भार०, माध०, कमला०**–(एकदांच) कल्याणमस्तु.

**मनो०, सुद०, विद०, आणि दासी**–(पडद्यापर्यंत हळू हळू जाऊन चकित होत्साते एकमेकांकडे टकमका पाहातात).

**मनो०**—(माघारी वळून दीनदृष्टीनें भारद्वाजाकडे पहात पहात मंदगतीनें त्याजपुढें येऊन आणि घाबरून धुसकारे टांकीत रुदनस्वरानें) गुरुमहाराज, माझें माहेर आणि सासरें एकदांच बुडालें! नंतर राहिलेल्या आयुष्याचे अमर्यादखेदानें मोठे भासणारे उदास दिवस मी कोणत्या प्रकारानें कोठें कंठूं! अशा घोर संकटांत पडल्यें असतांही आपल्या आश्रयानें त्या दोहों ठिकाणांहूनही निर्भयचित्तानें आजपर्यंत होत्यें! (खळखळां रडून) पण आतां या पायांची शीतळ छाया सोडून पुन्हा तशाच कडक उन्हांत जाणें आह्मांस प्राप्त झालें! (हुंदक्यानें) आतां तेथें युधाजितानें घेरलें, ह्मणजे आह्मां अनाथांला कोणी वळचणीशीं देखील उभे राहूं देणार नाहीं! मग मी कोणाला शरण जाऊं? (डोळ्यांस पदर लावून अकसाभोकशी फुंदत्ये).

**भारद्वाज**—(गहिंवरून) मनोरमे, आतां कां बरें असें दीनवाणें बोलत्येस? अगे, हें सहवास तुटल्याचें खेदरूप फळ एका जागारासच भोगावें लागतें असें नाहीं. या अन्वयें तुमच्या वियोगानें एथील सर्वांसही कांहीं काळ दुःख सोसावें लागेल आणि असें असतांही मी अंतःकरण निष्ठुर करून तुह्मांला जा ह्मणतों, याचें कारण, तुह्मी मला जड झालां आहां, असें नाहीं. जगदंबेनें कोणतें कमी केलें आहे? कंदमूलें आणि वल्कलें; यांणीं देहसंरक्षणनिर्वाह करून, सहस्रावधि विद्यार्थी एथें आनंदानें वास करिताहेत. परंतु मनोरमे, तुह्मी पिढीजादे लौकिकवान् क्षत्रिय! तुझ्या पुत्राचा प्रभाव या भूमंडळावर, प्रजासंरक्षण इत्यादि सांग स्वधर्माच्या संपा-

दनानें सफल झाला पाहिजे; तर त्याचा मार्गच हा, यास्तव तू कांहीं कष्टी होऊं नकोस. जमन्माता दुर्गा तुह्मांस कांहीं एक कमीं पडूं देणार नाहीं.

**मनो०**—तथास्तु. (त्याच्या चरणावर मस्तक ठेवून सुदर्शनादिकांसहवर्तमान निघून जात्ये).

**भार०**—माधवा, काय चमत्कार हा! अरे, मनोरमा अयोध्येच्या राजाची राणी, आणि आह्मी एथें अरण्यांत वास करणारे विरक्त! कशास कांहीं संबंध? पण सहवासानें अंतःकरणपटांच्या वृत्तिरूप पदरांची कशी असुट गांठ पडत्ये पहा! मघांपासून मी आपल्या चित्ताला कितीं आवरतों आहें; तरी, ही मनोरमाप्रमुखांच्या बिऱ्हाडाची जागा रिकामी पाहतों, आणि त्यांच्या त्या दैन्यदर्शक मुखमुद्रा मनांत येतात, तेणेंकरून पोटांत भारी भडभडतें रे!

**कमलाकर**—(गहिंवरून) गुरुमहाराज, या प्रसंगानें आपणांसही इतकें वाईट वाटलें, तेव्हां; वावटळीच्या झपाट्यांत सांपडलेल्या पुष्पाच्या पाकळीप्रमाणें निराधार ती मनोरमा आतां मार्गानें अरण्यरोदन करून मनांतल्यामनांत धडपडत असेल! तेथें तिची कोण दाद घेईल! (किंचित् मुसमुसून) अरे रे रे रे!! गरीब बिचारी! एथून ओढून टांकिल्यासारखी मुकाट्यानें चालती झाली! (अंगवस्त्राच्या पदरानें तोंड झांकून घेऊन खळखळां रडतो).

**भारद्वाज**—(त्याला हातानें जवळ ओढून घेतो आणि त्याच्या तोंडावर हात फिरवून नंतर त्याचे डोळे पुसून) हा खुळ्या! कमलाकरा, तू आजूनही; पोकळ सुखदुःखां-

चा भास करणारे जे सृष्टिधर्म, त्यांच्या आहारीं राह-
णारा अगदीं अल्लड बच्च्या आहेस! अरे, मनोरमा बाय-
कोमनुष्यच, परंतु तुला मुनी व्हायाचें आहेनां? तर
बाबा, जसा समुद्राला, सूर्य तसाच वडवाग्नि, हे युगेच्या-
युगें क्षीण करिताहेत, आणि चंद्र तशाच भागीरथीप्र-
मुख नद्या त्याला पुष्ट करिताहेत, तथापि महागंभीर
तो पारावार! तिळभर देखील अमर्याद होत नाहीं, तसे
आपण या भासरूपी सृष्टिधर्माला लवमात्रही वश होऊं
नये! लौकिकानुरोधानें जितक्यास तितकें; नाटकापुरतीं
सोंगाड्या! आतां कोणी ह्मणतात कीं, "देह काय बा-
पुडा; जेथें ठेविला तेथें राहील, पण मन कोठचें रा-
हणार!" परंतु तें अगदीं खरें नव्हे. कारण, अनि-
वारा मनोविकारांला खणून काढण्यास; "कांहीं काला-
पगम" हें पाचक औषध केवढें जबर्दस्त! याचा सर्वांला
अनुभव आहेच, आणि याचें निदानही असें कीं, अंतःक-
रण ज्ञानरूप खरें, तरी त्याचीं बाह्य विषयांवर संचार
करण्याचीं द्वारें जीं नेत्रादि इंद्रियें तीं पडलीं जड!
याकरितां, सहवास तुटला ह्मणजे; परस्परांच्या हृदयग्रं-
थीला दृढ करणारे जे मनाचे प्रत्यक्षदर्शनादि व्यापार, ते
अर्थातच अगदीं कुंठित होतात, यामुळें अंतःकरणवृत्तीचा
स्नेहभाव दिवसानुदिवस सहजच क्षीणता पावतो! आतां
एखाद्याचें अधीर मन शोकाच्या दर्पानें कासावीस हो-
ऊन फारच उसळ्या घेतें, त्या समयीं; दीपकलिकेचा
आणि वातावरणाचा संबंध तोडिल्याबरोबर जशी ती
मालविली जात्ये, तसा त्याचा आयुःसंबंध तुटला अ-
सेल तर कदाचित् तो नाशही पावतो! परंतु कमला-

करा, मनोरमेवर जगदंबेचा कृपाकटाक्ष झळकतो आहे, या अन्वयें ती पहा थोडक्याच दिवसांत विजयी होऊन येईल! तर तुह्मी कोणीही तिजविषयीं फार कष्टी होऊं नका बरें! (सर्वांकडे) चला आतां देवालयांत जाऊन भगवद्दर्शन करूं, ह्मणजे तेणेंकरून सर्वांचीं चित्तें कांहीं समाधान पावतील!

**माधव**—उत्तम आहे.

**सर्व**—(भारद्वाजाबरोबर निघून जातात).

---

## अंक ७ वा.

### पात्रें ३०.

१ **विद्याधरमिश्र**.... एक तापस ब्राह्मण.
२ **विदूषक**.......... हास्यकारी.
३ **सुबाहु**............ काशीदेशचा राजा.
४ **कंचुकी**.......... त्याचा भालदार.
५ **न्यायसागर**....... ,, मंत्री.
६ **शार्दूलध्वज**....... ,, सेनापति.
७ **शत्रुजित्**.......... सुदर्शनाचा सापत्न बंधु.
८ **युधाजित्**......... उज्जयिनीदेशचा राजा.
९ **केरलाधिपति**..... केरलदेशचा राजा.
१० **अंगाधिपति**....... अंगदेशचा ,,
११ **वंगाधिपति**....... वंगदेशचा ,,
१२ **कारूषाधिपति**... कारूषदेशचा ,,
१३ **मद्रेश्वर**........... मद्रदेशचा ,,
१४ **सिंधुदेशेश्वर**...... सिंधुदेशचा ,,

१५ माहिष्मतीपति... माहिष्मतीपुरीचा राजा.
१६ पांचालराजा..... पांचालदेशचा ,,
१७ करनाटकेश्वर.... करनाटक देशचा ,,
१८ चोलेश्वर......... चोलदेशचा ,,
१९ वैदर्भराजा....... विदर्भदेशचा ,,
२० सुदर्शन. ......... शत्रुजिताचा सापत्न बंधु.
२१ मनोरमा......... त्याची माता.
२२ विदल्ल............ तिचा मंत्री.
२३ जरती............ तिची दासी.
२४ पद्मावती... ...... सुबाहुराजाची स्त्री.
२५ शशिकला........ तिची कन्या.
२६ अनुष्ठिति......... पुरोहिताची स्त्री.
२७ सिद्धविद्या.... ... तिची कन्या.
२८ मंत्राकरदीक्षित... सुबाहुराजाचा पुरोहित.
२९ गणिका........... एक वेश्या.
३० मंगलायन........ पुरोहिताचा हस्तक.

---

## स्थळ—काशीनगरींतील राजवाडा.

(तदनंतर विद्याधरमिश्र प्रवेश करून, इकडे तिकडे पाहतो; इतक्यांत विदूषकही येतो).

विदू०—कां मिश्रमहाराज, आपण केव्हांसे आलां, आणि असे चिंताग्रस्त कां?

विद्याधरमिश्र—अहो, भारद्वाजाश्रमांत झालेला सर्व वृत्तांत शशिकलेला त्वरित कळविला पाहिजे, आणि मजसारख्या अपरिचितांनीं राजमंदिरामध्यें सभास्था-

नाखेरीज दुसऱ्या स्थळीं जाणें योग्य नव्हे, तेव्हां कसें करावें या विवंचनेंत मी आहें.

विदू०—अँ३ः इतकें कशास? तुह्मी एथून गेल्यापासून तिचा डोळा सारखा तुह्मांकडे होता, या अन्वयें तिणें आपल्या दिवाणखान्यांतून रस्त्यांतच तुमची हर्षयुक्त मुखमुद्रा पाहून आनंदनृत्याचा थैथयाट उडविला आहे.

विद्या०—(हर्षानें) बरें तर, मोठें काम झालें!

(इतक्यांत न्यायसागरमंत्री आणि शार्दूलध्वजसेनापति यांसहवर्तमान सुबाहुराजा प्रवेश करितो, नंतर ते सारे विद्याधरास नमस्कार करून यथायोग्य बसतात).

विद्याधर—साम्राज्यमस्तु.

सुबाहु—(न्यायसागराकडे) प्रधानजी, अयोध्याधिपति शत्रुजित्, उज्जायिनीपति युधाजित्, तसाच केरलाधिपति, अंगाधिपति, वंगाधिपति, कारूषाधिपति, मद्रेश्वर, सिंधुदेशेश्वर, माहिष्मतीपति, पांचालराजा, करनाटकेश्वर, चोलेश्वर, वैदर्भनृप, इत्यादि राजपुत्र वगैरेंच्या स्वाऱ्या आल्या त्या आह्मी सर्वांनीं वेशींच्या गच्च्यांवरून पाहिल्याच. शहरासभोंवती डेरेराव्हट्यांच्या तळांचा "पूर्णचंद्राला खळें पडतें तसा" चमत्कार दिसतो. असो, पण प्रधानजी, युधाजित् वगैरेंचें काय सैन्य तसेंच ऐश्वर्य; आणि सुदर्शनाचा एक रथ, तशीं चारच मनुष्यें त्यांतही विदल्लप्रधान सारथि, तो इतका वृद्ध कृश असा असून त्याणें जेव्हां त्या राजमंडळांत रथ घातला तेव्हां, पांगळ्या सारथ्यानें चालविलेल्या सूर्यरथाचें दर्शन होण्याबरोबर सारीं नक्षत्रें आणि चं-

द्रादि ग्रहही निस्तेज होतात, तसें सारे राजे दिपून आपआपल्यांत सासुरवाशिणीसारखे कुरकुरूं लागले. असो, पण तो सुदर्शन आमचें पत्र गेल्यावांचून आला कसा! अथवा आमच्या लग्नपत्रिकेस मान देण्याकरितां भारद्वाजमुनींनीं आपला प्रिय शिष्य ह्मणून पाठविला असेल. तर त्याजकडेही कोठी, गाई, ह्मशी, चंदी, वैरण वगैरे बंदोबस्त ठेवा; आणि त्या सर्वांस कचेरीला लवकर येण्याविषयीं सूचना करा.

न्यायसागर—(हात जोडून) आज्ञा. (निघून जातो).

( इतक्यांत पद्मावती प्रवेश करिते ).

सुबाहु—( तिला आपल्या हातानें डाव्याकडे बसवून तिजकडे ). कां तुह्मीं आह्मांवर मोठी सुस्ती ठेविली होती, परंतु झालें आतां?

पद्मावती—झालें इतकें दिसतेंच आहे; पण ते सारे राजे सुदर्शनाकडे पाहून कुजबुजले, तेव्हां त्यांच्या मुखमुद्रा पाहिल्या नाँ? आणि शशिकलेनें सुदर्शनास पाहिल्यापासून तिला तर अगदीं आकाशपाताळ एक होऊन गेलें आहे!

सुबा०—असो, आतां जगदंबा काय करील तें खरें, तथापि शशिकलेला एकदां समजावून सांगितलें पाहिजे; याकरितां तिला इकडेस पाठवून द्या.

पद्मावती—ठीक आहे. ( निघून जाते ).

विदू०—( सुबाहूकडे ) सुदर्शन राजा पाहिला नां महाराज?

सुबाहु—होय पाहिला बाबा. तो काय कार्तिक्या पूर्णिमेचा चंद्र!

( इतक्यांत शशिकला प्रवेश करिते ).

**सर्व**—( खडी ताजीम घेतात ).

**सुबा०**—( शशिकलेला आपल्या जवळ घेतो ).

**सर्व**—( यथायोग्य बसतात ).

**सुबा०**—( शशिकलेच्या पाठीवरून हात फिरवून ) बया, तुझा सुदर्शनाला वरण्याचा निश्चय समजण्याच्या पूर्वी आमंत्रण केल्यावरून आलेल्या राजेमंडळींत कुरकूर चालू झाली, आणि तो सुदर्शन विशेषतः युधाजिताशीं वांकडा; तेव्हां तुझें मत अनर्थमूल व्हावयास करितें, यास्तव कचेरी भरली ह्मणजे तींत येऊन साऱ्या राजपुत्रांस विचारपूर्वक पहा, आणि हा बखेडा मोडेल असें कर.

**शशिकला**—हे जनका, आपण ह्मणतां "अनर्थमूल" हें खरेंच, पण त्यास अन्यायी लोकांनीं भ्यावें, तसेंच अनुभवावें. हा इच्छास्वयंवर आहे; तेव्हां आपण कांहीं कोणाचा अपराध करीत नाहीं! आणि तें कसेंही असो पण; आतां प्रसंगास अनुसरून थोडेंसें निर्लज्जपणें बोलत्यें. बाबा, माझ्या मनांत दुसरें कांहीं येतच नाहीं!—

## लावणी.

**तान्हेलेंममनचातकशिशु सकलजनमनोहरा ॥ चिंतिसुदर्शनजलधरा[1] ॥ ध्रु० ॥ ज्याचीकीर्तीपृथिवीवर्ती इतक्याधाकुटपणीं ॥ योग्यतयाचीविनवणी ॥ १ ॥ माझ्याचपलमतिलाझाली तत्कीर्ती गत्रसणी ॥ एकरूपदोघीजणी ॥ २ ॥ वरदेती ज्यामुनिगणआणिक साक्षाद्दाक्षायणी[2] ॥ ह्मणुनत याचीघोकणी ॥ ३ ॥ स्वधर्मपंडितसकलधरित्री**

१ सुदर्शन ( हाच कोणी एक ) मेघ. २ जगदंबा.

पतितनयशिरोमणी ॥ कोणतयाचेगुणगणी ॥ ४ ॥ वाटपाहतांत्याचिनलागे पापणिशींपापणी ॥ कितितरिहोहीशाहणी ॥ ५ ॥ योग्यकारणाविणेंव हातां कांअरिंचीकाचणी ॥ नाहिततेंतुमचेधणी ॥ ६ ॥ यन्महिमातेइतरनृपात्मज गातिज्ञशादळपिणी ॥ अश्राव्यचित्यांचींजिणीं ॥ ७ ॥ नृपसुत सुंदरगुणगणमंदिर जावाईतोकरा ॥ आणिसुखवा यालेंकरा ॥ ८ ॥ तान्हेलें ॥ १ ॥ ६४ ॥

( इतक्यांत न्यायसागरमंत्री प्रवेश करितो).

**न्यायसागर**—(हात जोडून सुबाहूकडे घाईनें ) महाराज, आली राजेमंडळी.

**सर्व**—( चटकर उठतात ).

**शशि०**—( निघून जाते ).

(इतक्यांत मंगळायनासह मंत्राकरदीक्षितानें प्रवेश केल्यानंतर ज्यांचे भालदार एकदम पुकारताहेत, असे सर्व राजे प्रवेश करितात ).

**सुबाहु**—( सामोरा जाऊन त्यांस आणितो ).

**न्यायसागर**—(एका बाजूस मध्यें सुदर्शन आणि केरलाधिपति, तसाच दुसऱ्या बाजूस मध्यें शत्रुजितासहवर्तमान युधाजित् आणखी त्यांच्या समीप अंगाधिपति, वंगाधिपति, खेरीज राजे वगैरे यांस यथावकाश बसवितो ).

**युधाजित्**—(सुदर्शनास पाहतांच क्रोधानें सुबाहूकडे) सुबाहुराजा, अरे; (सुदर्शनाकडे हात करून) हा भ्रष्टराज्य एथें आला आहे, यास तू कन्या देणार कीं

---

१ ज्याचा महिमा. २ ऐकण्यास अयोग्य.

काय? आणि या अनधिकाऱ्याला आमंत्रण करण्याविषयीं तुला कांहीं लाज नाहीं वाटली?

**मंत्राकरदीक्षित**—युधाजित्‌राजा, अरे; आह्मी भारद्वाजमुनींस शिष्यमंडळीसुद्धां येण्याविषयीं लिहिलें होतें. हा अन्याय असें तू समजतोस वाटतें! आणि, "सुदर्शनास कन्या देतोस कीं काय." असें सुबाहुराजाला विचारितोस, तर आह्मीं तुह्मां सर्वांस लग्नपत्रें पाठविलीं त्यांत इच्छास्वयंवर निश्चित केल्याविषयीं लिहिलें आहे, तेंही तू विसरलास काय?

**युधा०**—( डोळे वटारून राजेमंडळीकडे ) अरे राजेहो, या सुबाहूचा मनोदय मला नीटसा दिसत नाहीं, यास्तव तुह्मांसमक्ष बजावितों, ( सुदर्शनाकडे हात करून ) हा राज्यभ्रष्ट आगंतुकांत शिरून आला आहे खरा, परंतु एथें आमच्या समोर,—

## साकी.

**सुबाहुनृपकीअबीसुदर्सन अपकोंलेगाबेटी ॥**
**तोसमजोतुमजुधाजीतनें इस्कीगर्दनछाटी ॥ ६५ ॥**

(सुबाहूकडे) अरे सुबाहुराजा, तुला रघुवंशांतलाच जावाई पाहिजे तर, (शत्रुजिताकडे हात करून) हा पहा शत्रुजित्.

**केरलाधिपति**— ( युधाजिताकडे पाहून आर्जवानें ) हे युधाजिता, प्रस्तुत तूं जें मनांत आणिलें आहेस तें अगदीं अयोग्य, असें स्पष्ट दिसतें! आणि तू राज्यकर्ता असून असा अन्याय करितोस; हें तुझें तुलाच कसें गोड वाटत असेल तें असो! आतां सुदर्शनाशीं तुझा द्वेष आहे; त्यापासून उत्पन्न झालेला क्रोध तुला आवरत नसेल; परंतु,—

## साक्या.

घुस्सेकानहिकारनसुनसुन बचनजुधाजितमेरा ॥
तेराकैसाखुसीस्सयंवर बीचचलेगाजोरा ॥६६॥
तुमनेंकरनाअनयनहींओ सनयनहोकरभायी ॥
करताजोकुयूबीदिखलेता उस्कुजगतकासायी ॥६७॥

तर युधाजिता, अशा करणीनें मनुष्य लोकांचा, देवाचा, आणि शास्त्राचा अपराधी झाल्यानें त्याची अक्षय्य दुष्कीर्ति होत्ये! आतां तुला हा ज्ञानोपदेश मी करितों असें नाहीं, परंतु राजत्वसंबंधानें (सर्व राजांकडे हात दाखवून) हे सारे आपण परस्पर बंधु आहों; त्यांतही प्रस्तुत तू वडील, असें समजून मी अभिमानानें नाहीं; परंतु आर्जवानेंच सांगतों,—

## शिखरिणी.

मदा[1]नेंहाआं[2]दाअतिकरिशिदादातुजकिर्ती ॥
वदावेंयानादात्यजुनिनयवां[3]दाधरिमती[4] ॥
सदाजेस्वच्छं[5]दासदृशबहुफंदांतअसती ॥
पदां[6]द्यांत्यांमंदां[7]जनअनयकंदां[8]सिहसती[9] ॥ ६८॥

याकरितां युधाजिता, संभावितांनीं आपल्या संबंधें अन्याय न होईल, अशाविषयीं मुख्यत्वेंकरून नजर ठेविली पाहिजे!

युधा०—हे केरलाधिपते, न्याय कोणता आणि

---

१ दांडगाईनें. २ डौल. ३ नीतीनें बोलायास. ४ बुद्धि. ५ आपल्या इच्छाप्रमाणें. ६ मोठ्या कीर्तीनें विराजमान अशा स्थानावर बसणारास. ७ अज्ञानांस. ८ अन्यायरूप अंकुर उत्पन्न होण्याचा कंद (कांदा) यास. ९ निंदिती.

अन्याय कोणता, हेंच तुला मुळीं कळत नाहीं; असें या तुझ्याच भाषणावरून होतें ! अरे वेड्या,—

लावणी.—( राग सारंग ).

जुधाजीतअन्यायकरतहयू न्यायतुह्माराहयूसच्चया ॥ कच्चयानृपनीतिमोंकहेगा नहिभूपतिकाजोबच्चया ॥ १ ॥ पंचाननकाखानाइस्को आगेआकरलेजाता ॥ बृकतोबीच्छुपहारिओदुर्नय मेरेमन्मोंनहिआता ॥ २ ॥ रहासत्रुजित्औरकिसीको सुबाहुनेंदेनाबेटी ॥ बिनासुदर्सनकहदीयीओ नहींबातमेरीझूटी ॥ ३ ॥ ६९ ॥

असो, याविषयीं मला दुसऱ्या कोणाशीं बोलण्याची जरूर नाहीं ! (सुबाहूकडे) काय रे सुबाहुराजा, तू ह्मणतोस; " हा इच्छास्वयंवर आहे, यास्तव तुमचें भाषण न्याय्य नव्हे." परंतु तू निश्चयेंकरून समज कीं, ( आपल्या छातीस हात लावून ) हा तलवारबाहाद्दर युधाजित् बायाबापुड्यासारखा न्यायअन्याय पहात बसत नसतो ! याची मर्जी तो न्याय ! समजलास ?

**वंगाधिपति**—( गुर्मीनें ) खरें आहे ! अहो, कोणी दुर्बळ मनुष्य लांकडें फोडायास लागला, ह्मणजे तीं; सरळ, वांकडीं, पीळदार, ओंडकीं, अथवा गांठाळ आहेत कीं काय; अशाविषयीं विचार करितो, परंतु सर्वतोमुख धडकून पेटलेला वणवा तशी वाटावाट करील कीं काय ?

**युधा०**—भले शाबास वंगाधिपती !

**सुदर्शन**—( वंगाधिपतीकडे ) हे वंगाधिपती, त्या

वणव्याची आणि क्षणांत सर्वत्र जलमय करणाऱ्या मेघाची गांठ पडली नाहीं; तोंपर्यंतच तुह्मांस ही शाबासकी योग्य आहे! कारण; मग त्या वणव्याला वाळक्या गवताची एक काडी खाण्याचें देखील सामर्थ्य राहणार नाहीं !

**युधा०**–( सुदर्शनाच्या तेजानें दबकूनही त्रासानें सुबाहूकडे ) अरे सुबाहू, ( सुदर्शनाकडे हात करून ) या वाचाळाकडून आमची मानहानि करवितोस काय? इतका उन्मत्तपणा धरशील तर त्यांत तुझा सर्वथा नाश होईल ! यास्तव तुला साफ सांगतों, तू आपल्या त्या असमंजसे कन्येला चांगला उपदेश कर.

**सुबाहु**– युधाजिता, तू ह्मणतोस त्याप्रमाणें तिला उपदेश करण्याची मीं कांहीं बाकी ठेविली नाहीं.

**केरलाधिपति**–( विस्मित होऊन, सुदर्शनाकडे आर्जवानें ) सुदर्शनराजा, कशाला बाबा तू एथें येण्याचें हें साहस केलेंस? आणखीं मी तुला असें विचारितों,–

## केकावळी.

[1]भसंघिंविधु[2]सासदीं[3]दिससितूंतरीनिर्बला[4] ॥
मुलावरिलरेकशीशशिकलाविराज्यातुला ॥
अला[5]सिअरिचापलाअनुभवूनिलोभेंकसा ॥
युधाजिदहि[6]च्यापुढेंगमसिबाअह्मांभेकसा[7] ॥७०॥

**सुदर्शन**–अहो केरलाधिपती, तुह्मी आतां बोललां; यांतला कांहींच संबंध माझ्या लक्षांत येत नाहीं. का-

---

१ नक्षत्रांच्या समुदायामध्यें. २ चंद्रासारखा. ३ सभेंत. ४ सैन्य नाहीं ज्यास, असा. ५ शत्रूच्या धाडसपणाला. ६ युधाजित् हाच जो सर्प, याच्या. ७ बेडकासारखा.

रण; मुळीं मला कोणी शत्रुच नाहीं. आतां, "युधाजित् राजा माझा शत्रु असावा" असें कोणास वाटत असेल, परंतु मी ह्मणतों; त्यांची उलटी समजूत झाली आहे. कशी ह्मणाल तर; युधाजितानें माझें पराकाष्ठेचें कल्याण केलें आहे! पहा बरें, (शत्रुजिताकडे हात करून) हा शत्रुजित् त्याचा प्रत्यक्ष दौहित्र असून त्याणें, आपले कुलगुरू जे वसिष्ठमहाराज त्यांच्याशींहीं वांकडें असावें आणि भारद्वाजमुनींशीं आमचा तसा कांहीं पूर्वींचा संबंध नसून, मजवर त्यांचा सुद्धां परिपूर्ण अनुग्रह असावा; असें ज्याणें केलें, तो माझा शत्रु कसा ह्मणावा बरें? आणि युधाजित् आरंभींच अयोध्येचें राज्य, शत्रुजिताला सोडून मला देता; तर असा संतोष झाला नसता! कारण,—

## साकी.

जनह्मणतेकुलपरंपरागत सहजचिराज्यमिळालें ॥
सुदर्शनालास्वयेंकोणते याणेंविक्रमकेले ॥ ७१ ॥

आतां त्याणें दोन दिवस आह्मांला भुतासारखें हिंडायास लाविलें, परंतु (गहिंवरून) समर्थ ते, जगन्माते दुर्गेचे परम भक्त गुरूमहाराज भारद्वाज! (सुसकारा टाकून) त्यांणींहीं निश्चयेंकरून मला सांगितलें कीं, "मी जगदंबेचा पुजारी आहें, तर युधाजिताच्या इच्छेप्रमाणें तुला आतां भुत्याच करितों." असें युधाजितानें माझें कल्याण केलें ह्मणजे पहा! आतां कोणी ह्मणतील कीं, भारद्वाजमुनि आपले सात्विक; यास्तव त्यांचा शिष्य तू तसाच भोळसट आहेस, ह्मणून तुला समजत नाहीं, परंतु युधाजित् आणि त्याचे मैत्र हे, तुझ्याशीं

१ पराक्रम.

बळकट शत्रुत्वभाव धरितात." तर खुशाल धरोत. त्याणें माझ्या कल्याणांत कांहीं न्यूनता होणार नाहीं! कारण,

## पद, लावणी अथवा साक्या.

उणेंकायत्याशरणजायजो भावेंजगदंबेला ॥ जडां[2]-
हिभक्तांतारीतीजगां[3]दंकुरनिकुरंबेला ॥ ध्रु० ॥

आतां इतकीं वर्षें विद्याभ्यासांत निमग्न होतों; या कारणानें, "मी राज्यभ्रष्ट झालों." असा कोणी मजवर आरोप करीत असतील; याकरितां,—

आलोंजनागुरुकृपादावुनी आरोपाउडवाया ॥ नृ-
त्यावाचुनिकोणभुत्याला देतो[4]पांउडवाया ॥१॥ पू-
जारीगुरुत्याणेंमीहा भुत्याबनविलासाचा ॥ महि-
माऐसाअसेप्रसिद्धचि मुनिवचनविलासाचा ॥२॥
करितिलममरिपुहाहाकारा तोमच्चरणींचाळ ॥
होतिलत्यांचेनयनपांढरे तीकवड्यांचीमाळ ॥३॥
पोतपरजहातलवारीचा जोततियेचेंपान ॥ अरिय-
शतैलहितैसेंसमरां गणहीनृत्यस्थान ॥४॥ तेथेंना-
चुनितोषवीनमी स्वस्त्रेहीयजमान ॥ येतिशरण-
त्यांजगदंबेच्या नाहिंदयेचोवां[5]न ॥ ५ ॥ निजतनु-
गं[6]तपिशितैं[7]हळदरुधिरा[8]हि कुंकुमअर्पुनिपोतीं[9] ॥अ-
विरतशयनें[10]नमस्कारातें करितेअरि[11]सुर[12]होती ॥६॥

---

१ कमीपणा. २ अज्ञान्यासही. ३ जगतें हेच जे अंकुर (मोड) याच्या समुदायाची (पृथ्वी) इला तात्पर्य, अगणित ब्रह्मांडें उत्पन्न होण्याची जमीन. ४ पैसा. ५ उणीव. ६ आपल्या शरीरांत असणारें. ७ मांस. ८ रक्तही. ९ (माझ्या) तलवारीवर. १० पुन्हा जागृत होणेंच नाहीं, असें जें निजणें याच नमस्कारातें. ११ शत्रु. १२ देव. (युद्धांत शत्रूंशीं कढून मरण पावतो तो परलोकीं देव होतो, असें शास्त्र आहे.)

युधाजिताच्याकरणीनेंहा आलामजअधिकार ॥
सपत्नमातामहकोणाचा[1] करिलअसेउपकार ॥७॥
निजदौहित्रासोडुनिमाझा[2] पक्षपातहाकेला ॥ यु-
धाजितेंह्मणुनिअतांत्याच्या उभाचमीहाकेला ॥८॥
उणेंकायत्या० ॥ ७२ ॥

**केरलाधिपति, सुबाहु, मंत्राकरदीक्षित आणि मंगलायन**–(आनंदानें डोळे मिटीत वारंवार मान डोलवून एकदम) शाबास शाबास; सुदर्शना, कुलदीपक निघालास बाबा!

**विद्याधरमिश्र**–(मान डोलवून) शाबास गे शशिकले!

**सुदर्शन**–(आसमंतात् पाहून) आतां आपण समजतां त्याप्रमाणें; मत्सर, दुस्वास इत्यादि दुर्गुणांनीं व्यापिलेल्या अंतःकरणाचे कोणी प्रतापी पुरुष, माझ्याशीं शत्रुत्व धरीत असतील; यासाठीं मला, "तू अरिचापलाचा अनुभव घेऊनही एथें कशाला आलास?" असें विचारितां, तें तुह्मां सरलबुद्धिविराजमानांचें भूषणच आहे; परंतु त्याविषयीं आपण लेशमात्रही काळजी करूं नये! कारण,—

## केकावळी.

सदागुरुकृपाबळेंलव[3]मलाद्विषद्भी[4]नसे ॥
द्विषद्विषधरांसि[5]मच्छर[6]रणांगणीं[7]विनसे ॥

---

१ सावत्र मातेचा बाप. २ आपल्या कन्येच्या पुत्राला. ३ लेशमात्र. ४ शत्रूंची भीति. ५ शत्रू या सर्पांस. ६ माझे बाण. ७ गरुडासारखे.

तथापिअरिचा[1]पलाअनुभवीतसेंएकला ॥
ह्मणूनिह्मणतोंशरां[2]सिशिकवीनमीहिकला[3] ॥७३॥

तर महाराज, आपण निःसंदेह समजावें कीं, साक्षात् वैकुंठनाथानें दुष्टदंडनार्थ जसा सुदर्शनप्रयोग करावा, तसा भारद्वाजमुनिरूपधरा त्याणेंच हा; उपदेशमंत्राभिमंत्रितसुदर्शनमोक्ष केला आहे! आणि केवळ आपलें भुजबळ; तसेंच संग्रामचातुर्य यांजवरच भरंवसा ठेवून मीं इतकी उमेद धरिली आहे; असें नाहीं, तर या निर्भयपणाचा हेतु निराळाच आहे, तो; (केरलाधिपतीकडे पहून) आपण आदिकरून सज्जनांस, आणि तसाच मूर्खपणानें आपणासच अपाय करून घेण्याविषयीं प्रवृत्त होणाऱ्या दुर्जनांसही कळावा ह्मणून स्पष्ट सांगतों,—

## लावणी.

कारणदुसरेंमुख्यअसेकीं स्वर्गींमजदुर्गा ॥ वदली-
प्रियतूमजलाभार्गव रामजसाभर्गा[4] ॥ १ ॥ स्वर्गा-
अणिअपवर्गा[5]सहिं[6] त्सेवकजनलाहे ॥ तत्करुणे-
नेंशुष्कतृणो[7]पम अरिमजअनला[8]हे ॥ २ ॥ स्वल्पाहि
भयनधरावेंचित्तीं सज्जनहोआतां ॥ अतिदुर्घट[9]ही
तोकाकरवीं[10] करविजगन्माता[11] ॥ ३ ॥ ७४ ॥

परंतु विचारवंत हो, अशी जगज्जननीची विचित्र लील सर्वत्र स्पष्ट पाहाण्यांत येत असतांही, कांहीं तामसपु-

---

१ (आत्मपक्षीं) शत्रूच्या चापल्याला; (बाणपक्षीं) शत्रूंच्या मांसाला. २ (आपल्या) बाणांस. ३ चातुर्य. ४ शिवाला. ५ मोक्षासही. ६ जिचा सेवकजन. ७ वाळलेल्या गवताप्रमाणें. ८ अग्नीला. ९ फार अवघडही (काम). १० लेंकराकडून. ११ जगदंबा.

ण्याच्या लेशानें प्राप्त झालेलें किंचित् क्षणिक स्वामित्व, तसेंच धन, इतक्याच पोकळ आधारावर न्यायअन्याय न पाहतां विषयलोभी मूढ लोक केवळ स्त्रीजित तसेंच उन्मत्त होतात!

युधा०—(घुश्शानें सुदर्शनाकडे) अरे वाणमाऱ्या! ते भारद्वाजप्रमुख भट्ट जसे दिसण्यांत अगदीं गोब्राह्मण आणि कोपले ह्मणजे केवळ यम! तसा हा दिसायाला मोठा संभावित पण भाषण जसें गरळच!

सुदर्शन—युधाजित्‌महाराज, प्राणिमात्राचें जीवन जें उदक तेंच पिसाळलेल्या कुतऱ्याला विषाच्या स्थानीं होतें! असो, परंतु एक गोष्ट सांगतों. आपलें भाषण परस्परच चालूद्या, या प्रसंगीं आपण प्रत्यक्ष माझ्याशीं संबंध लावूं नका.

युधाजित्—(क्रोधानें) अरे, त्याजविषयीं कोण खोळंबला आहे, आणि जो तलवारबाहाद्दर तो अशी बडबड करीतच नाहीं!

सुद०—युधाजित्‌महाराज, आपली तलवार; वसिष्ठमहाराजांचा उपमर्द वगैरे जंगानें अगदीं निरुपयोगी झाली आहे, यास्तव तिला आतां मुकाट्यानें म्यान करा.

युधा०—(डोळे वटारून) अरे वाचाळा! आणि तुला माझ्या तलवारीचें पाणी ठाऊक नाहीं काय रे? (शत्रुजिताकडे हात करून) या शत्रुजिताला मीं राज्याभिषेक केला तेव्हां वसिष्ठमुनींससुद्धां डालून ठेविलें!

सुद०—(आश्चर्यमुद्रा करून सुबाहूकडे) वाहवा, कोण फुशारकी ही! या बाक्या शिपायांनीं वसिष्ठमहाराजांस डालून ठेविलें! आणि हे गुरुमहाराजा भारद्वा-

ज्यांच्या आश्रमीं आले होते तेव्हां, यांची तलवार विस्मरणानें घरीं राहिली असेल! किंवा तिचें पाणी फारच स्निग्ध असल्यामुळें, यांच्या चित्रतंत्रमंत्र्याचा जो उपदेश, त्या बिळांतून निघालेल्या; "भय" या उंदिराच्या पोरानें त्याचा फन्ना उडविला असेल! अथवा किंचित् वक्र झालेल्या गुरुमहाराजांच्या भुवईनें भासविलेली जी क्रोधाग्नीची ठिणगी, तिच्या धगीनें ती सारी तलवारच वितळून गेली असेल!

युधा०—(क्रोधानें दांत खाऊन) अरे, तुझ्या गुरूनें तुला, दुसऱ्याचें मर्म काढणें, एवढी कला मात्र पूर्ण शिकविली आहे, असें वाटतें!

सुद०—(त्याजकडे डोळे वटारून) अरे युधाजिता, इतःपर गुरुमहाराजांचें नांव काढशील तर; तूं मला, "वाणमाऱ्या" ह्मणतोस आणि त्याचा अर्थ, "बाणमाऱ्या" असाही होतो; तर या अर्थाचा तुला अनुभव घ्यावयास लावीन!

युधा०—(गांगरूनही दिल्दारीनें) हां हां? ठीक आहे. (गप्प राहतो).

सुबाहु—(युधाजित् सुदर्शनाला भितो आहे, असें पुरतें समजून आपल्याशीं) अहाहा, कसें हें सुदर्शनाचें धैर्यादिगुणवैभव! ज्याणें केवळ भाषणाच्या दर्पकरूनच युधाजिताच्या अंतःकरणवृत्तीला, तापलेल्या तव्यावर उभी केल्याप्रमाणें तरफडायास लाविलें आहे! तस्मात् आतां आपण निःशंकपणें शशिकलेच्या मतासच अनुसरावें; आणि पुढें कशी मसलत करावयाची हेंही तिलाच विचारावें.

युधा०—(धैर्यानें) अरे सुबाहु, तुह्मी सारे देवभोळे मिळून या युधाजितासमोर आपला हेका चालविण्यास इच्छितां काय? अरे, दुसरे फुकटे असोत, परंतु तुझ्या घरचें कार्य असून तू असा कसा बेफाम झाला आहेस? तर नीट शुद्धीवर येऊन, आपल्या कन्येला सुदर्शनास न वरण्याविषयीं चांगला बोध कर. नाहीं तर पहा; मग युधाजिताशीं गांठ आहे! यास्तव ऊठ. उगीच पोर-बुद्धीस लागून आपला नाश करून घेऊं नकोस.

सुबा०—(बळेंच भ्यालेसें दाखवून) युधाजिता, मीं आधींच तुला सांगितलें कीं; ती,—

## पद.

मानुनिममवचना ॥ बचनागापरिकन्या ॥ नाय-केमलाताशिचअन्या ॥ ध्रु० ॥ पाहेनृपगणती[1] ॥ प-णतीससुदर्शनतो ॥ चिंतुनीमहानंदहोतो ॥ १ ॥ वनगतराजसुता ॥ वसुतां[2]कैंचीही ॥ सांगुनीगो-ष्टतिलामींही ॥ २ ॥ दमलोंभूपतिहो ॥ मतिहोइ-नतिजला ॥ स्वाशयीं[3]तिचाजीवरिजला ॥ ३ ॥ जेजेमजसुचले ॥ वचलेखअधन्यां[4] ॥ मानितीत-यांलाजघन्यां[5] ॥ मानुनि० ॥ ४ ॥ ॥ ७४ ॥

आतां असें आहे; तथापि युधाजिता, आणिकही तिला सांगून पहातों. (निघून जातो).

युधा०—(अंगाधिपतीकडे अपसांत) अंगाधिपती, शशिकलेचा दुराग्रह खराच दिसतो, तेव्हां आतां नशि-बाच्या परीक्षेचीच वेळ आहे! बरें पाहूं; कसें काय होतें

१ राजांचा समुदाय. २ धन, नानाप्रकारचे मणी यांचा समुदाय. ३ आपल्या अभिप्रायांत. ४ अभाग्य. ५ तुच्छ, अज्ञातें.

तें. निदान सध्या मोडून तर टाकूं, आपल्यास काय. असो पण, (दिलगिरीनें) अंगाधिपती, या कहारी पोरानें अशा साऱ्या राजांच्या समाजांत मला, जोड्यासहित लाथांनीं तुडविल्यासारखें केवळ बोलण्यानेंच शासन केलें. यापेक्षां दुसऱ्या ठिकाणीं हा माझे प्राण घेता तरी बरें होतें. पण आतां काय करावें ! माझे श्वासोच्छ्वास मोकळे असतांही पंचप्राण कसे, नुक्तीच मान सोडविलेल्या कोंबड्याप्रमाणें धडपडताहेत!

(इतक्यांत सुबाहु प्रवेश करितो).

सुबा०—अहो राजेलोक हो, ती शशिकला मूळस्वभाव; याकरितां तिची समजूत लवकर होईल असें दिसत नाहीं. तर सर्वांनीं आपआपल्या डेऱ्यास जावें, आणि जशी तिची समजूत होईल; त्याअन्वयें सूचना झाली ह्मणजे पुन्हा येण्याची मेहेर्बानी केली पाहिजे!

युधा०—ठीक ठीक. सुबाहुराजा, अरे; तू विचारशालीच आहेस. (शत्रुजिताकडे अपसांत) हात्त्याच्या, ह्मणून तर पाडिलें !

सर्व राजे–(उठतात आणि पूर्ववत् लल्कारणाऱ्या भालदारांस पुढें करून निघून जातात.)

सुबा०—(विदूषकाकडे) अरे वनचरा, तू शशिकलेच्या दिवाणखान्यांत जाऊन तिला लवकर घेऊन ये बरें.

विदू०—(हात जोडून) आज्ञा. (पडद्याच्या आंत जाऊन त्याच पावलीं शशिकलेसह प्रवेश करून आपल्या जागीं बसतो).

शशिकला—(आनंदानें सुबाहूच्या समीप बसल्ये).

सुबा०—(तिची हनुवटी धरून) बया, तू सांगि-

तल्याप्रमाणें बतावणी करून सर्व राजांस परत लावून दिलें. आतां पुढें कसें?

**शशि०**—( हांसत हांसत ) बाबा, आतां; सुदर्शनराजाचें रहाणें शहरांतच आहे! त्याला प्रस्तुत फरासखाना नाहीं, हेंही या समयीं एक मोठेंच साधन झालें! असो; पण आतां वरप्रस्थानाच्या संप्रदायाप्रमाणें समारंभानें त्याला आणवून आजचाच मुहूर्त साधावा, आणिक काय?

**सुबा०**—( मान डोलवून ) ठीक आहे. ( मंत्राकर आणि विद्याधर यांजकडे पाहून ) महाराज, ( शशिकलेकडे हात करून ) या शशिकलेकरितां मी आपल्या ऐश्वर्याची आणि देहाचीही आशा सोडून हें महासाहस करितों आहें!

**विद्याधरमिश्र**— ( हर्षानें ) सुबाहुराजा, तू लवमात्रही काळजी करूं नकोस. सुदर्शनराजा थोडक्याच दिवसांत शत्रूंविषयीं सारें पृथ्वीमंडळ मैदान करितो! यांत संशय नाहीं.

**सुबा०**— ( आनंदानें ) तथास्तु. ( त्याजकडे हात जोडितो ).

**शशि०**—(विद्याधरमिश्राच्या पायापडून सुबाहूकडे) बाबा, आपण सुदर्शनराजास पत्र पाठवाना ह्मणून मीं त्यास बलाविण्याकरितां स्वतःचें पत्र देऊन (विद्याधराकडे हात जोडून) यां मिश्रमहाराजांस भारद्वाजाश्रमीं पाठविलें होतें, आणि " मी तुमची धर्मकन्या आहें." असेंही त्यांस ह्मटलें आहे!

**सुबा०**—( गहिंवरत तिच्या पाठीवरून हात फिरवून) शाबास बेटा! बहुत चांगलें केलेंस. आमच्या दैवाचा

उदय ह्मणून तुला तशी बुद्धि झाली! (मंत्राकर आणि न्यायसागर यांजकडे) आपण उभयतां आणि सेनापति वगैरे यांणीं; अंबाऱ्यांचे तसेच हौद्याचे हत्ती, घोडेस्वार, शिबंदी, डंका, निशाण, अबदागिरी, मोरचलें, भालदार, शिंगाडे, वाजंत्री, ताशेवाले यांचे ताफे, चवघडा वगैरे वाद्यें, बागा, नक्षत्रमाळा, आणि सर्वप्रकारचे पोषाख अलंकार, इत्यादि सारा सरंजाम घेऊन जाऊन; मनोरमा, विदल्ल यांसहवर्तमान वरप्रस्थानाच्या रीतीनें सुदर्शनराजास आणावें.

मंत्राकर— उत्तम आहे. (उठतो).

न्यायसागर आणि शार्दूलध्वज— (हात जोडून) आज्ञा. (उठतात).

तिघे— (निघून जातात).

सुबाहु— (चकित होऊन) अहाहा, काय चमत्कार हा. आह्मीं सुदर्शनाविषयीं इतकी उपेक्षा केली असतां कशी ही जुळाजूळ झाली. वाहवा!

शशि०— (हर्षानें) बाबा, जगदंबेच्या आज्ञेवरून असें व्हावयाचें ह्मणून मीं सिद्धांतच केला होता. आणि या अन्वयें आपली आज्ञा घेतल्याखेरीज, माझ्या खासगीच्या जामदारखान्यांतील रोख ऐवज सुमारें अर्धा आजपर्यंत या कामांत अनुष्ठानें वगैरे संबंधें खर्चीं घातला!

सुबा०— (गहिंवरून) शाबास बये! तुझें चातुर्य आणि धैर्य मला अवर्ण्य आहे! परंतु शशिकले, तू आतां आपल्या दिवाणखान्यांत जा. तुझ्या यजमानांची स्वारी आली असें वाटतें. वाद्यें अगदीं जवळ वाजतात.

शशि०— (त्वरेनें) ठीक आहे. (निघून जात्ये).

(इतक्यांत पडद्यामध्यें) दौलतज्यादा मेहेर्बा३न् अयोध्याधिपति सुदर्शनराज महारा३ज. आस्तें३ कदम् मुलाजा३. तफावत्सें तफावत्सें ! (असा शब्द होतो, नंतर मंत्राकरदीक्षित, विदल्ल, इत्यादि मंडळीसह सुदर्शन प्रवेश करितो ).

सुबा०—(सामोरा जाऊन त्यास आणितो, नंतर सिंहासनाकडे हात करून ) बसावें सुदर्शनराज.

सुद०—(मंत्राकर, मंगलायन आणि विद्याधरमिश्र, यांस नमस्कार तसाच सुबाहूस मुजरा करून सिंहासनीं बसतो ).

कंचुकी—निगारखे मेहेर्बा३न. (मंडळीकडे) अदब्सें!

( इतक्यांत गणिका प्रवेश केल्यानंतर नृत्यास आरंभ करित्ये ).

मंत्राकर—( उठून सुबाहूकडे ) मुहूर्ताची वेळ झाली, यास्तव सुदर्शनराजास याज्ञिकमंडपांत चलण्याविषयीं सूचना करावी.

सुबा०—ठीक आहे. ( सुदर्शनाजवळ जाऊन ) सुदर्शनराज, चलावें याज्ञिकमंडपांत.

सुद०—(मंत्राकर, मंगलायन, विद्याधरमिश्र, यांस पुढें करून, मध्यें धरलेल्या अपुत्यां पडद्याच्या आंत जातो ).

( बाहेर नृत्य चालू असतां किंचित् अवकाशानें पडद्यांत ) शुभमंगल सावधान.

गणिका—( नृत्य बंद करून स्तब्ध राहत्ये ).

मंत्राकर— शार्दूलविक्रीडित.

जीपाखंडकचंडत्याधरुनियाशेंडीसदंडीतसे ॥
खंडीदानवमंडळीनिरखुनीदुष्कर्मपंडीतसे ॥

दुःखींभक्तजनाचियाझडकरीकारुण्ययोजीमलम् ॥
तीचंडीचसुदर्शनाशशिकलेलादेतसेमंगलम् ॥७६॥
शुभमंगल३सावधान.

विद्याधरमिश्र— ( मंत्राकरदीक्षिताकडे ) दीक्षित-जी, जसें सामान्यतः आपलें नांव घेऊं नये, परंतु गुरु-वंदनादिकांच्या समयीं घेतलेंच पाहिजे, तसें स्वगुण-कीर्तन निंद्य; तथापि नव्या परिचयाच्या प्रसंगीं कदाचित् तें दिग्दर्शनरूप तरी करावें लागतें, या अन्वयें सांगतों; गुरुचरणप्रसादेंकरून मी त्रिकालज्ञ असल्यामुळें माझ्या भाषणांत अलंकारसंबंधें पुढें होणाऱ्या अर्थाचाही दृष्टांत येत असतो, हें पुरतें लक्षांत असावें. शुभमंगलसावधान.

## शार्दूलविक्रीडित.

मायास्वीकृतभिल्लमल्लजनतास्वाम्येशजिष्ण्वोर्मृधे ॥
यातापाशुपतंधनंजयशरासाघातभीतापितत् ॥
यातंपार्थसहायतामशरणात्तत्तुल्यवीर्यैहिवो ॥
द्वेवेयायसुदर्शनंशशिकलाकुर्यात्सदामंगलम् ॥७७॥
शुभमंगलसावधान.

---

१ अर्जुनाचें सत्व पाहण्याकरितां कपटानें भिल्लांतील पैलवानांचे समुदायाच्या नायकाचें सोंग घेतलेला शिव आणि अर्जुन यांच्या युद्धांत, अर्जुनाचे धनुष्याच्या तडाख्यानें भ्यालेली, शशिकला ( चंद्रकला ) शिवाच्या धनुष्याला शरण गेली; ( आणि पहात्ये तों ) तें ( शिवाचें चापही) अर्जुनालाच मिळालें ! मग निराश्रय होत्सातां; (जी) साक्षात् शशिकळा, त्या शिवचापासारखेंच बलिष्ठ, अशा सुदर्शनाप्रति (विष्णु-च्या चक्राला आश्रयलाभाकरितां) शरण गेली काय! (अशी ती) तुमचें सर्वकाळ मंगल करो.

मंगलायन— शार्दूलविक्रीडित.

अंगाधीशसुदर्शनास्त्रजभयेंटांकूनिवर्त्तेपळे ॥
वंगाधीशहिपाहुनीस्वसुहृदातोत्याचमार्गीवळे ॥
प्रज्ञाशत्रुयुधाजितांचिहिगळेऐकूनियातेंकलम् ॥
हेंसारेंहिसुदर्शनाशशिकलेलाहोतसेमंगलम् ॥७८॥

शुभमंगलसावधान.

( इतक्यांत विदूषक पडद्याच्या आंत धांवत धांवत जाऊन ) हां हां हां हां, मी मी मी !

मंत्राकर— ( विस्मित होऊन ) अरेच्चा ! इतकी गर्दी कां? तुला कांहीं ह्मणायाचें असेल तर ह्मण.

विदूषक— शुभमंगलसावधान——

शार्दूलविक्रीडित.

अंगेशादिकवंगपांचिहिलवेमूर्तीजशीबांगडी ॥
झालीआधियुधाजिताचिबघुनीयुद्धींउचल्तांगडी ॥
वार्ताऐकुनिहीनृपांचिसगळ्याधैर्यंहिझालींसलम् ॥
तींआतांचिसुदर्शनाशशिकलेलादेतिसन्मंगलम् ७९

शुभमंगलसावधान.

मंत्राकर—अरे, वाजंत्री वगैरे वाद्यें वाजवायास सांगा.

( यथासंभव वाद्यें वाजल्यानंतर नृत्य आणि सभासदांस विडे वगैरे देण्याचें चालू झालें असतां किंचित अवकाशानें पडद्यांत ) निगारखे मेहेर्बान् आस्तें कदमूमुलाजा. ( असा शब्द होतो नंतर भिक्षुकमंडळी आणि पूर्ववत् ललकारणारा भालदार यांस पुढें करून; शशिकलेसह सुदर्शन प्रवेश करितो, आणि पुरोहितप्रमुखांस बसवून आपण आपल्या जागीं बसतो, नंतर त्याजपुढें क्षणभर नृत्य करून, तेथेंच सुबाहूनें देवविलेले सत्का-

रपदार्थ घेऊन तसाच सुदर्शनवगैरेंस मुजरा करून आपल्या मंडळीसुद्धां गणिका निघून जात्ये तोंच कचेरी बर्खास होऊन; सुबाहु, न्यायसागर, शार्दूलध्वज, आणि विदूषक यांखेरीज सर्व निघून जातात).

सुबा०—(प्रधानाकडे) प्रधानजी, आतां साऱ्या राजांस समारंभार्थ आमंत्रण स्वतः जाऊन केलें पाहिजे.

न्यायसा०—(हात जोडून) होय साहेब.

सुबा०—(प्रधान सेनापतीसह निघून जातो).

(इतक्यांत सुदर्शन प्रवेश करून आसनारूढ होतो).

सुद०—वनचरा, आमच्या आईसाहेबांस इकडे येण्याविषयीं सूचना कर बरें.

विदू०—(हात जोडून) आज्ञा. (निघून जातो).

(इतक्यांत शशिकला प्रवेश तसाच सुदर्शनाला नमस्कार करून बाजूस उभी राहत्ये).

सुद० (तिजकडे हात करून) यावी स्वारी! (तिच्या हातास धरून तिला आपल्या डाव्याकडे समीप बसवितो).

शशिकला—(किंचित् खालीं पाहून) ऋषींच्या आश्रमांत बहुत वर्षे वास झाल्यामुळें रात्रंदिवस सोवळेंच. असा अभ्यास झाला आहे, पण त्याला आणि या राजविलासरीतीला आतां कसा मेळ पडेल कोण जाणें!

सुद०—वाहवा! हें काय? राजेलोकांनीं का नेसायाचें सोडून डोचक्यास गुंडाळावें लागतें?

शशि०—(किंचित् हांसून) हो हो. हा एक राजा या शब्दाचा अर्थ आहे खरा, पण त्याची एथें शंकाच नाहीं. तरी पाहणें, बोलणें, बसणें, हें तर सर्वांस अवश्य कर्तव्य आहे?

सुद०—तर आह्मी का डोळे मिटून मुकाट्यानें धांवत असतों ?

शशि०—छे छे; तसें नाहीं. पण तें सामान्य पाहणें बोलणें, बसणें, निराळें आणि मी ह्मणत्यें हें निराळें !

सुद०—पण इतकी उतावळी कां ? आतां हा विवाहसंबंधी सर्व वृत्तांत गुरुमहाराजांस निवेदित केला ह्मणजे विवाहकृत्य समग्र झालें, मग क्रमाप्रमाणें पुढील कृत्यें आहेतच. प्रस्तुत अवश्य कर्तव्य हेंच कीं, राजेसाहेबांची आज्ञा घेऊन एथून निघण्याचा उद्योग त्वरित केला पाहिजे, आणि युधाजितापासून आपलें कांहीं अनिष्ट न होतां जाणें, हें एक मोठेंच पाणी उतरायाचें आहे ! तसेंच फारकरून युद्ध झाल्याखेरीज तें उतरलें जाईल, असें दिसत नाहीं.

शशि०—ठीक आहे. राजेसाहेबांकडून त्वरित रवानगी होईल, अशाविषयीं मी उद्योग करित्यें; ह्मणजे युद्धचमत्कारही माझ्या दृष्टीस पडेल !

सुद०—( चकित झाल्यासारखें करून ) वाहवा. तुह्मी रणांगणीं येणार? छत्. ही का थट्टा आहे कीं काय ? भलतेंच. हा दुराग्रह नीट नव्हे हो !

शशि०—( हात जोडून ) स्वामींनीं नाहीं ह्मटल्यावर उपायच नाहीं! परंतु सरकारांचें दुर्गाप्रसादरूप अतिअद्भुत संग्रामचातुर्य तमाम लोकांनीं यथेच्छ पहावें. आणि आह्मीं दीनवाणी मंदिरांतच बसावें !

सुद०—( तिला कुर्वाळून ) हें काय बरें ? तुह्मीं युद्ध पाहिलें तर त्यांत माझा कांहीं तोटा नाहीं. निभावल्यास संतोषच आहे. परंतु हे प्राणवल्लभे, तो संग्रामचमत्कार

बायकामुलांनीं पहाण्यास योग्य नव्हे ! तथापि मी तुह्मांला धमकावीत नाहीं, पण; ( काकुलतीनें ),—

## लावणी.

हेस्त्रियेविधृत[1]सुश्रियेविदित[2]सत्क्रियेममअसु[3]प्रियेह्मणसिमीयुद्धीं ॥ येत्येंहीकैसीतुलाजाहलीबुद्धी ॥ ॥ ध्रु० ॥ तूकशीयेशियारणीं अहित[4]दारणीं गातिगारणीं द्रुहिण[5]वास[6]वहीं ॥ हासव[7]हरिलाहीकरीकोल[8]कासवही ॥१॥ कायतीरोषरसडोण अनल[9]समशोण अहितदृ[10]कोण पाहशिलजेव्हां मूर्च्छितगेपडशिलपहाभीरुतूतेव्हां ॥ २ ॥ काढुनीघोरतरघसा प्रळयमेघसा अरिशिघसयसा तोडितीराजे ॥ तीरामानितिशुचिधारतीर्थतीराजे ॥ ३ ॥ मारितीवीरझरझरा शरांखरतरां फिरतिगरगरा नयनलोकांचे ॥ आहेवहें[11]कर्मचिनव्हेभीरु[12]तोकांचें ॥ ४ ॥ ॥ चाल दुसरी ॥ नचयावेंत्वांसमरा[13]शीं ॥ हेस्त्रिये ॥ १ ॥ अतिदु[14]र्दर्शहिअ[15]मरांशीं ॥ रणसये ॥ २ ॥ द्वेषणे[16]गणतोयमरा[17]शी ॥ गेप्रिये ॥ ३ ॥ ॥ चाल पहिली ॥ पाहतांघोर[18]संगरा पावुनीदरा[19] मानिनिशिलगरा[20] खाउनीशुद्धी ॥ राहिलपरियासंगरींसोडित्येमु[21]तूं[22]धी ॥ ५ ॥ हेस्त्रिये० ॥ ८० ॥

---

१ उत्तम शोभा धारण करणारी. २ चांगली करणी कोणती हें जिला ठाऊक. ३ प्राणप्रिये. ४ शत्रूंच्या नाशाविषयीं. ५ ब्रह्मदेव. ६ इंद्र. ७ यज्ञ. ८ डुकर. ९ अग्नीसारखा लाल. १० शत्रूच्या डोळ्याचा कोपरा. ११ युद्ध. १२ बायकामुलांचें. १३ युद्धास. १४ पाहण्यास फार कठीण. १५ देवांस १६ शत्रूचा समुदाय. १७ यमांचा समुदाय. १८ भयंकर युद्धाला. १९ भयाला. २० विषाला. २१ भीति. २२ बुद्धि.

शशि०—( विस्मित होऊन ) वाहवा! आज हा मोठा चमत्कार समजण्यांत आला. जसें, मेघ सर्वत्र उदकवृष्टि करितो; पण चातकास एक बिंदुही देण्याचें त्याच्या मोठें जिवावर येतें. तसें जगदंबेलाही; ( त्याजकडे हात जोडून ) सरकार आदिकरून सर्वां स्वकीयांस सुरक्षित ठेवण्याचें कांहीं कठीण नाहीं, पण मजसारख्या दुबळ्याचें संरक्षण करणें जड पडेल, अशाविषयीं दुर्गामहाभक्तां प्राणनाथांचें चित्त संशयग्रस्त. केवढें आश्चर्य हें, अहाहा!

सुद०—( हांसून, त्वरेनें ) पुरे पुरे पुरे! असें तुमचें भाषण ऐकावें, ह्मणूनच मी तसें तेंडेंबाकें बोललों; आतां आपण चलावें, आणि आपली रवानगी लवकर होईल; अशाविषयीं चालेल तितका प्रयत्न करावा.

शशि०—( हर्षानें ) आज्ञा. ( निघून जात्ये ).

( इतक्यांत विदूषक येतो ).

विदू०—( सुदर्शनाकडे न्याहाळून पहात पहात त्याला मुजरा करून हांसत हांसत ) कां सरकारसाहेब, झाला; विवाहसमारंभ सारा पदरीं पडला?

सुद०—( विस्मित होऊन ) वाः, सारा ह्मणजे? साडे झाले याजवरून तुला नाहीं का समजत?

विदू०—महाराज, साडे झाले ह्मणजे विवाहविधि पूर्ण झाला; ही आपली ब्राह्मणांची अळणी चाल! अहो, शास्त्रामध्यें विवाहप्रकरण निराळें आणि गर्भाधान प्रकरण निराळें; तशीच ब्राह्मणांची वहिवाटही आहे, परंतु क्षत्रियांनीं तीं दोनीं प्रकरणें एकेजागीं कुटून त्यांचा अगदीं लाटा केला आहे!

सुद०— अरे, असेल तशी कोणाची वहिवाट, परंतु शास्त्रांत जें गर्भाधानप्रकरण निराळें आहे, त्याजवर तुह्मां ब्राह्मणांचेच कोणते ब्रह्मदेवानें शिक्के मारिले आहेत?

विदू०— महाराज, राजेलोकांपाशीं शिक्का मोर्तब सारें असतें, मग असें घरचेंच सामान असल्यावर त्या ब्रह्मदेवाच्या शिक्क्याची वाट पाहतो कोण.

सुद०— (हांसून) वनचरा, तू भला वक्रोक्तिपंडित आहेस, इतकें खरें.

विदू०— असो; पण महाराज, सरकारांनीं गुरुमहाराज भारद्वाज यांचे दर्शनास जाण्याची कशी काय योजना केली आहे?

सुद०— हे आतां निघालोंच ह्मण. राजेसाहेबांकडून लवकर रवानगी व्हावी ह्मणून सक्त उद्योग चालविला आहे.

(इतक्यांत; मनोरमा, शशिकला, विदल, सुबाहु, पद्मावती अनुष्ठिति, सिद्धविद्या, मंत्राकर, मंगलायन, विद्याधर, न्यायसागर, आणि शार्दूलध्वज, हे प्रवेश करून यथायोग्य आचरितात).

सुद०—(हात जोडून सुबाहूकडे) जी साहेब, आज सहा दिवस विवाहसमारंभ जाहला. आतां आह्मांला गुरुचरणदर्शनाची बहुत उत्कंठा आहे.

सुबाहु—(अळसत) उत्तम आहे सुदर्शनराज, परंतु मध्यें युधाजित् हा मोठाच प्रतिबंध आहे. कारण, त्याणें आपला नाश करण्याविषयीं प्रतिज्ञा करून शहरास वेढा दिला आहे!

**सुद०**— खरें. असें कर्णोपकर्ण ऐकिलेलें तेंही माझ्या उत्कंठेचें अंशतः कारण आहे; असें समजून राजेसाहेबांनीं अगदीं काळजी करूं नये.

**सुबा०**—(त्याची वाढती उमेद लक्षांत आणून आनंदानें) चलावें तर; स्वारीची सिद्धताच आहे.

**सुद०**— उत्तम आहे. (उठतो).

**सर्व**—(लगबगीनें उठतात).

**कंचुकी**— (पूर्ववत् ललकारितात).

**सुद०**—(विदूषकाकडे) अरे वनचरा, तू पुढें; गुरुमहाराजांच्या आश्रमांत जाऊन आह्मी आलों, असें कळीव.

**विदू०**—(हात जोडून) आज्ञा. (निघून जातो).

**सुबा०**—(आनंदानें मनांत) वाहवा. युधाजित् सुदर्शनाच्या ध्यानांतही नाहीं !

**सुद०**— (विद्याधराकडे) पुढें चालावें मिश्रजी, आपण आमची ढाल.

**विद्याधरमिश्र**— ठीक आहे. (पुढें होतो).

**सुदर्शनप्रमुख**—(त्याच्या मागून पडद्यापर्यंत जातात तों पडद्यापलीकडे) घे घे घे घे, (इत्यादि उग्र वीरशब्द तसेच धनुष्याचे टणत्कार वगैरे भयंकर ध्वनि ऐकतांच मनोरमा वगैरे बायकांस यथायोग्य बसवून ते सारे मोठ्या आवेशानें पडद्याचे आंत जातात).

**मनोरमा**—(पद्मावतीकडे) पद्मावतीबाई, घोर राक्षस तशींच घातक श्वापदें यांचें केवळ घरच, अशा दंडकारण्यांत रामचंद्रमहाराज निघून गेले त्या समयीं कौसल्याबाईची जी अवस्था झाली तीच आज मला आली, परंतु ते सारेच पुंण्यराशि ह्मणून त्या अनर्थानेंच

पुंण्य माझ्या पदरीं कोठचें? ( दी-
ड पाहत्ये इतक्यांत पडद्यांतून वि-
र्यानें एका गालावर हांसत हांसत
बसतो, त्याची हर्षयुक्त मुद्रा पाहतांच
कशी काय हवाल आहे मिश्रजी?
आनंदानें ) हवाल काय पुसावी महा-
अन्य पशु तृणाप्रमाणें आहेत. त्या
च्या रथ पाहण्याबरोबर, सूर्याचा प्र-
मःस्तोम जसे अतिदूर सरतात त्या-
ुख मागें हटल्यामुळें सुदर्शनाच्या
प्याइतकें मैदान अगदीं मोकळें झालें!
नें ) हूँ हूँ काय ह्मणतां! बरें पुढें?
महाराज, सुदर्शनानें सुबाहुराजाला
नंतर आपला रथ कांहीं पुढें नेऊन,
नेप्रमाणें गंभीर सिंहनाद आणि वीज
सारिखा धनुष्याच्या दोरीचा उग्र
व्हां त्या शब्दाच्या गडगडाटानें दा-
निही खडखडला, तेणेंकरून तें सारें
ाल्याप्रमाणें थरारलें! आणि त्याच
तास दर्डाऊन ह्मणाला कीं, युधा-
ास आरंभही नाहीं तोंच इतका वा-
ांतून तलवार गळत्ये आहे ती नीट
तर युधाजीतही दम छाटीत छाटीत
दर्शना, तलवार नीटच धरिली आहे,
कवायास नको. " मग सुदर्शन ह्म-
याजिता, या प्रसंगीं पितापुत्रांचेंही

नातें चालत नाहीं तेव्हां आज्ञानातवांचें कोठून चालणार! परंतु आमच्या शाळेंतील रीति आहे कीं, कोणी भ्रांत झाला असेल त्याला यथाबुद्धि सावध करावें. असो, आतां धनुष्य उचल; असें ह्मणून त्याणें शत्रुसैन्यावर बाणांचा वर्षाव केला तेव्हां अतिशय वृष्टीनें जसा प्रांतच्याप्रांत झांकला जातो, तसा सैन्यासहवर्तमान युधाजित् वगैरे राजांचा समुदाय क्षणभर अगदीं नाहींसा झाला!

**मनो०**— ( सुसकारा टाकून ) असो, अशीच अखेर होईल तेव्हां सारें खरें!

**विद्या०**—महाराज, मी आतां तिकडे जातों. ( निघून जातो ).

**मनो०**— ( पद्मावतीकडे ) असें आरंभशूरत्व ऐकून कांहीं समाधान वाटत नाहीं.

( इतक्यांत पडद्यांतून मंत्राकरदीक्षित मोठ्यानें हांसत येऊन मनोरमेपुढें बसतो ).

**मनो०**— या दीक्षितजी. कसें काय वर्तमान आहे?

**मंत्राकर**— महाराज, शिशिरवाताच्या स्पर्शानें जशीं वृक्षांचीं पिकलेलीं असंख्य पानें खळाखळ गळून पडतात, तसे सुदर्शनाच्या उग्र देखाव्यानेंच अगणित वीर मुमूर्षु होऊन आधीं पडले, नंतर सुदर्शनानें श्रावणझडीच्या अभ्रप्रमाणें बाणांचें छत भरून दिलें तेव्हां आकाश पाताळ एक झालेंसें दिसूं लागलें! तसल्या त्या क्रूरशरांनीं विदीर्ण होऊन पडलेल्या शत्रूचे वीरांच्या कलेवरपर्वतांपासून वाहणाऱ्या रक्ताचे नद्यांच्या वेगवान् ओघांनीं, मनुष्यांची कथा काय! परंतु अश्व, सारथी, योद्धा यांसुद्धां सहस्रावधि रथ; आणि बाण इत्यादि युद्ध-

सामग्रीनें भरलेले शतशः शकट तसेच सामानासह हत्तीही वाहून गेले! अंगपति वंगपति इत्यादि युधाजिताचे अनुयायी पलायन करून दडाले असतां, शत्रूकडून युद्धाचा विरामच झाला असें समजून सुदर्शन, शत्रुसैन्याशीं रथ भिडवून पहातो तों युधाजित् आणि शत्रुजित् अगदीं घायाळ होऊन रथांतल्यारथांत, फोडणींतील मिसळणाचे दाण्यांप्रमाणें धडपडताहेत, असें दिसून येतांच आपण बाण न टाकितां स्तब्ध राहिला, नंतर कांहीं वेळानें युधाजितानें डोळे उघडले तेव्हां ह्मणाला, "युधाजिता, ध्रुवसंधिमहाराजांचे अखेरीस अयोध्येंत, नंतर गुरुमहाराजांचे आश्रमांत, आणि शेवटीं या काशीमध्यें सुबाहुमहाराजांच्या कचेरींत, "आपणास कोणी दडपणार नाहीं." असें समजून यथेच्छ अन्याय करितांना तुला बहुत गोड वाटलें आँ? परंतु त्यांचा परिणाम कितीं कडू आहे, याचा आतां पूर्ण अनुभव घे! दुष्टा, दुर्बुद्धि धरून तू बुडालास आणि आपल्या सोबत्यांचाही काळ झालास! अरे अन्यायसमुद्रा, सुबाहुमहाराजांच्या एथील कचेरींत सर्व राजांच्या समुदायासमोर तुझा पाणउतारा हें तुला महाप्रायश्चित्त घडलें, तथापि निर्लज्जा तुझें पातक त्याणें सरलें नाहीं, ह्मणून आतां प्रत्यक्ष देहांत प्रायश्चित्त देऊन तुला धर्ममार्गानें निष्पाप करितों. पहा बरें, तू बेशुद्ध झाला होतास त्याच वेळेस एका बाणेंकरून तुला यमसदन दाखविलें असतें; परंतु तो अधर्म यास्तव तुला अवकाश दिला आहे. पुर्ता सावध होऊन आपली नीट व्यवस्था कर. आतां सांपळ्यांत सांपडलेला लांडगा तू जाणार

अहिस कोठें? " मग महाराज, युधाजितही सावध होऊन नंतर आपल्या सेनेकडे पाहून दमदारीनें बोलला, " अरे सुदर्शना, तुला मीं शत्रूंस जिंकिलें असें वाटलें काय? पोरा, दाहा हातांपुढें तुझा एक हात काय करणार? " नंतर सुदर्शनानें उत्तर केलें, " वेड्या युधाजिता, अरे हातांची संख्या पुष्कळ असली ह्मणजे झालें काय? सहस्रार्जुनाला हजार हात होते, पण परशुरामाच्या दोहीं हातांनींच त्यांस कोणती अवस्था दिली ती कधीं ऐकिली आहेस काय? " नंतर युधाजित् ह्मणाला, " अरे परशुराम तो परशुराम ! तुझ्यासारख्या तोतया परशुरामाला आह्मी ओळखीत नाहीं. " नंतर सुदर्शन ह्मणाला, " अरे तुमच्या डोळ्यांत प्राण आहेत तोंपर्यंत तुह्मी मला न ओळखावें; अशीच तुह्मांला काळाची प्रेरणा झाली असावी, हें मी समजतों आहें. तसें नसतें तर या दशेला कशास आलां असतां? असो, आतां लवकर तयार व्हा. " अशा दोघांच्या संवादांतीं खवळलेल्या समुद्राच्या खळखळाटासारख्या पुन्हा नौबदी सुरू होतांच सुदर्शनानें मोठ्या आवेशेंकरून शत्रूंवर तीव्र बाणांचा वर्षाव करून त्यांतील हजारों वीरांचे देह छिन्न भिन्न केल्यामुळें तें शत्रुसैन्य फुललेल्या पलाशवृक्षांच्या जंगलाप्रमाणें लालभडक दिसूं लागलें ह्मणून वाटलें कीं, सुदर्शनरूप प्रलयाग्नि क्षणामध्यें शत्रुसैन्यतृणाची खाक उडवील ! असो, महाराज, मी आतां तिकडे जातों. ( निघून जातो ).

( इतक्यांत " शिव शिव शिव " असें उच्चारित मंत्राकरदीक्षित येतांच खालीं मान घालून बसतो ).

मनो०—( घाबरून ) कां हो दीक्षितजी, असें काय करितां? काय झालें असेल तें सांगा तरी !

मंत्रा०—( धुसकरा टांकून रडक्या स्वरानें ) मनोरमाबाई, "असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ." युद्धधर्मविमुख ते युधाजित्प्रमुख! जेव्हां सुदर्शनानें तीक्ष्णबाणांच्या योगेंकरून त्यांच्या सैन्याचा, कुंभाराच्या गाऱ्याप्रमाणें काला केला तेव्हां, रत्नदीपावर असंख्य पतंगांनीं झडप घालावी तशी त्यांच्या चवताळलेल्या शेकडों वीरांनीं एकल्या बालकावर एकदम चाल केली, तरी सुदर्शनानें एका बाणाच्या तडाख्यासरसे दाहापांच असे कित्येक वीर लोळविले! आणि तेणेंकरून तो कांहींसा श्रांत झाला, अशी संधि पाहून त्या सर्व दुष्टांनीं मिळून त्याजवर शस्त्रास्त्रांची गर्दी केली. त्या वेळेस सुदर्शन ह्मणाला, "अरे धर्मभ्रष्ट हो, आपल्या या देहांतसमयीं स्वर्गाचा मार्ग सोडून यमपुरीचा धरूं नका!" परंतु त्याचें असेंही भाषण न ऐकतां कोणीं रश्मि तोडिलें! कोणीं घोडे मारिले! कोणीं कणा मोडिला! अशा प्राणसंकटांत पडला असतांही तो सुदर्शन केवळ दुर्गादत्त खड्ग घेऊनच शत्रूंची कत्तल उडवीत चालला ! त्यास पाहून दुष्ट युधाजित् आपल्या कांहीं वीरांसहवर्तमान रणभूमीला अर्धी प्रदक्षिणा करून नंतर सुबाहु आणि सुदर्शन यांच्या मध्यें शिरून, एखाद्या नदीचा ओघ कड्यावरून खोल जाग्यावर पडतो, तसा अकस्मात् पाठीमागून सुदर्शनावर चालून गेला ! तथापि नदीच्या खालीं पडल्या प्रवाहांतून जलसंचारचतुर मत्स्य जसा चटकर वर येतो तसा, संग्रामांत सुरकुंड्या

मारण्याविषयीं महापंडित धैर्याचा सागर तो सुदर्शन त्या एका तलवारीनेंच युधाजिताचे वीरांस जर्जर करीत क्षणामध्यें येऊन सुबाहुराजाला भेटला, आणि त्याच्या अंगांत जगदंबेनें दिलेलें दुर्भेद्य कवच होतें ह्मणून अक्षत राहिला, पण जिवापरत्या अतिश्रमांनीं मूर्च्छित झाला असें पहातांच सुबाहूनें आपल्या महावीरांस शत्रूचे तोंडावर ठेवून सुदर्शनास इकडे रवाना करण्याचें मंत्री यांजवर सोपवून, नंतर स्वतः तीव्र आवेशानें शत्रूंवर चाल केली.

(इतक्यांत दोहों हातांनीं दोवा मनुष्यांचे हात धरून बेजार झालेला सुदर्शन पडद्यांतून थकत थकत येऊन मनोरमे पुढें बसतो ).

**मनो०**—( वाबरून नंतर लगबगीनें त्याला पोटाशीं धरून त्याचे तोंडावरून हात फिरवीत रडक्या स्वरानें ) पुरता सावध झालास काय सुदर्शना ? बाबा, शत्रु पडले अगणित, आणि तुला सुबाहुराजाखेरीज कोणी सहाय नाहीं, यास्तव आजून तरी अभिमान सोडून आपला आणि आह्मां सर्वांचे जीव वाचीव ! राहूच्या दाढांतून मुक्त झालेल्या चंद्रबिंबासारखें तुझें मुख मीं पुन्हा पाहिलें इतकाच लाभ पुरे!

**सुदर्शन**—( धैर्यानें ) आईसाहेब, आपण भितां कां बरें ? असे प्रसंग विचारवान क्षत्रियांनीं सहज गिळून जावें! आणि अशा संकटामध्यें आपल्यास जगदंबा उपेक्षिल काय? आतां ती भक्तांचा अंत पाहत्ये, ही तिची रीति पुराणप्रसिद्धच आहे; असें असून श्रमांच्या भयानें अभिमान सोडावा ह्मणतां, तर ब्राह्मणांनीं थंडीला भि-

ऊन प्रातःस्नान सोडावें, असेंही होईल! असो, सुबाहु-महाराज मजकरितां प्राणसंकटांत आहेत, याकरितां क्षणभर कोणी कांहीं बोलूं नका. (दृष्टि आणि हात आकाशाकडे करून) हे जगज्जननि दुर्गे, अधर्मी, क्षुद्र अशा शत्रूंकडून आमचा पराभव आणि उपहास व्हावा, हें तुला नीट दिसतें काय? तुझ्या पायांपाशीं माझी पूर्ण निष्ठा असली तर या विषमप्रसंगीं,—

धांवा.—(राग मधुमाल सारंग).

धांवधांवदुर्गेमाते बालातेंमजलातारीं ॥ ध्रु० ॥
अद्यावधि[1]निरवधि[2]वधिले युद्धामधिदानवजेणें ॥
ब्रह्मांडींजेंजेंकांहीं हेंसर्वहिज्याच्छेदणें ॥ ऐसाजो-
त्वत्कर[4]कैसा तन्महिमामानवजाणे ॥ अन्यमीकां-
हींनेणें त्वन्नामचिसंततघेणें हेंसकळशुभाचेंबेणें
बोलतीशास्त्रेंसारीं ॥ धांवधांव० ॥ १ ॥
॥ पंचाब्दिकमुकलापाही दासहाअपुल्यागेहा[6] ॥
ज्याअरिच्यायोगेंअजितो नाशायापाहेदेहा ॥ को-
णत्वद्दृवपविवांचुनि संकटनगफोडिलगेहा ॥ श-
मवुनिममानसदाहा दमवुनियाअरिच्याबाहा[9] ॥
भ्रमवुनिराणिंनिजहरिवाहा[10] आमुचेंसंकटवारीं ॥
धांवधांव० ॥ १ ॥ ८१ ॥

(इतक्यांत आकाशामध्यें (पडद्यांत) “बालका सुदर्शना, अरे तू लेशमात्रही भिऊं नकोस, ही मी तुला मदत आल्यें पहा! चल हो पुढें.” असा शब्द होतांच सु-

---

१ आजपर्यंत. २ असंख्य. ३ दैत्य. ४ तुझा हात. ५ पांच वर्षां-चा. ६ घराला. ७ तुझी दृष्टि या वज्रावांचून. ८ संकटपर्वत. ९ भुजा. १० सिंहवाहनाला.

दर्शन धनुष्य उचलून मंत्राकरदीक्षितासह निघून जातो).

**मनो०**— ( घाबरून ) पद्मावतीबाई, तुमच्या जावायानें मोठा धाडसपणा केला आहे! आतां जगदंबा कसा शेवटास लावील तो लावो.

**अनुष्ठिति**—मनोरमाबाई, आकाशवाणीद्वारा जगन्मातेनें अभय दिलें असतांही आपण हें काय मनांत आणितां?

**शशि०**— ( किंचित् लाजून ) माझा कांहीं बोलण्याचा अधिकार नाहींच, परंतु प्रसंगास अनुसरून बोलत्यें. विजय आपल्या पदरांत पडल्यासारखा आहे; असें समजून सर्वांनीं आनंदित असावें!

( इतक्यांत विजयी झालेल्या सुदर्शनप्रमुखांनीं प्रवेश केला असतां सारे यथायोग्य आचरितात ).

**सुद०**— ( गहिंवरत मनोरमेकडे हात जोडून ) महाराज मातुश्री, जगदंबेनें काय अद्भुत चमत्कार केला तो, माझा कंठ दाटून आल्यामुळें माझ्यानें प्रस्तुत सांगवत नाहीं! ह्मणून ह्मणतों, एथील मंडळीस; ( सुबाहूकडे हात जोडून ) राजेसाहेब सांगतीलच, आणि मीं गुरूमहाराजांबरोबरच आपल्या बरोबरच्या सर्वांस सांगावा, असें योजिलें आहे.

**मनोरमा**— ( गहिंवरत सुदर्शनाच्या पाठीवरून हात फिरवून ) बरें आहे बालका.

**सुबा०**— ( मनोरमेकडे हात जोडून ) मनोरमाबाई, आपण जगदंबेचें परमप्रीतिपात्र असून, दुर्बळां आह्मांला पदरांत घेतलें; एणेंकरून आह्मी कृतार्थ झालों. खेरीज आपली धन्यता वर्णायास मी असमर्थ आहें!

**मनो०**— हे सुबाहुराजा, ( शशिकला आणि सुदर्शन

यांजकडे हात करून ) यांची वडील मी, असा संबंध पाहून तू मला धन्यता दिलीस ही लोकरीतीप्रमाणें नीटच,. परंतु वास्तविक पाहिलें असतां बोलण्यास अडचणच आहे ! कारण,—

## आर्या.

परिकरित्येमातेनें चिकरावीसुतंनुती[1]नलोकांत ॥
मत्सुतंयोगें[2]धन्या त्वत्कन्या[3]सुं[4]तनुतीनलोकांत ८२

सुद०— ( सुबाहूकडे हात जोडून ) आपण आह्मांला घालविण्याच्या निमित्तानेंच मदत केली, एणेंकरून मार्ग निष्कंटक झाला ! आतां, "ग्रामांतरीं जाणारास फार लांब घालवायास जाऊं नये." या शास्त्रार्थाअन्वयें एथेंच आह्मांला आज्ञा देऊन, परिवारासहित आपण आनंदानें स्वमंदिरीं प्रवेश करावा. ( त्यास मुजरा करितो).

सुबा०— उत्तम आहे! ( त्यास आलिंगून खळखळां प्रेमाश्रु ढाळितो ).

सुद०— ( त्याचा हात धरून ) राजेसाहेब, हें काय? आतां आह्मी आपल्याला दूर आहों; असें नाहीं.

सुबा०— ( डोळे पुशीत ) खरें आहे.

पद्मावती— ( शशिकलेला पोटाशीं धरून प्रेमाश्रु ढाळीत ) शशिकले, तुझ्या मस्तकावरील संकटाचें ओझें अंबाबाईनें अगदीं उतरलें ! आतां आनंदानें अयोध्येचें राज्य करा, पण आमचें स्मरण असूद्या बरें !

सर्व— ( डोळ्यांस पदर लावून फुंदतात ).

---

१ पुत्राची स्तुति. २ माझ्या पुत्राच्या योगानें. ३ तुझी कन्या. ४ उत्तम शरीराची.

**सुबा०**— ( सुदर्शनाकडे ) सुदर्शनराज, चलावें; आमचें हें आतां लवकर सरायाचें नाहीं!

**सुद०**— ठीक आहे. ( मनोरमा, शशिकला, विदल्ल आणि जरती यांसह निघून जातो ).

**सुबा०** —( पद्मावतीकडे ) जगदंबेनें सर्वत्र आनंद केला! चला आतां मंदिरीं.

**पद्मा०**— अंबाबाईनेंच ही वेळ दाखविली खरी! चलावें.

**सर्व**— ( सुबाहूबरोबर निघून जातात ).

---

## प्रवेश २ रा.

### पात्रें १०.

१ **विदूषक** ......... हास्यकारी.
२ **भारद्वाज** ......... प्रसिद्ध मुनि.
३ **माधव**........... त्याचा थोरला शिष्य.
४ **कमलाकर**.... ... ,, धाकटा ,,
५ **सुदर्शन**.......... अयोध्येचा राजा.
६ **शशिकला**........ त्याची स्त्री.
७ **मनोरमा**......... ,, माता.
८ **विदल्ल**........... त्याचा मंत्री.
९ **जरती**............ मनोरमेची वृद्ध दासी.
१० **विद्याधरमिश्र**.... एक तापस ब्राह्मण.

---

## स्थळ–भारद्वाजाश्रम.

(तदनंतर विदूषक प्रवेश करितो).

**विदू०**– (भारद्वाज सभामंडपांत नाहींत असें दिसून येतांच बावरल्यासारखा इकडे तिकडेस पाहतो).

(इतक्यांत माधव आणि कमलाकर यांसह भारद्वाज प्रवेश करितो).

**भारद्वाज**– (शिष्यांसह पूर्ववत् बसून विदूषकाकडे) अरे वनचरा, केंव्हांसा आलास? आणि असा बावरल्यासारखा कां दिसतोस?

**विदू०**–(हात जोडून) हा नुक्ताच आलों महाराज, आणि ज्ञानसमुद्रापासून उत्पन्न झालेल्या आनंदचंद्राच्या प्रकाशानें विराजमान असें गुरुराजांचें मुखकमल सर्वकाळ आहेच, परंतु; "सुदर्शनराजा साऱ्या शत्रूंचा पराभव करितहोत्साता दिग्विजयी होऊन आला." हें ऐकून आपणांस निःसंशय ब्रह्मानंदतुल्य आनंद होईल, तर या योगेंकरून; परिपूर्ण अशा दोहों चंद्रांच्या कांतीनें नटविलेल्या आकाशाची असंभाव्यही शोभा गुरुराजांच्या मुखमंडळीं पहाण्याच्या उत्कंठेनें बावरलों आहें!

**भार०**–(अतिहर्षानें सगद्गद हांसून) अरे; काय काय बोललास? "सुदर्शन दिग्विजयी होऊन आला?"

(इतक्यांत आपल्या मंडळीसहवर्तमान सुदर्शन प्रवेश करितो, नंतर ते सारे भारद्वाजादिकांस वंदितात).

**भारद्वाज**– (पाया पडणाऱ्या सुदर्शनाच्या मस्तकाला उजव्या हातानें स्पर्श करून) सम्राट् भव!

(नंतर सारे यथायोग्य बसतात).

सुद०–( हात जोडून ) गुरुमहाराज, या चरणांच्या अनुग्रहेंकरून, ( आपल्या हृदयास हात लावून ) या दासानें केलेली प्रार्थना ऐकतांच जगदंबेनें रणांगणीं प्रगटून, राज्य निष्कंटक आणि कीर्ति निष्कलंक केली!

भार०–( हर्षभरानें ) सुदर्शना, अरे; तू जगन्मातेचा महाभक्त आहेस! आणि तिचें करुणाशालित्व असें प्रसिद्धच आहे कीं, कोणीं सद्भक्तानें हाक मारिली असतां, तत्क्षणीं;–

पद.–( राग लीलांबरी ).

धावुनियेइजगन्माता वेगेंलघु[1]करूनीवारा[2] ॥ ध्रु०॥ भुवन[3]गसेवकलपितार्णा ऐकेदु[4]र्गादिक्कर्णा ॥ नलगे-याजविलोकर्णा अधिंतीनांवाचिअपर्णा[5] ॥ भक्तां-संकटिंदेहाता वेगें०॥ धावुनि०॥ १ ॥ नगणीवि-प्रादिकवर्णा तैशीतरुणाअणिजीर्णा[6] ॥ येत्यास्त्री-यांऽ[7]हयवर्णा लोभेघेनुत्रशीनिर्णा[8] ॥ भजभजमनुजा-तिसआतां वेगें० ॥ धावुनियेइ० ॥ २ ॥ ८३ ॥

सुद०–( हात जोडून ) गुरुमहाराज, आतां असें मनांत आहे कीं, सर्व शिष्यांसह आपण अयोध्येस चलावें, नंतर गुरुरायांस आणि वसिष्ठमहाराजांस काशीक्षेत्रीं झालेला सारा वृत्तांत बरोबरच निवेदित करावा.

भार०–( डोलून ) बहुत उत्तम आहे; चला.

सर्व–( उठून भारद्वाजा मागें निघून जातात ).

---

१ लहान. २ वाऱ्याला. ३ ब्रह्मांडांत राहाणाऱ्या सेवकांच्या भाषणांतील अक्षरांस. ४ दिशाच जीचे कर्ण. ५ कोणाचें ऋण न ठेवणारी. ६ वृद्धास. ७ आपल्या नांवाच्या अक्षरांस. ८ वीसरास.

## प्रवेश ३ रा.

पात्रें.

| | | |
|---|---|---|
| १ | वसिष्ठ............... | प्रसिद्ध मुनि. |
| २ | समयज्ञ............. | त्याचा थोरला शिष्य. |
| ३ | सुमती ............. | ,, धाकटा ,, |
| ४ | लीलावती......... | सुदर्शनाची सावत्र आई. |
| ५ | समरसिंह ......... | सेनापति. |
| ६ | विदूषक............ | हास्यकारी. |
| ७ | भारद्वाज ............ | प्रसिद्ध मुनि. |
| ८ | माधव ............. | त्याचा थोरला शिष्य. |
| ९ | कमलाकर ......... | ,, धाकटा ,, |
| १० | सुदर्शन ............ | अयोध्येचा नूतन राजा. |
| ११ | शशिकला ......... | त्याची स्त्री. |
| १२ | मनोरमा............ | ,, माता. |
| १३ | विदल्ल............... | त्याचा प्रधान. |
| १४ | जरती ............... | मनोरमेची वृद्ध दासी. |
| १५ | विद्याधरामिश्र ...... | एक तापस, शशिकलेचा संकटत्राता पिता. |

---

### स्थळ–अयोध्येंतील राजमंदिर.

(तदनंतर; समयज्ञ, सुमति आणि समरसिंह, यांसह वसिष्ठ प्रवेश करितो तोंच सुदर्शन तसेच भारद्वाजप्रमुख सर्व येतात नंतर ते सारे यथायोग्य आचारितात)

**वसिष्ठ**–(आनंदानें) सुदर्शनराजा, काशी इत्यादिस्थानचा त्वत्संबंधी सर्व वृत्तांत आणि विजयी झालेल्या तुमचा एथें प्रवेश होण्याचा समय समाधिद्वारा समजून,

आह्मीं राज्याभिषेकसंबंधि पुण्याहवाचनाचीसुद्धां सिद्धता करून ठेविली आहे! आणि हा शत्रुविजयोत्साह राज्याभिषेकोत्सवपूर्वक करावा, असें योजिलें आहे!

सुद०—गुरुमहाराज, आधीं या आपल्या नगरींत एक मोठा मनोहर प्रासाद बांधून त्यांत श्रीदुर्गेची स्थापना करावी, नंतर आपण राजपदाधिरूढ व्हावें असें मनांत आहे.

वसिष्ठ— शाबास! ठीक आहे सुदर्शना, तसाच संकल्प करूं.

(इतक्यांत लीलावती प्रवेश करून, सुदर्शनाच्या समीप बसत्ये).

सुद०—(उठून आणि तिला नमस्कार करून बसल्यानंतर हात जोडून) हे माते, तुझा औरस पुत्र आणि जनक पिता यांजला रणांगणीं जगदंबेनें स्वहस्तें देहबंधांतून सोडविलें! नंतर मींही शास्त्रोक्त रीतीनें त्यांस ऊर्ध्वपंथीं लाविलें.

लीलावती— (गहिंवरून) बालका सुदर्शना, ते अन्यायी असूनही सुज्ञशिरोमणी तुझ्या शत्रुत्वानें देखील जगदंबेच्या क्रोधास पात्र होऊन तरी पातकविरहित झाले, एणेंकरून मलाही संतोष असावा; परंतु बाबा, "दुराशा" या चिखलांत डुबणारे आह्मी, (धुसकारे टाकित डोळ्यांस पदर लावून) एकाएकीं तडाफडीनें पोराची ही दुर्दशा ३! (खळखळां रडत्ये).

सुद०—(लगबगीनें तिला पोटाशीं धरून) बया, आतां हें काय बरें! जसें प्रारब्धीं होतें तसें घडून गेलें, आतां त्याविषयीं तुह्मीं आणि आह्मींही कांहीं मनांत आणून उपयोग नाहीं! ज्या वेळेस माझ्या जननीवर

समय गुजरला त्या वेळेस तिच्या अंतःकरणाचें काय झालें असेल बरें? आतां माझा वियोग नव्हता तरी आह्मां दोघांलाही वनवास तसाच रात्रंदिवस मृत्यूचा दचका! त्यांत झोंपेची आणि भुकेचीही दाद नाहीं. आणि तुला पुत्रवियोग आहे, तर वनवास वगैरे दुसरें कोणतेंही संकट नाहीं. प्रस्तुतकाळीं जें कांहीं आहे, हें सर्व आपलें असें समजून लोभरीतीनें मला वागवून घ्यायाचें, इतकेंच. ( अम्मळ दूर सरतो ).

**लीला**०—बालका, खरें ह्मणतोस. आणि शपथपुरस्कर बोलत्यें. या संबंधें मजकडून तुजवर तिळभरही दोष नाहीं.

**वसिष्ठ**—सुदर्शना, अरे ही लीलावती अतिसुशील असून ईच्या पित्यानें इजवर व्यर्थ खलत्वाचा आरोप आणिला. असो; आतां चला याज्ञिकमंडपांत.

**सुद**०—( त्याजकडे हात जोडून ) आज्ञा.

( मनोरमा, विदल्ल, समरसिंह आणि विदूषक, यांखेरीज सर्व निघून जातात ).

**मनो**०—( विदल्लाकडे ) प्रधानजी, काय हो वसिष्ठमहाराजांची ज्ञानशक्ति ही!

**समर**०—( तिजकडे हात जोडून ) महाराज, आपण एथून गेल्यापासून या वेळपर्यंत आपणांस कोणकोणत्या समयीं कसकसे प्रसंग आले आणि त्या त्या प्रसंगीं जगदंबेनें आपणांवर कसकशी करुणा केली, हें सारें वसिष्ठमहाराजांनीं प्रतिपदीं आपल्या सर्व मंडळींस सांगितलें ह्मणजे पहा!

**मनो**०—सेनापती, मग उगीच का; वसिष्ठमहाराज ह्मणजे ज्ञानाचा सागर, असा त्यांचा त्रैलोक्यांत डंका झडतो आहे?

( इतक्यांत पडद्यापलीकडे ) राजाधिराज भूमंडलाखंडल सुदर्शनराज महाराइेज, आस्तें, कदम् मुलाजा ३. (असा शब्द होतांच सर्व उभे राहतात, नंतर वसिष्ठप्रमुखमंडळीसुद्धां सुदर्शन, प्रवेश केल्यानंतर मनोरमेला मुजरा करितो, आणि प्रधान, सेनापति, विदूषक, हे त्याला तसाच मनोरमेलाही मुजरा करितात, नंतर सर्व यथायोग्य बसतात ).

**कंचुकी**–निगारखे मेहेर्बान्. ( मंडळीकडे ) अदब्सें.

**विदल्ल**–( वसिष्ठाकडे हात जोडून ) गुरुमहाराज, त्या राज्याभिषेकाच्या धामधुमींत, या चरणांचें स्मरण करून आह्मी निघालों; त्याप्रमाणें ( भारद्वाजाकडे क्षणभर हात जोडून ) मुनिमहाराजांनीं आह्मांस आदरपूर्वक आश्रय देऊन; आह्मांवर जी कृपा केली, तिचा प्रकाश भूमंडळावर कसा पडला तो, समाधिद्वारा आपण आणि आपल्या मुखें एथील रहिवासी यांस समजलाच आहे, परंतु बाकीच्यांस कळावा यास्तव त्यांतला सारांश सांगतों. वाराणसीनगरींत स्वयंवरार्थ जमलेल्या अनेक देशच्या राजांतून; शत्रुजित्, युधाजित्, तसेच त्यांचे सोबती यांस फसवून, ( शशिकलेकडे अम्मळ हात जोडून ) वधूपक्षी यांनीं विवाहोत्साह शेवटास नेला, तेणेंकरून ते दुष्ट फारच खवळले आणि मोठ्या तयारीनें आमचा मार्ग धरून जागरूक राहिले! नंतर आह्मी निर्भयचित्तानें त्यांच्या समोर आलों तेव्हां त्यांचा तो भयंकर आवेश आणि सैन्यविन्यास पाहतांच, ( मनोरमेकडे ) आईसाहेब तसेच सुबाहुप्रमुख हे भयभीत झाले असतां, ( सुदर्शनाकडे हात करून ) महाराजांनीं

करुणस्वरेंकरून जगदंबेचा धावा करण्याबरोबरच ती प्रगट होऊन, तिणें तें समुद्रासारखें अपरंपार शत्रुसैन्य पहातांच इतक्या मूर्ति धरिल्या कीं, त्या सैन्यांत जिकडे पहावें तिकडे ती जगन्माता, "नूतन मेघमंडळांत सर्वत्र चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणें" दिसतच होती! नंतर तिणें क्षणांत त्या साऱ्या दुष्टांचा संहार केला आणि (त्याजकडे हात करून) गुरुवर्यांच्या आज्ञेंत राहून स्वप्रजांस चिरकाल सुख द्यावें अशी (सुदर्शनाकडे हात करून) सुदर्शनमहाराजांस आज्ञा देऊन, ती अंतर्धान पावली! गुरुमहाराज, या प्रकारें जगदंबेनें आह्मांवर कृपा केली, असें कळून येतांच केरलाधिपतिप्रमुख सर्व राजे (सुदर्शनाकडे) महाराजांस शरण आले!

सुद०—गुरुमहाराज, यावरून असा प्रत्यय आला कीं, ज्यांची बुद्धि निरंतर संशयग्रस्त; अशामुळें धांदलपट्टीची वर्तणूक असल्ये, त्यांस कोणताही निश्चित लाभ न होतां, शेवटीं लज्जा देखील सोडून द्यावी लागत्ये! या अन्वयें प्रस्तुतकृत्यांत ते अपक्वबुद्धि; युधाजिताचे अनुयायी यांणीं ती; युधाजित्, शत्रुजित्, अंगेश, वंगेश, इत्यादिकांची दुर्दशा पाहतांच, आमच्या पक्षांत प्रकाशणाऱ्या आपल्या आशीर्वादाचे तेजाचा उदार प्रभाव मनांत आल्यामुळें,—

### द्रुतविलंबित.

दुचकुनीचकुनीतिसटांकुनी[1] ।
धरणिशींरणिंशीर्षहिटेकुनी[2] ॥
नमतितेमतितेंधरुनीभल्या ।
मजनलाजनलाभहिधांदल्या ॥ ८४ ॥

---

१ घाणेऱ्या नीतीस. २ डोकेंही.

तात्पर्य; आपली कृपादृष्टि परिपूर्ण! यास्तव अशी ज-गन्मातेची दया माझ्याठायीं प्रकाशित झाली!

**वसिष्ठ**—( नेत्रांस आनंदाश्रु आणून ) सुदर्शनराजा, अरे; या वृत्तांतांतलें रहस्य इतकेंच कीं, "तू महाभाग्यशाली!" पहा बरें, तुह्मांस तसल्या घोर संकटांतही विदल्लप्रधान ही केवढी सुसंगतीची जोड मिळाली! अरे; सारें राज्य हातांत असतां तें तृणवत् टाकून ज्याणें तुह्मांबरोबर अज्ञातवाससंबंधीं प्राणांतिक क्लेश सोसण्याचें पतकरून, नंतर आपलें धैर्य, चातुर्य आणि इमान या तीन भोपळ्यांचे सांगडीच्या आधारावरच तुह्मांला गळ्यांत बांधून घेऊन कष्टसागरांत उडी घातली! आणि ही त्यांची सत्यश्रद्धा, स्वामिसेवानिष्ठा पहातांच जगदंबेनें तुह्मांस, ( भारद्वाजाकडे ) ही महानौका दिली! ( विदल्लाकडे ) शाबास विदल्लप्रधानजी! ( सुदर्शनाकडे ) आतां दुर्गेनें तुह्मांस प्रतिपदीं सांभाळिलें याचें आपलें चिंतन करावें; इतकेंच! कारण, ( गहिंवरून ) तिच्या कारूण्याचें वर्णन कोणीं करावें! अरे, त्याविषयीं मजसारख्याची तर कथाच राहूंद्या; परंतु,—

### अश्वधाटी.

सारीनहोयभवनारीगुणौघ[1]मितिभारीकबुद्धिहिजरी ।
चारीश्रुतींसअधिकारीवदेलविधि[2]भारीलयावधि[3]तरी ॥
तारीबुधां[4]सिविबुधारीं[5]ससंगरिं[6]विदारीस्वभक्तिविभवा[7]।
द्वारींविलोकुनिउभारीवराभयकरांरीतिहीधरिशिवा ८५

---

१ अंबिकेच्या गुणसमुदायाची संख्या. २ ब्रह्मदेव. ३ आयुष्य सरे तोंपर्यंत. ४ पंडितांस. ५ राक्षसांस. ६ युद्धांत. ७ आपली भक्ति हेंच ज्याचें वैभव अशा भक्तास.

आणि सुदर्शनराजा, त्या जगदंबेनें आपल्या महाभक्तांत तुझी गणना करावी, असा अधिकार तुला प्राप्त होण्याचें मूळ, (भारद्वाजाकडे) या भारद्वाजांचा अनुग्रह! हे भारद्वाजा, या सूर्यकुलांत शिरलेला अन्याय समूळ खाणून काढून पुन्हा न्यायस्थिति तुह्मीं केली ही! एणेंकरून आह्मी तुमचे बहुत आभारी आहों!

**भारद्वाज**– (वसिष्ठाकडे हात जोडून) वसिष्ठमहाराज, सुदर्शनराजा आमच्या आश्रमांत असतां त्याचे ठायीं बीजरूपानें असलेला आपला आशीर्वाद, त्याच्याच बुद्धितत्वद्वारानें स्वधर्मपांडित्यरूप धरून प्रकाशित झाला; एणेंकरून जसे सूर्यकुलाचे गुरु वसिष्ठ विश्वामित्र तसा अंशतः भारद्वाजही झाला. अशी माझी कीर्ति, (सुदर्शनाकडे) या आपल्या शिष्याच्या योगेंकरून सहज झाली. यावरून, "साक्षात् थोरांच्या असो, परंतु त्यांचे सेवकांच्याही समागमानें दुमऱ्यास थोरपणा येतो." याचा अनुभव हा मीं घेतला आणि या आपल्या संबंधानें कृतार्थ झालों!

**वसिष्ठ**–(प्रेमानें गाहिंवरून) हे भारद्वाजा, आपण भाषण केलें हें आपणां शुद्धसत्वशीलांचें स्वाभाविकच आहे, परंतु तुमच्या आश्रयानें त्या खलशिरोमणी युधाजिताच्या झपाट्यांतून सुदर्शन वांचला, ह्मणून आमची ही प्रतिष्ठा राहिली! या अन्वयें झालेले तुमचे उपकार; कोणत्याही प्रत्युपकारानें फिटण्याचा संभव नाहीं! यास्तव ते सतत आह्मांवर असूनही आह्मांस त्यांचें ओझें वाटत नाहीं! कारण; जे तुह्मांसारखे महाभाग, त्यांचें उपकार करणें हें प्रत्युपकार करून घेण्याकरितां नसतेंच!

**भार०**—वसिष्ठमहाराज, माझे उपकार कशाचे? या.

विषयीं पूर्वीच मी बोललों आहें, आणि जरी आहेत ह्मटलें, तरी आपल्या मुखचें, "महाभाग" हें विशेषण मला मिळालें, येणेंकरून ते सहस्रगुण फिटलें. वसिष्ठमहाराज, धन्य आहेत हे सूर्यवंशोद्भव राजे. कारण, ज्यांचे कुलगुरु शांतिज्ञानसागर आपण !

**वसिष्ठ**—हे भारद्वाजा, फार कशास बोलूं ? जें झालें तें जगत्प्रसिद्धच आहे; परंतु तुह्मी एथवर येऊन सुदर्शनाचा राज्याभिषेकसमारंभ सांग केला, एणेंकरून आह्मांस परम संतोष झाला. ( सुदर्शनाकडे ) सुदर्शना, आपणां सर्वांस भारद्वाजमुनींनीं कृतार्थ केलें !

**सुद०**—(हात जोडून) गुरुमहाराज, आपण; भारद्वाजमुनि, तसेंच माझे मानित श्वशुर ( विद्याधराकडे ) हे विद्याधरमिश्रजी, या जगदीश्वराच्या विभूति लोकोद्धारार्थच सृष्टींत वास करिताहेत. त्यांतही आह्मां सूर्यकुलसंबंधिपुरुषांचा आपणांशीं विशेषतः संबंध; या अन्वयें आह्मी सर्वदां आनंदनिमग्न आहों !

**वसि०**—शाबास शाबास सुदर्शना. जगदंबेनें तुझें सर्वप्रकारक कल्याण केलेंच आहे! तथापि आणिक कांहीं इप्सित असल्यास तें सांग.

**सुद०**—गुरुमहाराज, आपण हें जगदंबेचेंच रूपांतर! अशा आपल्या कृपादृष्टीनें आह्मी कृतार्थ आहोंच; तथापि गुरुमहाराजांच्या प्रश्नाअन्वयें आणिक मागतों. त्या स्तोत्रप्रिये दुर्गेची मजकडून निरंतर स्तुति घडो.

**वसि०**—( हर्षानें ) सुदर्शना, तथास्तु. अरे, साऱ्या लेंकरांत जें लहान तें जननीचें फारच लाडकें असतें; त्यांत तू दुर्गेचा नूतन परमभक्त; अशा तुझें प्रार्थित, तेंही

स्तुतिगर्भ; हें तर तिला फारच आवडेल. यास्तव ह्मणतों, तुला पुढें करून तिचें स्तोत्र करूं, नंतर सर्व आपआपल्या उद्योगास जाऊं; ह्मणजे तिच्या कृपेनें सर्वत्र मंगल होईल!

सुद०— ( हात जोडून ) आज्ञा.

## भरतवाक्य पद भूपाळी.

जागृहि[1]दुर्गे विधिहरिभर्ग[2] स्वर्गेशादिकसदा ॥ अतर्क्यकर्म[3]करितीसंतत सेवुनियातवपदां ॥ ध्रु० ॥ अशिवाचरणागणिताहितगण[4] पीडाक्षणदाशमा ॥ करुनिअह्मांलात्वांदाविलिनिज[5] करुणार्कोदयरमा ॥ १ ॥ सर्वमंगलादुर्गाआर्या शिवाभवानीउमा ॥ नामेंतुझिंहींजपतांपावे नरत्रिभवाभवसमा[6] ॥ २ ॥ दमतीजड[7]नरविषयांपासुनि सुखसिद्ध्यर्थश्रमा ॥ करुनीहेंमींतुझ्याकृपेनें जाणुनित्यजिलेंभ्रमा ॥ ३ ॥ ऐशीकरुणाकरीअंबिके भक्तांवरिसर्वदा ॥ विद्यानामाविनुझेंअह्मांला नकोदुजीगर्वदा ॥ ४ ॥ जागृहिदुर्गे० ॥ ८३ ॥

सर्व— ( निघून जातात ).

## सुदर्शनचरित्र नाटक समाप्त.

---

१ ( भक्तांचें कल्याण करण्यासाठीं ) जागरूक आस. २ ब्रह्मदेव, विष्णु, शिव, इंद्र, आदिकरून. ३ ( हीं कर्में ) कशीं झालीं, याचें मूलकारण काय, इत्यादिकांविषयीं मनुष्याचा तर्क चालत नाहीं अशीं. ४ अभद्र आचरण करणारे ( असे जे ) असंख्य शत्रुसमुदाय ( यांपासून होणारी जी ) पीडा ( या ) रात्रीच्या नाशानें. ५ आपली करुणा ( हाच जो ) सूर्य ( याच्या ) उदयाची शोभा. ६ ( साक्षात् ) शिवाच्या ( वैभवा ) सारख्या. ७ शास्त्रतत्व न समजणारे.

**आख्यानंरससदनं ज्योतिर्विदनंतदीक्षितोरचयत् ॥**
**सप्तर्षिपूर्निवासः श्रीमद्व्यासःकथांयथावोचत् ॥१॥**

अर्थ– श्रीमद्व्यासमुनि जशी कथा बोलला, ( तशी ) सातार्‍यांत राहणारा अनंत दीक्षित जोशी (चिपळोणकर) रसाचें ( केवळ ) घर ( असें हें ) आख्यान ( सुदर्शनचरित्र ) रचिता झाला. ॥ १ ॥

**दृष्ट्वैवकुसुमजातं स्वयमेवभवंतितत्रपुष्पलिहः ॥**
**तद्गुणशोधनानिरताः किन्नपुनःप्रार्थिताभवेयुस्ते ॥२॥**

अर्थ– कोणतेंही पुष्प पाहिल्याबरोबर, तेथें भ्रमर आपणच (आमंत्रण नसतांही ) त्यांतील ( आपणास ग्राह्य असा जो ) गुण ( मधु ) त्याच्या प्राप्तीविषयीं उद्युक्त ( होतात ) मग ( त्यासाठीं ) प्रार्थिलेले होणार नाहींत काय ? ( तर होतील ! )

ही अन्योक्ति आहे; इचें तात्पर्य,—कोणताही काव्यग्रंथ प्राप्त होतांच त्यांतील रसाच्या विवेचनाविषयीं काव्यज्ञ लोक दुसर्‍याच्या प्रेरणेवांचूनही मोठ्या उत्कंठेनें प्रवृत्त होतात ! मग प्रार्थिले असतां होणार नाहींत काय ? ( होतीलच होतील.)

सारांश— काव्यरसिकांस ही ग्रंथकर्त्याची प्रार्थना आहे. ॥ २ ॥

**किंचिज्ज्ञमपिचकिंचि न्नूत्नामेरंजयेन्नकिंकविता ॥**
**धान्यादेर्नूतनता तनतोषयतिक्षयामयाकलितम् ॥३॥**

अर्थ– आणखीं ( सदर ग्रंथांत जे गुण असतील ते आपल्या योग्यतेप्रमाणें ज्ञात्यास पूर्ण आनंद करतीलच ! परंतु– ) किंचिज्ज्ञालाही ( जो थोडक्या ज्ञानानें आपणास कृतकृत्य मानून गर्विष्ठ असणारा, अशा अल्पविद्यालाही ) माझी नूतन कविता थोडें ( तरी ) रिजविणार नाहीं काय ? ( हा मोठा संशय आहे ! ) अथवा ( संशय नकोच ! कारण,— ) धान्यादिकांची ( खरी गोडी दाखविणारी ) नूतनता क्षयरोगानें व्यापिलेल्या (मनुष्यास) संतोषवीत नाहीं ! ॥ ३ ॥

# मार्कंडेयकथानक.

## साक्या.

[1]मृकंडुमुनि[2]वनिंवनितेसहकारि वासधर्मजोडाया,
तोडाया[3]दृढकर्मपाशअणि विधि[4]दुर्लिपिखोडाया. १
योगयागकरिभागवुनीतनु [5]रागंन[6]विषयींठेवी,
[7]संसाराभिधअगविज्ञाया गंगाधरपदसेवी. २

## आर्या.

त्याचीगृहि[8]णीनिशिदिनिं तत्से[9]वारतपरंतुमानिंकष्टी,
[10]कींदुर्गति[11]भुजंगीला वारायात्यांनसेत[12]नुजयष्टी. ३
एकेदिनितीस[13]मुचित अवसरपाहुनिपतीसविनविसती,
वरवीगतिनअपुत्रा हीश्रुतिकिसणोशिकाळिजाकिसती ४.
शास्त्रानुरोधिहितकर तद्वचऐकुनिमुनींद्रतीसह्मणे,
खिन्ननसावेंत्वांमनिं भजतांविश्वेश्वरासिकायउणें. ५
नंतर[14]अर्थ्यंगतपें परमात्म्यासेवुनी[15]कपर्दीतें,
तोमुनिपुत्र[16]प्राप्ति प्रतिबंधकसकलकर्म[17]मर्दीतें. ६

## केकावळी.

प्रसन्नशिवत्यावदेमुनिवरावरीगावरा,
मृकंडुवदलामलात[18]नयदेअपर्णावरा;
ह्मणेशिवमुने[19]शतायुपरि[20]मूढं[21]वाजाणता,
मिळेलसुत[22]अल्पजीविवदपाहिजेकोणता. ७

---

१ मृकंडु, या नांवाचा ऋषि. २ स्त्रीसह. ३ बळकट. ४ ब्रह्मदेवानें (ललाटीं लिहिलेलीं) दुष्ट (वरचेवर. जन्ममरण प्राप्त होण्याचीं सूचक) अक्षरें. ५ प्रीति. ६ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, यांतून कोणत्याही. ७ जन्ममरणनामक. ८ स्त्री. ९ त्याच्या सेवेविषयीं तत्पर. १० कारण. ११ नरकरूप सर्पिणीला. १२ पुत्ररूप काठी. १३ योग्य. १४ सांगतपानें. १५ शिवातें. १६ पुत्रप्राप्तीला आड येणारें. १७ क्षीण करी. १८ पुत्र. १९ पूर्ण आयुष्याचा. २० अज्ञानी. २१ अथवा. २२ थोडक्या आयुष्याचा.

### आर्या.

मुनिमनिंविचारकरिबहु तरिनिश्चयहोइनाह्मणूनिवर,
सांगुनिभार्येसि[1]ह्मणे वदध्यावाकोणताप्रियेकुमर. ८

### गोपीगीत.

तीह्मणेजयासों[2]ठिमागल्ये सुत[3]करीकसेंज्ञानशून्य[4]तें,
बुद्धिवंततोनकरिकोणतें ह्मणुनिलोभतीज्ञों[5]निजाणते. ९

### आर्या.

द्विविधा[6]हिसुतदुःखप्रद कशासव्हावाअसामुनीसमज,
नुमजासितूपरिमद्व[7]चँ हितपरिणामा[8]र्थेऐकुनीसमज. १०
आणिसख्येआयुअसे ज्ञात्यापुत्रासिहा[9]यनेसोळा,
तीखेदेंपतिसवदे कैसातरितनयपाहुद्याडोळा. ११

### साक्या.

कांतेसहमुनियापरिचर्चा[10] करुनी सर्वे[11]ज्ञातें,
बोलेद्यावाज्ञानीसुतज्या स्तविति[12]लसर्वज्ञातें. १२
तथास्तुह्मणुनीअंतर्धाना पावेशिवमगभार्या,
मुनिचीहर्षुनियोग्यकालिंती तनयाप्रसवेआर्या[13]. १३
ज्याचासुततद्धित[14]हेंजाणुनि सप्रत्यय[15]अभिधेयं[16],
तन्नामकरणसमयींमुनिवर ठेवितिमार्कंडेय. १४

### भुजंगप्रयात.

पुढेंएकदांऐकतांघेसुविद्या नसेलेशचित्तींतयाच्याअविद्या[17];
मृकंडुप्रमोदेंकरीत्याचिमुंज शरत्[18]पांचवीलागतांपुण्य[19]पुंज. १५

---

१ स्त्रीस. २ त्याणें वर्णाश्रमधर्म, कुलधर्म आचरून इहलोकीं तसेंच परलोकींही आपलें हित करणें; यासाठीं. ३ पुत्र. ४ मूर्ख. ५ ज्ञानाविषयीं. ६ दोहोंप्रकारचाही. ७ माझें वचन. ८ चांगला परिणाम होईल, अशा अर्थाचें. ९ वर्षें. १० विचारणा. ११ शिवातें. १२ जाणते. १३ श्रेष्ठा. १४ त्याचें (मूर्तिमंत) हित. १५ (मुलाची सुलक्षण चर्या पाहिल्यामुळें) अनुभवासहित (अथवा) तद्धितप्रत्ययासहित. १६ नाम. १७ अज्ञान. १८ वर्षे. १९ पुण्याचा (केवळ) राशीच.

यापरिआश्वासुनियां पुत्रासहमंत्रें[1]तोअसाठरवी,
चौर्यावांचुनिनाहीं आतांअपणांदुजीगतीबरवी. ११
नंतर[2]आपणिमोठ्या वैश्याचेंपावुनीसद[3]न्नघर,
कोठीच्याभिंतीला करितीअंतरिंशिरावयाविव[4]र. १२
अंत[5]र्गतासुताला सांगवाजेंअवश्यतोंचिहरी[6],
मगयासाठींशासन करीलजेंभोगुंतेंसर्वेचिहरी[7]. १३
साखरबारिकतांदुळ घेदाळहिआणिनवीनतूपरवा,
भगवज्जनसत्कारीं प्राणांचीहीधरीनतूपरवा. १४
जेंइच्छिततेंघेउनि कमालविवरेंपित्याजवळदेई,
तैसाकबीरनिजगृहिं पोंचवुनीतेंपुन्हापरतयेई. १५
अंतिं[8]ह्मणेयांपुरतें झालेंआतांपुरेनकोकांहीं,
येजाऊंनिजसदना[9] जोंवरिहेंजाणिलेंनलोकांहीं. १६
परियाविवरेंभलता शिरेलतस्करह्मणूनिजापरता,
रक्षककिंचिज्जागृत करूनिधावेनहोयजोंपुरता. १७
तैसें[10]हिकमालकरूनि वेगेंधाऊनियाशिरेविवरीं[11],
रक्षकतोंचिउसळुनी धडपडताचिपाणिनेंतदं[12]घ्रिधरी. १८
थरथरकमालकांपत बाहेरपडावयासिघेओढी,
मागेंरक्षकबळकट ओढिपुढेंकाडिमात्रनचसोडी. १९
होतांनिरुपायतदा कमालअगदींहळूपित्याबोले,
रक्षकओढीमजला अतिसाहसयापरीफळाआलें. २०
कळतांहेंदैन्यकबिर हळहळुनीगुप्तखळखळांरडला,
कींमाझ्यावचनेंहा प्रियबाळप्राणसंकटींपडला. २१

---

१ मसलत. २ बाजारांत. ३ उत्तम अन्नें असावयाचीं ड्यामध्यें असें. ४ बोगदा. ५ आंत शिरलेल्या. ६ घे. ७ ईश्वर. ८ शेवटीं. ९ आपुल्या घराला. १० असें करणें अति साहस, हें जाणत असतांहीं पित्याची आज्ञा यास्तव, (तैसेंहि करून.) ११ बोगद्यांत. १२ त्याचे पाय.

पुनरपिकमालबोले यासीसवतीनयातनामजला,
कापामानझटकरी धैर्यानेंआवरूनिअश्रुजला. २२
बाबारेसत्पुत्रा निरूपायह्मणूनिवदसिहेंउचित,
शुचितंमतूहोशीपरि खाटिकहीनिंदितीलमजखचित. २३
हेंहिअसोपरिगौरें प्रसन्नकुरुळ्याकचांनिंहिसुशोभें,
ऐशातुझ्यामुखाचा कायकरूंनचसुटेंमलालोभ. २४
नंतरकमालवदला घावरूनीकायफळअतांताता,
द्याभोजनसाधूंला प्रसन्नचित्तेंतुह्मीअणिकमाता. २५
वदलाकबीरत्यातें तरिकारिबाजानकीपतिस्मरण,
देहप्राणवियोगहि कींतेणेंहोयमहनव्हेमरण. २६
अवकाशनाहियास्तव पुत्राचाकंठचरचराचिरूनी,
हरूनीतन्मस्तकनिघे अरूणोदयिंगूढकीपथाधरूनी. २७
चिंतीहीप्राप्तीजरि गेलोंनिजकामिनीसकळवाया,
प्रियतनुजानपहातां मानिलतीभामिनीसकळवाया. २८
तोसाधुकबीरसतत जोचिंतीदशरथात्मजानिशांतीं,
जनिशांतीस्वसुताची यापरिकरूनीअलानिजनिशांतीं. २९
शिरठेवुनिगूढस्थळिं दावायादुःखेंकर्दमिंअलिप्त,
शोकोच्छ्वासांसहकरि नेत्रजलस्रावहीबहुतगुप्त. ३०
स्त्रीसह्मणेपाककरवि आजिउणेंनाहिकांहिंसामान,
साधुंसअन्नेंदेऊं आपणनिर्धनहिकांहिंसामान. ३१
होतांचिपाकसिद्धी जायकबिरसाधुसंघआणाया,
प्रत्येकासिह्मणेहो माझ्याअसतीतुह्मांसिआणाया. ३२

---

१ अत्यंत पवित्र. २ गोरें. ३ केसांनीं. ४ चांगलें शोभणारें. ५ रामाचें स्मरण. ६ उत्साह. ७ घेऊन. ८ त्याचें मस्तक. ९ चोरट्या वाटेनें वाटेला. १० प्रियपुत्राला. ११ कोपलेली. १२ रात्रीच्या शेवटीं. १३ जन्माची शांति (मारण). १४ आपल्या घरीं. १५ दुःखरूप चिखलांत. १६ अन्नदानेंकरून. १७ साधूंचा समुदाय. १८ शपथा.

शुचिमंडपिं[1]अतिमानें बसवीत्याभोजनासशतमूर्तीं,
कींतत्तुष्ट्य[2]गदानें व्हावीनि.शेषआत्मभव[3]ज्वर्तीं. ३३
इकडेवैश्यें[4]आणुनि राजाचेदंडकारअधिकारी,
रात्रींचोरांनींकाते केलीतीदाविलीतयांसारी. ३४
तेह्मणतिचोरमानी मृत्युहुनीगणितिजेअधिकबंधें,
तन्मानखंडनार्हें[5] द्याशूलींचत्वरीं[6]मकधिकबंधें[7]. ३५
भोजनकरूनिसाधू गेलेस्वस्थानिंमगकबीरवधू,
सावधहोऊनिह्मणे कोठेंबाळप्रपंचपद्ममधू[8]. ३६
आलीधावतरडताचि शोधुनिवेगेंसुतासभवताला,
शोकोच्छ्वाससमीरें[9] कांपवुनिवदेकबीरनवतालो[10]. ३७
प्राणांसममम एकचि झालेंप्रियतेंहिलेंकरूंकाय,
त्याविणमृतसेंअपुलें घेउनियांकायहेंकरूंकार्य[11]. ३८
नंतरसजलविलोचन[12] दीनअशापाहुनीकबीरास,
कोठेंआत्मजह्मणतां घाबरलांकांअसेंपुसेत्यास. ३९
सांगुनिवृत्तें[13]ह्मणेतो यापरिवधुनी[14]हिआजतनयातें[15],
अनयातें[16]हिधरूनी केलेंधनसत्वजेंजतनयातें. ४०
याघोरकौर्य[17]वातें सखयेपोटांतफारकालवलें,
घालवलेंव्रत[18]आणिक सत्पुत्रज्योति[19]हायमालवलें. ४१
तरितच्छिरं[20]रक्षियलें हेंतुजजीवाशिवायदावाया,

१ पवित्र मंडपांत. २ त्यांचा संतोष, या औषधानें. ३ आपला जन्ममरणरूप ज्वर. ४ कैद. ५ त्यांच्या मानाच्या नाशार्थ. ६ चवाठ्यामध्यें. ७ मस्तकावांचून शरीर (धड). ८ प्रपंच या कमलांतील मधु (सारांश). ९ शोकोच्छ्वास वायूनें. १० धैर्यानें निश्चल ह्मणून जो ताडाचा नवा रोपडाच, असा झाला. ११ शरीर. १२ गहिंवरलेले डोळे ज्याचे. १३ हकीकत. १४ मारून. १५ पुत्रातें. १६ अनीतीसही. १७ भयंकर कार्य, या वायूनें. १८ दुसऱ्यास पीडा न करणें, इत्यादि. १९ चांगला पुत्र, हेंच ज्योति. (पुत्र हा ज्योतीरूप प्रपंचाचा प्रकाशक असें वेदांत देखील ह्मटलें आहे). २० त्याचें मस्तक.

दावायांतनसुनिमग फळकायकरूनिवायदावाया. ४२
तीविलपेशिरकवळुनि चुंबनकरूनी[1]गतासुवदनाचें,
वदनाचेलमजपुढें भूषणहोऊनिकवणसदनाचें. ४३
चरफडलाअसशिलकीं जेंविवरींबापुड्याअडकलासी,
झालेंकु[2]ड्यतवांगां वि[3]धुच्याअ[4]गुंचेंजसें[5]धड[6]कलांसी. ४४
सुंदरअन्नवसनगृह भू[7]षादिनसेअज्ञांदरिद्रांसें,
तरितूसर्वाधिकपरि काळानेंउचलिलातुझाग्रास. ४५
जैशीघारपिलांला नपहातांभ्रमतिटाकुनीकोठें,
तैशीउदासगृहहें सोडुनिबातुजसिपाहुंमीकोठें. ४६
चालकसूत्राधारें इकडेतिकडेसपुतळिवावरती,
तशिमीवागतहोतें अजवरिबाळातुझ्याजिवावरती. ४७
टाकुनिमजदुबळीला केलासिजवळिमुलाकसाशमन,
[10]शंमनचलवभरपावे तुजविषयींआज्ञुनी[11]हिसोशमन. ४८
नंतरकबीरधैर्यें आलिंगुनितिसपरोपरीविनवी,
बनवीसृष्टिअशिचविधि गारूडखेळापरिक्षणांतनवी. ४९
सुज्ञेसद्गुरुह्मणती ममताचिम[12]हारिलोळ[13]वीयाला,
वायाला[14]र्थोळुनितें नरडेचलसाधुबोळवायाला. ५०
गिळुनीशोकाविवेकें स[15]भार्यभेटुनिकबीरसंत[16]गणा,
बोलेयादासानिज जनिंआपणई[17]शमूर्तिमंतगणा. ५१
मगतेसाधुनिघाले बुध्यापूर्वोक्तचत्व[18]रांवरुनी.
त्यांशींबोलतचाले कबीरसे[19]स्त्रीकशोकआवरुनी. ५२

---

१ गतप्राण, अशा मुखाचें. २ भिंत. ३ चंद्राच्या. ४ राहूचें. ५ मस्तकावांचून शरीर. ६ सोळा कळांस, (ग्रहणकालीं). ७ अलंकार इत्यादि. ८ निर्धनांस. (वैराग्य भाग्य पूर्ण असून दारिद्र-निर्धन). ९ यम. १० शांति. ११ आज्ञायुक्त. १२ महाशत्रु. १३ नाहींसें करा. १४ आव्हेरून. १५ स्त्रीसहवर्तमान. १६ साधुसमुदायाला. १७ ईश्वर. १८ चवाठ्यावरून. १९ स्त्रीसहवर्तमान.

धडशूलावरिदिधलें कौतुकहेंपाहतांचिसन्निकर[1],
झालास्तब्धकबंध[2]हि नमियाझरकरजुळूनिदोनिकर. ५३
अत्याश्चर्यभरेंमृदु साधूंचेंचित्तवांकलेंवरतें,
पाहुनिह्मणतिकबीरा कोणाचेंविशिर[3]बाकलेवर[4]तें. ५४
कबिरह्मणेतेंआपण पुसूनयेआणिमींहिसांगुनये,
होउनिगेलेंपुरतें तेंकायसहस्रवेळसांगुनये. ५५
विस्मितमहंतहोउनि त्यासिह्मणेतुजसिशपथरामाची,
इच्छितसेंनकरीतरि तीभगवद्भक्तिकायकामाची. ५६
स्त्रीसहगाहिवरूनिकबिर सांगुनिवृत्तांतजाहलासर्व,
सारांशवदेयापरि सत्सत्कारा[5]ख्यसाधिलेंपर्व. ५७
धर्मार्थ[6]हेय[7]तनु[8]ही व्यासोक्तिहि[9]अज्ञह्मणतिबडबडती,
लडबडतीकोणि[10]मधीं गुरु[11]वाङ्निष्ठनकदापिगडबडती. ५८
याकबिरभाषणानें महंतआणूनिलोचनांपाणीं,
बोलेधीराकबिरा झटकरएथेंस्वपुत्रशिरआणी. ५९
त्याअमृतसदृशवचना कबिरस्त्रीऐकुनीत्वरितधावे,
पातेंलवलेंनाहीं तोंशिरघेऊनित्यास्थळींपावे. ६०
शूलावरूनितेंधड उतरूनिमहंतत्याशिशिरलावी,
जीवत्सुत[12]देहिंकबिर सस्त्रीक[13]करूनिदृक्[14]शिशिर[15]लावी. ६१
मगभार्यापुत्रांसह घडिभरसप्रेम[16]बाष्पनाचूनी,
गद्गदवदेमहंता रामकवणयाचमूर्तिवाचूनी. ६२

---

१ साधुसमुदाय. २ मस्तकावांचून शरीर. ३ मस्तकावांचून. ४ गतप्राण शरीर. ५ साधूंचा सत्कार, हें नांव आहे ज्यास; असें. ६ धर्म संरक्षणा करितां. ७ त्याज्य. ८ शरीर. ९ नास्तिक. १० आस्तिक असूनही स्वकर्माचरणाविषयीं आळशी. ११ गुरुवचनावर पूर्ण भरंवसा ठेवून स्वकर्माचरणसंबंधी क्लेश हौसेनें सोसणारे. १२ जिवंत झालेला जो पुत्राचा देह त्याच्याठायीं. १३ स्त्रीसहवर्तमान. १४ दृष्टि. १५ थंड. १६ प्रेमाश्रुसहित, असें.

सीतायुतरामतदा लक्ष्मणभरताहितघ्न[1]याच्यार,
मूर्तिमहंतधरीमग त्या आनंदा असेल कांपार. ६३

रामह्मणेसद्भक्ता कबिराईप्सित असेलतें माग,
तोबोलेमजकेलें कृतार्थपरिकांहिंमागणेंभाग. ६४

ज्यावैश्याचेघरच्या द्रव्यांनींसिद्धहेंमहत्कृत्य,
त्यालादर्शनद्यावें इच्छितसेंहेंचमीचरणभृत्य[3]. ६५

तत्क्षणिंकबीरवचना श्रीरामदयाब्धिदे[4]परममान,
जनओंवाळितितत्पद लोचनदीपांहिडोलवुनिमान[5]. ६६

यापरिनिजदासांला स्वदर्शनानेंकरूनियांतृप्त,
भक्तानंतप्रार्थित[6] देणारादेवजाहलागुप्त. ६७

## कबीराख्यानार्या समाप्त.

---

१ शत्रुघ्न. २ धान्यें, साखर, तूप, इत्यादि. ३ (तुमच्या) चरणांचा सेवक. ४ दयासमुद्र. ५ डोळे (याच) दिव्यांनीं. ६ भक्तांचीं (जीं) असंख्य प्रार्थितें (त्यांचा) देणारा.– अथवा, भक्त (असा जो) अनंत (त्याचीं जीं) प्रार्थितें (त्यांचा) देणारा.

# श्रीकाशीची भूपाळी.

---

खरिअइकाशीपुरी ॥ त्रिभुवनीं ॥ संचितमुखदृढकर्म-
रज्जु[1]भव भवपाशाचीसुरी[2] ॥ ध्रु० ॥ नचइचिदुसरिससरी ॥
पुरींमधिं ॥ स्मरतांदुरूनीमहिमाईचा मुक्तियेतसेकरीं ॥१॥
पळतीसाही[3]अरी[4] ॥ मतींतुनि ॥ सिंहाशिरेजींततीकरींद्रहि
सहजचिसोडितिदरी ॥ २ ॥ स्वस्नाता[5]कारिहरी[6] ॥ गि[7]-
रिशर्वा ॥ अशीहिमणिकर्णिकाजियेच्या लोळतसेपरिसेरीं[8]
॥ ३ ॥ हीभवसिंधुत[9]तरी[10] ॥ जडांसहि[11] ॥ यासाठिंचतारि[12]-
केश[13]नाविक इजमधिंथाराधरी ॥ ४ ॥ खरि० ॥ १ ॥

इतरक्षेत्रेंजिरीं ॥ इजपुढें ॥ त्यांजपुढेंहीफारचमोठी कि-
ल्लाजणुजंजिरी[14] ॥१॥ सदनां[15]नींसाजिरी ॥ तांबड्या ॥ मधिं-
मधिंहिरव्यानिळ्यापिवळिया ह्मणुनिदिसेअंजिरी[16] ॥ २ ॥

---

१ "संचितमुख" संचित, प्रारब्ध, क्रियमाण (आणि) "दृढ" फळ दिल्यावांचून सोडितच नाहींत. अशा कर्मांच्या; कायिक, वाचिक, मानसिक; चांगलें, वाईट, इत्यादि भेदांची परस्परांत गुंतागुंत झाल्यामुळें, जिचा पीळ उलगडणें, शेवटें सांपडणें अशक्य, अशी जी साखळी या दोरीचा झालेला जो "भवपाश" जन्ममरणें, सुखदुःखें, यांचा अखंड प्रसंग; या फासाची. २ "सुरी" (निःसंशय) कापणारी ! ३ काम, क्रोध, लोभ, मोह, मद, आणि मत्सर (हे सहा). ४ शत्रु. ५ आपल्या जळांत स्नान करणारा यास. ६ विष्णु. ७ शिव. ८ अथवा. ९ पूर्वेच्या शिवेवर १० नौका. ११ ज्यास शास्त्रज्ञान व शास्त्रप्रमाणें स्वधर्माचरण नाहीं त्यास देखील. १२ तारकेश्वर. १३ नावाड्या. ॥१॥ १४ "जंजिरी" या नांवाचा मोठा पहाडी किल्ला कोंकणांत प्रसिद्ध आहे. १५ घरांनीं. १६ तांबडा पुष्कळ असून त्यांत थोडा थोडा हिरवा, निळा, तसाच पिवळा असला ह्मणजे पिकलेल्या अंजिराच्या त्वचेसारखा दिसतो या कारणानें त्यास अंजिरी रंग ह्मणतात.

निजा[1]श्रितागोजिरी ॥ तें[2]नूदे ॥ असोकि[3]टीतारितदेहां[4]तीं घालितयां[5]माजिं[6]री ॥३॥ ईं[7]तसुरगृहा[8]जिरीं ॥ भरानें ॥ प्राकृ-तकरितीभजनघेउनी टाळविणाखंजिरी ॥४॥ खरि०॥२॥

जिचा[9]पंतिहि[10]आतुरीं ॥ कृपाकरि ॥ पहाजगवितोमुनि[11]सुत-लत्ता हणुनियमाच्याउरीं ॥१॥ जी [12]वृषींनिश्चयधुरी ॥ ठेवुनीं ॥ मुक्तिबीजाशिवभक्तिमानसीं पेरायाची[13]कुरी ॥ २ ॥ शिर-वेस्[14]वर्गोपुरीं ॥ सुखेच्छुस ॥ स्वनि[15]ष्ठजीवातत्पापाच्या हातीं-देउनितुरी ॥३॥ वदतोंमीखरुखुरी ॥ लोकहो ॥ अशिच-र्वणितीइचीश्रुतिस्मृति इतिहासहिचातुरी ॥४॥ खरि०॥३॥

ज्याच्यादृ[16]ष्टयंबरीं ॥ उगवला ॥ क्षेत्रराजे[17]रविसरलीत्याची आ[18]वृत्तिविभावरी ॥ १ ॥ विश्वेश्वरमंदिरीं ॥ प्रथमता ॥ नंतरमाध[19]वेमुखांजायतो करिअपुलाहे[20]रंगिरी ॥ २ ॥ ना-

---

१ आपला आश्रय करणारास. २ शरीर. ३ डुकर.– तात्पर्य, पशूंतलाही बोजड. ४ ( काशींत ) त्याचें देहावसान होतांच. ५ कि आणि टी, या दोहों अक्षरांच्या मध्यें.– तात्पर्य, किरीटी करी. एथें “ किरीटी ” हें उपलक्षण, परंतु देवसदृश ऐश्वर्यवान् करी. ६ “ री ” हें अक्षर. ७ देवालयाच्या अंगणांत. ८ ज्यांस योगयाग करण्याचा अधिकार नाहीं, अथवा अधिकार असूनही ज्यांना गुरुसेवा, शास्त्रज्ञान यांचा लाभ झाला नाहीं ते. ॥ २ ॥ ९ शिवही. १० महासंकटानें घाबरलेला. ११ मार्कंडेय. १२ ( शिवपर पुराणें इत्यादिकांत बहुत प्रकारांनीं शिवाराधनाचें माहात्म्य ज्याणें वर्णिलें आहे त्या ) नंदिकेश्वरावर. अथवा, “ वृष ” ( धर्म ),– तात्पर्य, स्वधर्माचरणावर. १३ शेतकऱ्याचें शेत पेरण्याचें हत्यार असतें त्या हत्याराला कोंकणबादरींत “ पाभर ” ह्मणतात आणि देशांत “कुरी” ह्मणतात. १४ स्वर्गाच्या थोरल्या वेशींत. १५ आपल्याठायीं भाव ठेवणारास. ॥ ३ ॥ १६ दृष्टिरूप आकाशांत. १७ क्षेत्रराजरूप सूर्य. १८ जन्ममरणरूप रात्रि. १९ माधव, ढुंढिराज, दंडपाणि, भैरव, काशी, गुहा, गंगा, भवानी, मणिकर्णिका, यांचें क्रमेंकरून दर्शन करणारा. २० कैलास.

माचीमाधुरी ॥ काशिया ॥ घेत्यावाटेविषयै[1]संपदा मिर-च्यांचीबाधुरी ॥ ३ ॥ भक्तार्भके[2]हितकरी ॥ नगरिही ॥ अनन्य[3]शरणामंदांचेंही मनआनंदेंभरी ॥४॥ खरि० ॥४॥

किर्तिमीवर्णूतरी ॥ बाइला ॥ स्वनामघोषें[5]स्ववासफळदे दुबळ्यादेशांतरीं ॥ १ ॥ इच्यादर्शनींजरी ॥ नचाले ॥ उपायतरिहीकाशीकाशी सततवदावेंघरीं ॥ २ ॥ ध्यावी-हृदयांतरीं ॥ यथा[6]श्रुत ॥ भक्तिरसाहुनिगोडकांहिंही नाहिचभुवनोदरीं[7] ॥ ३ ॥ अनंत[8]कविबहुपरी[9] ॥ इची-स्तुति ॥ करितरिभासेएकंदोशिंजाशि तुळशीवरिमंजरी ॥ ॥ ४ ॥ खारिअइ० ॥ ५ ॥

श्रीकाशीची भूपाळी समाप्त.

---

१ विषयोपभोगाची सामग्री. २ (आपल्या) "भक्त" या बाल-कांचें हित करणारी. ३ मला काशीखेरीज दुसरा कोणी त्राता नाहीं, तर काशीच आहे, अशा भावाचा. ४ शास्त्रज्ञान, इत्यादि तरुणो-पायांचा लाभ ज्याला झाला नाहीं, त्याचेंही. ॥ ४ ॥ ५ आपल्या नां-वाच्या उच्चारानें. ६ वारंवार ऐकण्यानें जशी मनांत भरली असेल तशी. ७ जगतामध्यें. ८ ज्याची संख्या लागत नाहीं असा कवि, अथवा "अनंत" या नांवाचा. ९ पुष्कळ प्रकारची. १० काशीच्या गुणांचा जो विस्तार त्याच्या अगदीं लहानशा अंशासच अवलंबून राहणारी. ॥५॥